


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २५६ – जानेवारी-मार्च १९९१

(म.रा. साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत)

## १९९० : साहित्य आस्वाद विशेषांक

**संपादक : शंकर सारडा**
संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वीणा देव,
डॉ. वसंत सावंत, प्रा. चंद्रकुमार नलगे

**या अंकाची किंमत : १० रुपये**
वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ४० रुपये)

मुखपृष्ठ : लक्ष्मीकांत तोष्णीवाल, पुणे

मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स, १०१९ सदाशिव, पुणे ४११०३०
टाईपसेटिंग : प्रमोद वि. बापट, प्रमोद प्रिंटर्स, ११२०, सदाशिव पेठ, पुणे ३०.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# संपादकीय

*मित्रहो,*

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा हा 'साहित्य-आस्वाद विशेषांक' आपल्या हाती देताना आनंद होत आहे. पन्नासावर पुस्तकांचा परिचय या अंकात करून देण्यात आला आहे. ती बहुतांशी १९९० मध्ये प्रसिद्ध झालेली वा बाजारात आलेली आहेत. ८९ मधील तीन-चार पुस्तके या वर्षात बक्षिसे मिळाली वा ८९ मध्ये वर्षअखेर प्रसिद्ध झाली म्हणून, त्यांचे महत्त्व जाणून यात परामर्शासाठी घेतली आहेत. एका इंग्रजी पुस्तकाचीही दखल घेतली आहे. मुख्य भर मात्र १९९० मध्ये प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांवर आहे.

मान्यवर समीक्षक, विद्वान प्राध्यापक, जिज्ञासू साहित्यिक यांच्याच जोडीने सर्वसामान्य वाचकांनाही आपल्याला आस्वाद्य वाटलेल्या पुस्तकावर लिहिण्याची संधी देण्यात आली आहे. सुमारे दीडशे पुस्तकांवरील अभिप्राय आमच्याकडे आले. नेहमीच्या अंकाच्या तुलनेने दीडपट पृष्ठसंख्या करूनही त्यांपैकी पन्नासेक अभिप्रायांचा समावेश करता आला. अजूनही काही चांगली पुस्तके व चांगले अभिप्राय आहेत; परंतु जागेच्या मर्यादेमुळे त्यांना बाजूला ठेवावे लागले आहे त्याबद्दल हळहळ वाटते.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या खास अंकासाठी विशेष अनुदान द्यावे अशी आमची मागणी होती; परंतु तिला प्रतिसाद मिळाला नाही. त्या त्या वर्षातील साहित्याची नोंद करणे, त्यांपैकी निवडक पुस्तकांवर समालोचनात्मक लेख देणे, हे काम ऐतिहासिक महत्त्वाचे आहे; परंतु त्याचे मोल कोणाला जाणवत नाही. साहित्यसंस्कृती मंडळाने अनुदानाबाबत केलेली नियमांची चौकट ही अशा उपक्रमांची दखल घेण्याच्या दृष्टीने निरुपयोगी आहे. महाराष्ट्र सरकार दरवर्षी वाङ्मयीन पुरस्कार देते. त्यासाठी लेखक-प्रकाशकांकडून प्रवेशिका मागवते. त्याऐवजी त्या त्या वर्षातील निवडक किंवा सर्व पुस्तकांची अद्ययावत नोंद ठेवून, त्यांपैकी महत्त्वाच्या पुस्तकांचे परामर्श घेणाऱ्या अशा उपक्रमाचा पाठपुरावा केला तर केवळ स्पर्धेसाठी आलेल्या पुस्तकांतून पुरस्कारप्राप्त पुस्तके ठरवण्यापेक्षा सर्वच पुस्तकांतून ती निवड करता येईल. ती निवड अधिक ग्राह्य व न्याय्य ठरेल. यासाठी फार मोठा खर्च होणार आहे अशातलाही भाग नाही; परंतु साहित्यसंस्कृती मंडळाच्या विद्यमान नोकरशाही साच्यात उपक्रमशीलता वा विधायक दृष्टी यांचा अभाव जाणवतो हे नाकबूल करण्यात अर्थ नाही. मंडळाच्या स्वीकृत उद्दिष्टांची परिपूर्तता होण्याच्या दिशेने सध्याचे कामकाज अगदीच त्रोटक व अपुरे आहे. अशा विशेष उपक्रमाला

खास अनुदान मिळाले नाही म्हणून ही तक्रार आहे असे नाही; परंतु एकूणच कामकाजाला जो साचेबंदपणा आलेला आहे तो झटकून टाकायला हवा. याकडे पुनःपुन्हा लक्ष वेधण्याची गरज आहे खरी !

या अंकात ज्या पुस्तकांवरील मजकूर आला आहे ती सर्वच पुस्तके सारख्याच तोलामोलाची आहेत असे नाही. महाराष्ट्राबाहेरील लेखकांच्या पुस्तकांची दखल घेण्याचाही प्रयत्न आहे. तरी महत्त्वाची सर्वच पुस्तके यात येऊ शकलेली नाहीत; काही अपेक्षित लेखकांचा मजकूर वेळेत हाती येऊ शकला नाही. काही समीक्षकांना तीन-चार विशिष्ट पुस्तकांची नावे कळवून त्यांपैकी एखाद्या पुस्तकावर लिहा असे कळवले. त्यांपैकी बहुतेकांनी ती पुस्तके पाहिलेलीच नाहीत असे लक्षात आले. मग ते काय लिहिणार? तर काहींनी आश्चर्याचे धक्केही दिले. ज्ञानेश्वरी सप्तशताब्दीनिमित्त बरीच पुस्तके प्रकाशित झाली. त्यांपैकी एखाद्या पुस्तकाचे परीक्षण पाठवा असे एका ज्येष्ठ ज्ञानेश्वरी अभ्यासकींना लिहिले, तर त्यांनी उत्तर पाठवले– 'अशा पुस्तकांची यादी तुम्हीच पाठवा.' ज्ञानेश्वरीच्या व्यासंगी समीक्षकाने या वर्षात ज्ञानेश्वर-ज्ञानेश्वरीवर प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची आपल्याला काही माहितीच नाही असा हा जो सूर लावला तो अर्थातच त्यांच्याकडून अपेक्षित नव्हता. त्या त्या क्षेत्रातील अद्ययावत माहिती तज्ज्ञाला असली पाहिजे. जर तज्ज्ञांनीच नव्या पुस्तकांबद्दल अशी अनास्था-बेफिकिरी दाखवली तर सामान्य वाचकाला दोष देण्याचा अधिकार आपल्याला कसा राहील? सुदैवाने सामान्य वाचक त्यामानाने अधिक जागरूकता दाखवतात. यंदा वृत्तपत्रात आम्ही केलेल्या आवाहनाला चांगला प्रतिसाद मिळाला. महाराष्ट्राच्या सर्व भागांतून सव्वाशेवर पुस्तकांची समालोचने आली. त्यामानाने मान्यवरांना लिहिलेल्या पत्रांना प्रतिसाद कमी मिळाला. अनेकांनी तर नक्की लेख पाठवतो असे कळवूनही शेवटी काही पाठवले नाही.

पुस्तकांवरील मजकूर हा परिचय, अभिप्राय, आस्वाद, परीक्षण, समालोचन, दोषदिग्दर्शन, टीका, खंडन, मूल्यमापन अशा अनेक पातळ्यांवरचा असू शकतो. त्या त्या लेखकाच्या क्षमतेवर, वृत्तीवर, अभ्यासावर आणि उपलब्ध शब्दमर्यादेगणिक तो बदलू शकतो. या अंकात हे सर्व प्रकार पाहायला मिळतील; परंतु उत्तम ग्रंथपरिचय व ग्रंथसमीक्षण हे वाङ्मयीन वातावरणात चैतन्य व औत्सुक्य आणण्यास, टिकवण्यास आवश्यक असते. त्या दृष्टीने आपल्याकडे ग्रंथ परिचयाला उचित स्थान देणारी मोजकीच वृत्तपत्रे व नियतकालिके आहेत. खरे तर सर्वच वृत्तपत्रांनी प्रत्येक आठवड्याला किमान पाच पुस्तकांची तरी दखल घ्यायला हवी. मराठीत दरवर्षी हजार-बाराशे पुस्तके प्रसिद्ध होतात. तेव्हा वर्षात किमान अडीचशे पुस्तकांची तरी प्रत्येक वृत्तपत्राने दखल घ्यावी ही अपेक्षा अवास्तव नाही. गावोगावच्या जागरूक वाचकांना त्यायोगे नव्या पुस्तकांची ओळख सुलभ रीतीने होऊ शकेल. पुस्तक परीक्षणे ही सिंडिकेट पद्धतीने निरनिराळ्या वृत्तपत्रांना पुरवली तर आणि वृत्तपत्रांनी ती छापली तर ते देखील सोयीचे होईल. कारण ग्रंथ समीक्षकांचीही

तशी वाणच आहे. पुस्तकांवरील वृत्तपत्रीय त्रोटक अभिप्राय अनुक्रमणिकेच्या पुनरुक्तीत वा कथा-कादंबरीच्या सारांशातच घोटाळतात. पुस्तकाची सम्यक् ओळख आणि तिचे तात्कालिक मूल्यमापन या दोहोंची सांगड त्यात घातली जायला हवी. वाङ्मयीन परंपरेतील त्या पुस्तकाचे स्थानही सूचित व्हायला हवे. नाहीतर त्या अभिप्रायाचा वाचकाला फायदा होत नाही. गावोगावच्या मोठ्या वाचनालयांनी आपल्या वाचकांसाठी अभिप्रायलेखनाच्या स्पर्धा लावून, उत्तम अभिप्रायांना पारितोषिके देण्याची प्रथा पाडल्यास एकूणच वाचन संस्कृतीला उठाव मिळेल; त्या अभिप्रायांना वृत्तपत्रीय प्रसिद्धीही सुलभपणे मिळून, अभिप्रायलेखकांची नव्या दमाची पिढी पुढे येईल. पुस्तक परीक्षणांनाच वाहिलेले एखादे नियतकालिक असण्याचीही गरज आहे. प्रकाशक जिद्दीने चांगली पुस्तके काढतात; लेखक परिश्रम करून उत्साहाने लिहितात; परंतु त्यामानाने त्यांचे चीज होत नाही. त्यांची समीक्षा होत नाही. त्यांच्याकडे दुर्लक्षच होते. ही परिस्थिती भयानक आहे. वाचकांच्या वाचनात येणारे साहित्य आणि विद्यापीठात अभ्यासासाठी लावले जाणारे साहित्य या दोहोंमधले अंतर फार वाढले तर विद्यापीठीय पातळीवरील समीक्षात्मक अध्ययन-अध्यापन कालबाह्य आणि निरुपयोगी होऊ लागेल. समीक्षेत लोकांच्या अभिरुचीला योग्य दिशा देण्याची क्षमता हवी; तशीच लोकमानसाची दखल घेण्याचीही लवचिकता हवी.

**साहित्य संमेलन**

६४ वे मराठी साहित्य संमेलन रत्नागिरी येथे २१ ते २३ डिसेंबर १९९० दरम्यान उत्तम रीतीने पार पडले. संपूर्ण रत्नागिरी गाव या वाङ्मयीन उत्सवात मनापासून सहभागी झालेले होते आणि घरचेच कार्य असावे अशा आत्मीयतेच्या भावनेने प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष कार्यरत होते. मुख्यमंत्री शरद पवार हे एक रसिक या नात्याने उपस्थित राहणार या घोषणेमुळे तेथील सर्व शासकीय यंत्रणाही या उत्सवात आपण मागे राहता कामा नये या जिद्दीने कामाला लागली. त्यामुळेही रत्नागिरीतील काही दीर्घकालीन समस्या सुटण्यास चालना मिळाली. साहित्य संमेलनाची उपयुक्तता या दृष्टीनेही आता लोकांना पटू लागेल आणि संमेलन भरवण्याची अहमहमिका निरनिराळ्या गावांमध्ये लागेल असे वाटते. संमेलनात चैतन्य आणण्यास अध्यक्ष मधु मंगेश कर्णिक यांच्याबद्दलच्या रत्नागिरीकरांच्या आत्मीय ओढीमुळेही हातभार लागला. कार्यक्रम भरगच्च होते. ग्रंथदिंडीला ना. शरद पवारांनी थोडा वेळ हजेरी लावली. व्यवस्थाही नेटकी होती. स्वागताध्यक्ष अरविंद शिंदे, कार्याध्यक्ष डॉ. वि. म. शिंदे, कार्यवाह अरुण नेरूरकर, अॅड. विलास पाटणे, श्री. केळकर, प्रसिद्धी प्रमुख अनिल श्रीखंडे व अन्य कार्यकर्ते धन्यवादास पात्र आहेत.

**अभिनंदन**

कविवर्य कुसुमाग्रज यांना पद्मभूषण देऊन भारत सरकारने त्यांचा गौरव केला; ना.

धों. महानोर यांनाही पद्मश्रीचा लाभ झाला. साहित्य अकादमीने डॉ. आनंद यादव यांच्या 'झोंबी' या आत्मकथनाला १९९० चा पुरस्कार दिला; तसेच, अकादमीचे अनुवादासाठी असणारे पुरस्कार श्रीपाद जोशी आणि मोरेश्वर तपस्वी यांना जाहीर झाले. नाटककार बाळ कोल्हटकर यांना विष्णुदास भावे पुरस्कार देण्यात आला. या सर्वांचे अभिनंदन.

महाराष्ट्र शासनाने दरवर्षी उत्कृष्ट ग्रंथांना देण्यात येणाऱ्या पुरस्कारांच्या रकमेत वाढ केली आहे. तीन हजार ऐवजी पाच हजार रुपये आता विजेत्यांना मिळतील.

साहित्य अकादमीचे पुरस्कार मिळवणाऱ्या साहित्यिकांना व अन्य क्षेत्रांतील भारतीय पुरस्कार मिळवणाऱ्या सुमारे ३१० व्यक्तींना महाराष्ट्र सरकारने एकेक लाख रुपयांचे महाराष्ट्र गौरव पुरस्कार देऊन सन्मानित केले. श्रीमती दुर्गा भागवत यांनी हा पुरस्कार स्वीकारण्यास नकार दिला; तर पु. ल. देशपांडे यांनी पुरस्काराची रक्कम रॉयल एशियाटिक लायब्ररीला देणगीदाखल दिली. या पुरस्काराबद्दलही थोडाफार वाद झाला; त्यामुळे पुन्हा एकदा शासकीय पुरस्कार आणि कलावंताची स्वायत्तता याबद्दल चर्चा सुरू झाली, परंतु ती निर्णायक होण्याइतपत ताणली गेली नाही.

### नवी घटना

म. सा. परिषदेची घटना दुरुस्त करण्यासाठी एक समिती नेमली होती. या समितीने सुचवलेल्या दुरुस्त्यांवर काही फेरफारांसह कार्यकारिणीच्या ठाणे बैठकीत शिक्कामोर्तब करण्यात आले. आता ही घटना संमत करण्यासाठी सर्वसाधारण सभेची खास बैठक दि. ३१ मार्च ९१ रोजी बोलविण्यात आली आहे. परिषदेच्या कार्याची व्याप्ती वाढविणे, कामात सुसूत्रता आणणे या दृष्टीने नवी घटना प्रभावी ठरेल असे वाटते.

### विक्रमी वाचकवीर योजना

१९९० मधील किमान शंभर पुस्तके वाचणाऱ्या वाचकांसाठी ही स्पर्धा असून, पहिल्या तीन विजेत्या वाचकांना प्रत्येकी ५०० रुपयांची तीन बक्षीसे पुस्तक रूपाने देण्यात येणार आहेत. या स्पर्धेत भाग घेऊ इच्छिणाऱ्या वाचकांनी आपण वाचलेल्या पुस्तकांची यादी आपल्या नाव-पत्त्यासह १० मार्च १९९१ पर्यंत 'संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, म. सा. परिषद, टिळक रोड, पुणे ३०' या पत्त्यावर पाठवावी. स्पर्धकांच्या यादीची छाननी करून, काही प्रश्न पाठवले जातील. त्यात यशस्वी ठरणाऱ्यांना वर निर्देशित केलेली पारितोषिके दि. २७ मे १९९१ रोजी परिषदेच्या वर्धापनदिनी होणाऱ्या समारंभात दिली जातील. १९८९ मधील विजेत्या स्पर्धकांनाही त्याच वेळी पारितोषिके देण्यात येतील. वाचनसंस्कृतीची जोपासना करण्यासाठी असे उपक्रम जागोजाग व्हायला हवेत. वाचनालयांनी आपापल्या सभासदांसाठी अशा स्पर्धांचे आयोजन करून, वाचकवीरांचा गौरव करावा.



अनुक्रमणिका

**लक्षवेधक घटना**

सातारा येथे नाट्यसंमेलन ज्येष्ठ समीक्षक माधव मनोहर यांच्या अध्यक्षतेखाली पार पडले. मराठी बालकुमार साहित्य संमेलन कोल्हापूर येथे सुधाकर प्रभू यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात आले. मराठी प्रकाशक संमेलन डोंबिवली येथे ३ मार्च ९१ रोजी सरिता प्रकाशन व वरदा बुक्सचे संचालक ह. अ. भावे यांच्या अध्यक्षतेखाली होणार आहे.

साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य कविवर्य पुरुषोत्तम पाटील यांच्या षष्ट्यब्दिपूर्तीनिमित्त धुळे येथे त्यांच्या चाहत्यांनी त्यांचा भव्य सत्कार केला आणि त्यांना एक लाखाची थैली अर्पण केली. 'कवितारती' हे अभिनव मासिक प्रा. पाटील जिद्दीने चालवत आहेत. त्यांचे हार्दिक अभिनंदन.

संपादक

---

## श्रद्धांजली

**वि. त्र्यं. शेटे**

पुण्याच्या सांस्कृतिक क्षेत्रातील एक ज्येष्ठ कार्यकर्ते वि. त्र्यं. शेटे (वकील) यांचे ३ फेब्रुवारी १९९१ रोजी वयाच्या ८२ व्या वर्षी निधन झाले. साहित्यप्रेमी निरलस कार्यकर्ता या नात्याने दादासाहेब शेटे यांनी अनेक संस्थांमध्ये काम केले. याज्ञवल्क्य आश्रम, पुणे नगर वाचन मंदिर, भारत इतिहास संशोधक मंडळ, महाराष्ट्र साहित्य परिषद या संस्थांशी त्यांचा विशेष जिव्हाळ्याचा संबंध होता. म. सा. परिषदेचे कार्यवाह (१९६१-६७) आणि विश्वस्त (१९७५-८२) या नात्याने त्यांनी केलेले विधायक कार्य उल्लेखनीय आहे. शेटे यांचा स्वभाव मनमिळाऊ आणि सर्वांना सांभाळून घेणारा असल्यामुळे साहित्य आणि सांस्कृतिक क्षेत्रातील संस्थांना त्यांचा फार मोठा आधार होता.

म. सा. परिषदेतर्फे शेटे यांना विनम्र श्रद्धांजली.

---

## *पुढील अंक : काही आकर्षणे*

**१. ज्ञानेश्वरीतील प्रत्यक्षयोग : डॉ. द. भि. कुलकर्णी**
**२. डॉ. इरावती कर्वे यांचे ललित लेखन : मीना वैशंपायन**
**३. योगपीठाचार्य चक्रधर : डॉ. वि. भि. कोलते**











# मधु मंगेश कर्णिक
## रत्नागिरी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

**शंकर सारडा**

रत्नागिरी येथे डिसेंबर ९० च्या अखेरीस भरलेल्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद मधु मंगेश कर्णिक यांनी भूषविले.

निवडणूक चुरशीची झाली. विनोदी कथाकार द. मा. मिरासदार यांना १२२ तर मधु मंगेश कर्णिक यांना १२७ मते पडली. वाङ्मयीन गुणवत्तेचा उचित सन्मान झाला अशी कर्णिकांची त्यावरची प्रतिक्रिया. पारध, तोरण, मंत्र, तहान इ. कथासंग्रहांतून आलेल्या सहाशेवर कथा; सनद, माहीमची खाडी, देवकी, सूर्यफूल, भाकरी आणि फूल, वारूळ वगैरे नऊ कादंबऱ्या, सोबत, लागेबांधे, अबीर गुलाल वगैरे ५ ललित लेखसंग्रह इ. पन्नासावर पुस्तके गेल्या ४० वर्षांतील लेखनसातत्यातून त्यांच्या नावावर जमा झाली आहेत. साठीच्या आत साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद मिळवणारे मोजकेच साहित्यिक आहेत. कर्णिकांच्या खात्यावर तेही श्रेय जमा होत आहे.

विशिष्ट दर्जा टिकवून रंजनात्मकता सहजगत्याच जपणारे; दिवाळी अंकांच्या संपादकांना भरोसेमंद वाटणारे आणि एकेका दिवाळीच्या हंगामात पंचवीस-तीस ठिकाणी तरी झळकणारे कर्णिक मानवी चांगुलपणाकडे प्रगाढ श्रद्धेने आणि मानवी विसंगतीकडे आणि त्रुटींकडे विलक्षण सहृदयतेने पाहत असल्याने तुच्छतावादी संप्रदायापासून सतत दूरच राहिले. त्याचमुळे नवकथेच्या परंपरेपासूनही अलिप्तच राहिले.

दुर्बोध, क्लिष्ट व क्लेशदायक रचनेद्वारेच आपली गुणवत्ता व आधुनिकता प्रकट होते– अशा भ्रमात ते कधीच वावरले नाहीत. कादंबरीचा ऐवज कथेत कोंबण्यासाठी सूचकतेचा व संदिग्धतेचा बडिवार माजवणाऱ्या पंथात ते कधी रमले नाहीत किंवा कथेच्या ऐवजावर कादंबऱ्यांचा डोलारा उभारणाऱ्या तथाकथित लोकप्रिय व पानावर मोबदला घेणाऱ्या लेखकांच्या मालिकेतही ते कधी शिरले नाहीत. विपुल लेखन करतानाही आपल्याला दिसलेल्या जीवनाशी, गवसलेल्या जीवनानुभूतीशी इमान राखताना कर्णिकांनी सदैव आदरभावच बाळगला. सपक-सवंग लेखनाच्या आवर्तात ते सापडले नाहीत. कर्णिकांच्या कथा-कादंबऱ्यांमध्ये आणि ललित लेखांमध्ये जीवनाचे विविध-पातळ्यांवरचे तपशील सहजगत्या येतात; ते बरेचसे वास्तव व वस्तुनिष्ठ असतात, खोटे आणि कल्पनाप्रचुर नसतात. सूचकपणा, सहजपणा, नेमकेपणा यांचे त्यांचे भान कधी सुटत नाही.

प्रयोगशील लेखक म्हणून मधु मंगेश कर्णिकांकडे कोणी बोट दाखवत नाही; परंतु त्यांच्या कादंबऱ्यांचे विषय अशा वेगवेगळ्या सामाजिक व भावनात्मक स्तरावरचे आहेत,



अनुक्रमणिका







की प्रत्येक वेळी नवा दृष्टिकोन त्यातून प्रकट होतो. माहीमची खाडीमध्ये झोपडपट्टीतल्या जीवनाची थवथवती स्पंदने प्रकट होतात. स्वतः काही काळ मुंबईच्या झोपडपट्टीत केलेल्या वास्तव्याच्या खाणाखुणांनी तिच्यातील तपशिलांना अस्सल औरसपणा येतो; देवकीमधला कोकणच्या परिसरातला मानवतावादी श्रद्धाळू भावजीवनातील कसोटीच्या प्रसंगांना कृत्रिमतेचा वा खोटेपणाचा वास येत नाही. नोकरशाही पकडीचा आणि नव्या औद्योगिक संस्कृतीचा आलेख त्यांनी काढला आहे. त्यातल्या प्रत्येक घटनाप्रसंगातला वास्तवाचा भक्कम आधार जाणवतो. कादंबऱ्यांचे विषय, कादंबऱ्यांच्या लेखनातले वेगवेगळे प्रयोग हे प्रत्येक वेळी त्या त्या आशयानुरूप आविष्काराचा मार्ग शोधतात. त्यात पुनरावृत्ती सहसा होत नाही. वाचनीयता कुठेही ढेपाळत नाही. कथासूत्रावरची पकड कुठे सैल होत नाही. संघर्षाचे मूलकारण कधी नजरेआड झालेले दिसत नाही.

**खरे प्रेम कथेवर**

कादंबऱ्यांच्या क्षेत्रात लीलया संचार करू शकणाऱ्या कर्णिकांना, कादंबरी हा वाङ्मयप्रकार घटनाप्रधान कथेचेच 'एनलार्जमेंट' वाटत असावे. त्यामुळे त्या प्रकाराच्या अनेक शक्यतांचा मागोवा घेण्याचे त्यांनी कधी मनावर घेतले नाही; असे मला वाटते. याचे कारण कथा या वाङ्मयप्रकारावर कर्णिकांचे खरे प्रेम आहे. जयवंत दळवी म्हणतात त्याप्रमाणे कथा हा मिडिओकर फॉर्म आहे हे कर्णिकांना जाणवलेलेच नाही. जीवनाचे एक व्यापक, समग्र व्यामिश्र चित्र आपल्या फलकावर उतरवण्याऐवजी छोट्या छोट्या तुकड्यांपासून त्याचा वेध घेण्याची सवय त्यांना झालेली आहे, असेही म्हणता येईल. कादंबरी वा नाटक यांच्या लेखनापेक्षा कथेचे लेखन हे अधिक अवघड असते, असे विधान ते करीत नाहीत; परंतु कथालेखनाची प्रक्रिया शिणवणारी असते, असे ते नमूद करतात.

'कथेचे स्फुरण आणि तिचा आविष्कार या दोन्ही गोष्टी बऱ्याच आत्मनिष्ठ राहू शकतात' असे कर्णिकांना वाटते. उत्स्फूर्त कवितेच्या जवळ जाईल असा आत्माविष्कार कथानुभवाच्या शब्दांकनात शक्य असतो; असे ते मानतात. 'दोन-तीन हजार शब्दांच्या चौकटीत आपल्याला अवचित डंख मारून गेलेली कथेची नागीण पकडून आपण तिला बंदिस्त करू शकतो हा अनुभव स्वतःवरचा विश्वास वाढवणारा असतो... आणि लेखनातून जगण्याचे प्रयोजन सापडल्यासारखे वाटते,' असे कर्णिक मानतात.

महादेवशास्त्री जोशी, य. गो. जोशी, खांडेकर, र. वा. दिघे, ग. ल. ठोकळ वगैरेंच्या कथांचे ऐन उमेदीच्या वयातले संस्कार स्वीकारलेल्या कर्णिकांच्या कथेची वाटचाल तशाच वाटेवरून होत राहिलेली आहे; परंतु एकूणच समकालीन कथेतल्या अंगभूत अशा काही तंत्रविशेषांचा प्रभावही तिने आत्मसात केलेला दिसतो. 'कोकणी ग वस्ती', 'तोरण' यांमध्ये मालवणकडल्या ग्रामीण जीवनातले अनेकविध रसदार-कसदार प्रसंग येतात. मानवी स्वभावाचे भलेबुरे नमुने भेटतात. तेथील अगतिक दारिद्र्य आणि परंपरागत अगत्य

यांच्यातील ओढाताण, निसर्गाशी व अवतीभवतीच्या जीवसृष्टीशी असलेली आदिम जवळीक आपल्यापुढे वेगवेगळ्या दृष्टिकोनांतून उभी राहते. 'पुस्तकांपेक्षा माणूस वाचायला शीक' हा साळवी मास्तरांचा संदेश त्यांनी पुरेपूर पचवला आहे. परकायाप्रवेश, परमनप्रवेश करून ते लिहितात असे वाटावे इतकी सहजता त्यांच्या कथांत आहे.

पुतळा, तोरण, जौळ, रेघ, मोर, अद्वैत, पासंग, खेळ, संकेत, निरोप, गाणे वगैरे त्यांच्या गाजलेल्या कथा; एक कलावंत म्हणून कर्णिक प्रत्येक गोष्टीत रस घेतात; पण कशातच गुंतून पडत नाहीत. 'आलो इथे रिकामा वहरून जात आहे' हा कृतार्थतेचा भाव त्यांच्या मनी वसत असतो. मानवाच्या मूलभूत चांगुलपणावर त्यांची श्रद्धा आहे. तीच त्यांच्या लेखनाची प्रेरणा आणि मर्यादा आहे.

**जीवन विषयक सश्रद्ध बैठक**

एका सहृदय साक्षीदाराच्या भावनेतून कर्णिकांचे सारे लेखन सिद्ध झालेले आहे. जे दिसते ते तसेच रंगवून थांबायचे यात ते संतुष्ट असतात. जी. ए. कुलकर्णी यांच्याप्रमाणे जे जीवन दिसते ते एका कुठल्यातरी जटिल सूत्राने बद्ध आहे आणि ते तर्कबुद्धीच्या, मानवनिर्मित संकेतांच्या व चौकटीच्या बाहेर सारखे झेपावत असते असे काही सूचित करण्याचा आग्रह वा अभिनिवेश कर्णिकांच्या लेखनात नाही. या लेखनात सफाई आहे; पण एक प्रकारची जीवनविषयक निश्चित बैठक गृहीत धरलेली आहे; कर्णिकांच्या कथेचा शेवट काय होणार याचा अंदाज चटकन लागतो. त्यांची कथा सरळ रेषेत जाते. ती वळणे फारशी घेत नाही. कल्पनेचा आश्रय ती घेते; परंतु त्यात फँटसीचा भाग फार अल्प असतो. त्यामुळे अनपेक्षित असे– अनप्रेडिक्टेबल असे फारसे तिच्यात काही येत नाही.

इंदिरा गांधी यांच्या जीवनावरील अस्ताचल आणि उदयाचल या कथा, जयप्रकाशांच्या जीवनावरील उत्तरायण ही कथा– हे खरे म्हणजे कादंबरीचे विषय, परंतु कर्णिक कथाच लिहितात. एरव्ही कल्पनेतच रमणारे कर्णिक त्यात कल्पनेने रंग भरतात ते मात्र त्या त्या व्यक्तींच्या जीवनातील व्यामिश्रतेचे भान करून देण्याऐवजी सोप्या चौकटीत त्यांना बसवण्याचे काम करतात. महान विभूतींचे छोटेपण-खोटेपण दाखवताना मोठेपण निसटून जाते. ते मोठेपण मुळातच नसले तर गोष्ट सांगायचीच कशाला? मोठेपण प्रस्थापित करताना किरकोळ छोट्या गोष्टींचा उपयोग त्याचे दैवतीकरण करण्याचे टाळून, त्याचे अटळ अपरिहार्य मानवीपण दाखवण्यासाठी होतो; मोठेपण संशयास्पद बनवण्यासाठी नाही– याचे भान आवश्यक ठरते. मूळच्या लौकिक चित्राला अन्याय होणार नाही अशा रीतीने वास्तव चित्रात नाट्याच्या रंगरेषा मिसळण्याचा आणि कलात्मक पुनर्निर्मितीचा प्रयत्न चरित्रात्मक नाट्यात, कथाकादंबऱ्यांत नित्य होत असतो; परंतु दि लार्क व बेकेट ( ज्यां अनूई), ए मॅन फॉर ऑल सीझन्स (रॉबर्ट बोल्ट) यांसारख्या कलाकृतीतली ही पुनर्निर्मिती आणि शुभांगी भडभडे, सुमती क्षेत्रमाडे प्रभृतींच्या कादंबऱ्यातील पुनर्निर्मिती

यात जमीन-अस्मानाचा फरक पडतो, हे लक्षात घ्यावेच लागते.

**मानसन्मानाचे तुरे**

मधु मंगेश कर्णिक यांच्या कथालेखनावरील निष्ठेला आणि श्रद्धेला अर्थातच वेगळे मोल आहे. 'सोबत'मधील निरनिराळ्या झाडांशी, पक्ष्यांशी, प्राण्यांशी, वनस्पतींशी बालपणापासून गुंतलेल्या भावजीवनाच्या हर्षभरित स्मृती; अबीर गुलालमधील सुहृद व्यक्तिचित्रे, लागेबांधेमधील निर्व्याज नाती– या सर्वच लेखनात कर्णिकांमधील प्रांजल सज्जनरसिक प्रकट होतो.

साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद हा मराठीतील साहित्यिकाला मिळणारा एक सर्वोच्च सन्मान. गेल्या चाळीस वर्षांतील निरलस साहित्योपासनेची ती जणू पावतीच भाग्यवंत कर्णिकांना मिळाली आहे.

कर्णिकांच्या अनके कादंबऱ्यांवर दूरदर्शन मालिका तयार होत आहेत. देवकी हे त्यांचे नाटक गाजले. त्याचे बरेच प्रयोग झाले. दूरदर्शन मालिकांमुळे त्यांचे साहित्य मोठ्या प्रेक्षकवर्गापुढे जाईल. मान्यतेचे, मानसन्मानाचे नव नवे तुरे त्यांच्या शिरपेचावर मिरवतील. माहीमची खाडी या कादंबरीची निवड नॅशनल बुक ट्रस्टने विविध भारतीय भाषांमधील भाषांतरासाठी केलेली आहे. या कादंबरीवरील दूरदर्शन मालिकाही पूर्ण होत आली आहे.

कर्णिक एसटीमध्ये प्रसिद्धी अधिकारी होते. मुख्यमंत्र्यांचे स्वीय कार्यवाह होते. भाऊसाहेब वांदोडकरांच्या कारकीर्दीत गोव्यात प्रसिद्धी प्रमुख होते.

लघुउद्योग महामंडळातही ते जनरल मॅनेजर होते. आपल्या कोकणातील जन्मगावी एक काच कारखाना उभारण्यासाठीही त्यांनी काही वर्षे घालविली. उद्योग क्षेत्रातल्या या अनुभवातून, अडीअडचणींतून कर्णिकांच्या काही कथा-कादंबऱ्यांना मालमसाला मिळाला.

लेखनाबाबत वरिष्ठ अधिकाऱ्यांनी काही बंधने घालण्याचा प्रयत्न केला तेव्हा कर्णिकांनी नोकरीचा राजीनामा दिला. लेखनालाच पूर्णतया वाहून घेण्याचे ठरवले. आपली बारा एकर जमीन वनराई प्रकल्पाला भेट देऊन ग्रामविकासाला चालना दिली. मुंबईत वास्तव्य असले तरी कर्णिक कोकणातील आपल्या गावाच्या विकासासाठी मायेने धावून जात असतात. कर्णिकांच्या हास्यात सर्वांना बरोबर घेऊन जाण्याचा दिलासा दिसतो आणि थोरल्या भावाच्या भूमिकेतून सर्वांशी आत्मीयतेने वागण्यातले समंजस-सौजन्यही आपल्या मनाचा ठाव घेते. कसलेही अवडंबर न माजवता, साधेपणाने सर्वत्र संचार करण्यातला त्यांचा स्वभाव त्यांच्या मित्र-परिवाराचे वर्तुळ सतत व्यापक करीत राहतो. साठीच्या आत साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी विराजमान होणाऱ्या कर्णिकांनी अध्यक्षपद म्हणजे साहित्य क्षेत्रातील कामगिरीची परिणती असे न मानता, नवी झेप घेण्याची संधी असे मानून आपल्या प्रतिभेच्या तेजाने स्तिमित व्हावे असा काही चमत्कार करून दाखवायला हवा.

('साप्ताहिक सकाळ'च्या सौजन्याने)



अनुक्रमणिका








# पांगिरा : विश्वास पाटील

## गावपांढरीच्या बदलत्या मातीची कर्मकथा

प्रा. म. द. हातकणंगलेकर

'पानिपत' या ऐतिहासिक कादंबरीच्या प्रचंड लोकप्रियतेमुळे श्री. विश्वास पाटील यांचे नाव सर्वतोमुखी झाले आहे. मराठीतील केवळ सामान्य वाचकांनीच नव्हे, तर ज्येष्ठ साहित्यिकांनी आणि समीक्षकांनी 'पानिपत'च्या समर्थ साहित्यगुणांचे मनापासून कौतुक कले आहे. एका तरुण लेखकाने एवढ्या प्रचंड आवाक्याच्या ऐतिहासिक घटनेचे इतके सर्वस्पर्शी आणि प्रभावी चित्रण करावे याचा त्यांना विस्मय आणि आनंद वाटलेला आहे. या यशामुळे श्री. विश्वास पाटील हे ह. ना. आपटे, नाथमाधव हडप, गो. नी. दांडेकर, बेलवलकर, ना. सं. इनामदार यांच्या मुशीतले ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून स्थिर होणार अशी सामान्य समजूत आणि अपेक्षा रुजत असताना विश्वास पाटील यांनी 'पांगिरा' या नावाची एका वेगळ्या प्रकृतीची, समकालीन वास्तवाचा नेमकेपणाने वेध घेणारी कादंबरी लिहिली आहे.

### गावपांढरीची एका तपाची वाटचाल

नेमकेपणाची साक्ष प्रास्ताविकातच पटते. 'पांगिरा' म्हणजे पांढरीच्या बदलत्या मातीची कर्मकथा. गावपांढरीची एका तपाची झपाट्याची वाटचाल हा या कादंबरीचा विषय. या वाटचालीत काय काय घडामोडी झाल्या ? जिल्हा परिषदा, पंचायत समित्या यांच्या कायद्यानुसार अनेक सुधारणा गाववेशीवर धडकल्या. रस्त्यांचं, विजेचं जाळं, सहकाराचा प्रसार, वाढत्या लोकसंख्येने एकत्र कुटुंबाला गेलेले तडे, जुनी जातिव्यवस्था कमी जाचक झाली. बलुतेदारी जवळजवळ नाहीशी झाली. पंचांच्या साक्षीने न्यायनिवाडा करणारा जुना गावगाडा ढासळला. तालुक्याच्या, जिल्ह्याच्या खेपा वाढल्या. तमाशासारख्या लोककलांचा ऱ्हास झाला. पाटील, कुलकर्ण्यांची सत्ता बदलली. तलाठी, ग्रामसेवक असा नवा नोकरदार वर्ग उदयाला आला. सत्तेचा सारीपाट खेड्यातल्या गल्लीत-आळीत खेळला जाऊ लागला. आमदारकी, जिल्हापरिषद ते पंचायत समिती, सर्व बाबतीत प्रत्येक गावागावांत राजकारण आलं. आपापली माणसं प्रत्येक गावात बांधली गेली. रानाशिवारातली, डोंगरातली झाडांची भयानक तोड, व्यापारी पिकासाठी, पाण्याचा गैरवापर, यामुळे निसर्गाचं संतुलन बिघडलं. किती गावं संपन्नतेपासून दुष्काळाकडे सरकू लागली. पिण्याच्या शेतीच्या पाण्याचा प्रश्न गावोगाव उभा ठाकू लागला. पांगिरा, डोंगरवाडीसारखी गावे एकमेकाला खायला उठू लागली. कष्टकरी शेतकऱ्यांच्या मालाला योग्य दर भेटेनासा



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



झाला.

**मोठ्या श्रेयाचे पहिले दमदार पाऊल**

स्वातंत्र्योत्तर काळातल्या ग्रामीण जीवनातल्या भल्याबुऱ्या बदलाचे प्रातिनिधिक आणि एकजिनशी चित्रण करणारी साहित्यकृती निर्माण होत आहे असे दिसत नव्हते. याची कारणे अनेक होती. एक तर हे बदल जवळून पाहणारी, त्यामागचे सत्ताकारण जाणणारी आणि भोगणारी मंडळी साहित्यक्षेत्रात विश्वासाने उभी राहत नव्हती. ग्रामीण जीवनाचे आकलन आणि चित्रण अजुनी व्यक्तिनिष्ठच राहिले होते. मध्यमवर्गीय लेखकांनी रूढ केलेल्या साहित्यिक संकेतांपासून आणि आदर्शापासून ते दूर होऊ शकत नव्हते. त्यामुळे स्वातंत्र्योत्तर काळातले ग्रामीण जीवनाचे चित्रण दरिद्री बलुतेदारांची कणवेने केलेली रेखीव व्यक्तिदर्शने, खेडुत माणसांच्या मागसलेपणावर, अज्ञानावर, आडमुठेपणावर, अंधश्रद्धेवर, बारीक-सारीक स्वार्थावर आधारलेल्या कहाण्या, विनोदी किस्से, बायामाणसाच्या लफड्यांच्या चटकदार हकीकती, यापुरती मर्यादित होते. दूरस्थ मानवतेचे, रंजकतेचे, अद्‌भुतरम्यतेचे आवरण त्याभोवती होते. शिवाय ते त्रुटित, अल्पावकाशी होते. या जीवनाचा दीर्घ, संमिश्र पट क्रमाक्रमाने उलगडत जाणारी साहित्यकृती निर्माण होत नव्हती. माडगूळकर, बोराडे, मिरासदार, यादव यांचे ग्रामीण साहित्य गुणवान, सकस असले तरी या जीवनाचा विस्तृत पट मांडणारे नाही. र. वा. दिघे यांनी मोठा फलक वापरला, त्याचे चित्रण ग्रामीण जीवनाला अनुरूप अशा संथ गतीचे आणि मोठ्या आवाक्याचे होते पण त्यात गतिमानतेचे, सामाजिक स्थित्यंतराचे भान कमी होते. 'पांगिरा'च्या निमित्ताने प्रातिनिधिक, गतिमान, ग्रामीण समूहाच्या दर्शनाचा मोठा लक्षणीय प्रयत्न श्री. विश्वास पाटील यांनी केला आहे यात शंका नाही. मोठ्या श्रेयाचे हे पहिले पण दमदार पाऊल वाटते.

पांगिरा, डोंगरगाव या दोन खेड्यांची ही कहाणी. यातले माणसांचे सामुदायिक आयुष्य आणि त्यातले चढउतार हीच या कादंबरीतील प्रधान पात्रे. तशा व्यक्ती अनेक आहेत, पुढारीपणा करून गबर, बेगुमान झालेली ठळक माणसे पण आहेत. पण ही सारी कादंबरीच्या सामूहिक जाणीवा साकार करणारी. या कादंबरीत ती वावरतात म्हणून ही कादंबरी त्यांच्याविषयी आहे असे नाही. ही दोन खेड्यांची आणि त्यांचे सत्त्व नाहीसे करणाऱ्या आर्थिक, राजकीय बदलाचीच कादंबरी आहे. कादंबरीला हे स्वरूप प्राप्त करून देणे आणि ते टिकवून धरणे हे साध्या आकलनाचे आणि निवेदनाचे काम नव्हे. त्याला मोठी धारणा आणि निर्मितीक्षमता यांचीच गरज असते. त्या गोष्टी या कादंबरीत निश्चितपणे आढळतात.

पांगिरा, डोंगरवाडी ही दोन गावे. डोंगरवाडी ही पांगिराची धाकटी बहीण. पांगिरा गावात दोन तट. सत्तारूढ पक्षाचा पदर धरणाऱ्या सोकाजीराव डोकरे सरपंचाचा एक गट आणि त्याच्याविरुद्ध, विरोधी पक्षाची कास धरणाऱ्या पोलिस पाटील ज्ञानू सावळाचा दुसरा

गट बाकीची माणसे पोलिस पाटील ज्ञानू सावळा, मुरार पाटील, भिकू अण्णा, सदा वाणी, विचारे गुरुजी, शिरपा अडीसरा, चिणू गुणाजी, तान्या भिलारे, तायना कांबळे इ. ज्ञानू सावळाच्या नाकावर टिच्चून सोकाजीरावाने डेअरीची परवानगी मिळविली होती. तिथून कादंबरीच्या घटनांना तोंड फुटते. त्याच वेळी गावची जत्रा भरलेली असते आणि जत्रेची पट्टी जमा करण्याचे काम सुरू असते. दोन गावात त्यासंबंधी वितंडवादच सुरू होतो. तमाशा मात्र साऱ्यांनाच सुखाचा. तमाशाचे अस्सल, खुमासदार, वास्तववादी वर्णन विश्वास पाटलांनी केले आहे. त्यातला ढंग आणि चटका मुळातूनच वाचायला हवा. जत्रेचा भाग म्हणून सिदूबाचा रथ काढतात. त्याचे दर्शनही प्रत्ययकारी आहे. सिदूबाच्या जयजयकारात रथ पुढे सरकू लागला. रथापुढे वांझुट्या बाया गडबडा लोळू लागल्या. आजारी तान्ही बाळं आडवी ठेवली गेली. गुलाल, खोबऱ्याचा पाऊस पडू लागला. गरिबाघरची पोरं गर्दीत घुसून खोबरं वेचू लागली. माणसं जत्रंत हरवली. जत्रा माणसात हरवली.

हे झालं परंपरेतलं गाव. त्यातल्या बदलाचा अंदाज घेण्यासाठी या भागात शर्मा नावाचा तरुण कृषिसंशोधक आलेला आहे. तो चहूबाजूने हिंडून उसाची शेती भक्कम करणाऱ्या शेतकऱ्यांना भेटून, त्यांच्याकडून माहिती मिळवत आहे. गावची वाढती श्रीमंती त्याला रंगीत माडीची घरं, ट्रॅक्टर, बाजारपेठ, हॉटेल, दोन-चार ऊसकेंद्रे यातून जाणवते. ऊस पिकवणारी माणसं वेगळी, ऊस तोडणाऱ्या, जगण्यासाठी बाहेर पडलेल्या टोळ्या वेगळ्या. ऊसानं आलेल्या बरकतीबद्दल अण्णा रंगात येऊन सांगतात, "लाव ऊस आणि ओढ गोणी, पांगिऱ्यावानी नाही कुणी!" पूर्वी मोटरने पाण्याचा उपसा होत होता पण जशी वीज इंगळीसारखी रानाला डसली तसा ऊस वाढला. सारंच वाढलं.

आमदार बाबा सावंताच्या हस्ते दूध डेअरीचे थाटात उद्घाटन. पुढच्या निवडणुकीत शंभर टक्के पाठिंब्यांचे आश्वासन. डेअरी सुरू झाली आणि घरातले बहुतेक दूध डेअरीवर जाऊ लागले. मुलाबाळांची, तगड्या माणसांची आबाळ सुरू झाली. पैसे वाढले आणि मधल्या माणसांचे, चेअरमनसाहेबांचे पैसे खाणेही वाढले. बेरकीपणाची शिकवणच मिळू लागली.

मुरार पाटील आणि सोकाजीराव यांच्यामध्ये एका जमिनीच्या तुकड्यावरून कोर्टकचेरी सुरू झाली. या प्रकरणाचे विश्वास पाटील यांनी केलेले वर्णन आणि विवरण त्यांच्या प्रत्यक्ष अनुभवाची आणि निरीक्षणाची खात्री पटवते. त्यातले मध्यस्थ, वकील, कागदी अर्थ आणि डावपेच न संपणाऱ्या ईर्षा आणि राजकीय पाठबळ नसणाऱ्या माणसाची क्रमाक्रमाने होणारी नागवणूक पाटलांनी मोठ्या जाणकारीने आणि कौशल्याने वर्णन केलेली आहे. तसेच एकजुटीने पिढ्यान् पिढ्या राहणाऱ्या घरात कली शिरला की कशी भांडणे पेटतात आणि फाटाफूट होते याची वाटचालही ते बारीक नजरेने टिपतात.

सोकाजी, मुरार पाटलांचे वैमनस्य, तिढ्यातिढ्याने पुढे सरकत जाते. दुसऱ्या पिढीतली पोरं शिकून मोठी होतात. हरिजन घरातली पोरंही शिक्षणानं सुधारतात. वरच्या जातीतल्या

मुलीबरोबर लग्न करतात. निवडणुका झडतात आणि त्यासाठी दारूची दुकाने काम करू लागतात. त्यातून सत्ता निर्माण होते. कधी या गटाच्या हातात तर कधी त्या, पण स्वार्थापोटी जीवघेणी स्पर्धा सुरू होते. गावागावांत भांडणे पेटतात. गावाचे पाणी तुटते. कधी माळ पिकतो तर मागणी पडते. तसा ताळमेळ राहत नाही. राजकारणी, धनदांडगे, त्यांचे लाचार आश्रित यांचे नशीब फळफळते, पण सामान्य कष्टकरी माणसांचे आयुष्य हालअपेष्टांनी भरलेलेच राहते. ज्या पाण्यावर शेतीची श्रीमंती जोपासणार ते पाणीच चोरण्याचा बनाव घडतो आणि साधीसुधी माणसे कष्टाचे जिणेच ओढू लागतात. संपन्न आयुष्याच्या आशेने ज्या सुधारणा आणल्या त्यामुळे माणसाची माणुसकीच छिन्न विछिन्न होऊन जाते.

एकेकाळच्या पांगिऱ्यांचे सुरेल चित्र–

*माज्या पांगिरच्या रानी*
*झुळू झुळू वाहतं पाणी*
*गवर नाचती हिरव्या रानी*
*झाडं डुलत पानुपानी*
*मोरलांडूर गाती गाणी*
*माझ्या पांगिरच्या रानी*

नंतरची त्याच गावची अवस्था काय झाली ? गावमातीचा जुना गंध गेला. लाभासाठी, लोभासाठी एकमेकांच्या बोकांडी बसून नख लावू लागलेली. मातीतला, उरातला ओलावा केव्हाच आटला होता. नवलाख रंग पिसावर घेऊन कोवळ्या उन्हात वावरणारे पोपटांचे थवे नाहीसे झालेले, गाव आठवणीतले आणि गाव बदलत्या वास्तवातले !

### निवेदनाची जात लोकसाहित्याच्या वळणाची

विश्वास पाटील यांची शैली ही त्यांच्या लेखन श्रेयाचे महत्त्वाचे अंग आहे. ती लोकसाहित्यात जन्मलेली, रमलेली शैली आहे. विषयाला सतेज त्वचेसारखी घट्ट बिलगलेली. तिची उदाहरणे पानोपानी सापडतात. केवळ शब्द, म्हणी आणि वाक्प्रचारच बोली भाषेतले नाहीत, निवेदनाची जातही लोकसाहित्याची आहे. मन मात्र समकालीन ग्रामीण वास्तव तल्लख चोचीत पकडणारे. त्यामुळे वास्तवावर अधिक मोठे जाळे टाकणाऱ्या दमदार साहित्यकृतीची अपेक्षा 'पांगिरा' वाचणाऱ्या वाचकांच्या मनात निर्माण होणे साहजिक आहे.

(पांगिरा : विश्वास पाटील, ग्रंथाली, मुंबई २८, पृष्ठे २०६, साठ रुपये. प्रथमावृत्ती– डिसेंबर १९९०)

(प्राचार्य म.द.हातकणंगलेकर, निर्वेद, कुपवाड रस्ता, विश्रामबाग, सांगली ४१६४१५)



अनुक्रमणिका







# गूढयात्री : विद्या सप्रे- चौधरी
## जीएंच्या अंतर्जीवनाचा धाडसी वेध

**शंकर सारडा**

गूढयात्री ही जी. ए. कुलकर्णी यांच्या वैयक्तिक आणि वाङ्मयीन जीवनाचा वेध घेणारी कादंबरी. जी. ए. कुलकर्णीनी सव्वाशेवर कथा, दहा-अकरा अनुवादित पुस्तके, दोन बालकथा, एक आत्मकथनपर दीर्घकथा, असे लेखन केले; परंतु त्यांनी जन्मभर स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचे खाजगीपण जपले. सभा-संमेलने, मुलाखती, पुणे-मुंबई दौरे, दूरदर्शन-आकाशवाणी वगैरे झगमगाटापासून स्वतःला दूर ठेवले. आपला फोटोदेखील ते कोणाला काढू देत नसत. घरी आलेल्या रसिक-वाचक मित्रांनाही ते न भेटता कटवत. धारवाडच्या ज्या कॉलेजात पंचवीस वर्षे प्राध्यापकगिरी केली त्या कॉलेजातल्या मोजक्याच सह-प्राध्यापकांशी त्यांच्या गप्पागोष्टी होत. जी. ए. अविवाहित होते. वर्गात शिकवताना मुलींकडे बघतही नसत म्हणे. दोन मावसबहिणी त्यांच्याजवळ राहत. क्लबमध्ये ते जात; पण इतरांना ते चार हात दूरच ठेवत. 'काजळमाया'ला साहित्य अकादमीचे मिळालेले पारितोषिक आणि ते परत करण्याचा त्यांचा निर्णय, त्यावर गाजलेली चर्चा... निवृत्तीनंतर पुण्याला त्यांचे वास्तव्य झाले, पण तेथेही ते कोणाला सहसा भेटत नसत. पूर्वपरिचितांनाही ते टाळत. त्यामुळे कर्करोगाने आकस्मिक निधन (११ डिसेंबर १९८८) झाल्याची बातमी ही सर्वांनाच धक्कादायक वाटली. जनसामान्यांना ज्ञात अशा ह्या काही मोजक्याच घटना आणि आपण होऊन स्वीकारलेले हे एकांत-अज्ञातवासातले जीवन, यामुळे जीएंच्या मित्रांनाही त्यांच्याबद्दल फार थोडी वैयक्तिक माहिती असे. साहजिकच जीएंच्या जीवनावरील कादंबरी त्यांची एक विद्यार्थिनी विद्या सप्रे-चौधरी या लिहीत आहेत, ही बातमी वाचल्यावर कुतुहल वाटणारच. तशात लेखक म्हणून काहीच पूर्व-प्रतिमा नसलेली ही विद्यार्थिनी; ती जीएंच्या जीवनावर लिहिणार तरी काय आणि कसे, असाही प्रश्न पडला तर नवल नव्हते. जीएंच्या गूढ व्यक्तिमत्त्वाचे आणि उत्तुंग प्रतिभेचे विविध पैलू पकडणे हे काम काही सोपे नव्हे. ते या नव्या लेखिकेला कितपत जमेल अशी शंकाही वाटे.

### दीर्घकालीन परिचय

परंतु या सर्व शंका निराधार ठराव्यात, दूर व्हाव्यात अशी ही चरित्रकथा जमली आहे. जीएंच्या उपलब्ध साहित्याचा, पत्रव्यवहाराचा आणि परिचितांनी लिहिलेल्या-सांगितलेल्या आठवणींचा अत्यंत समर्पक आणि चपखल वापर करण्यात विद्या सप्रे-चौधरी यांनी किंचितही कुचराई केलेली नाही. जीएंच्या जीवनातील काही घटनांच्याही त्या



अनुक्रमणिका

योगायोगाने साक्षीदार असल्याने, तद्वतच प्रारंभी जीएंच्या विद्यार्थिनी आणि त्यांच्या वाङ्मयाच्या अभ्यासक आणि नंतर धारवाडलाच वास्तव्य असल्यामुळे जीएंच्या संपर्काचा दीर्घ काळ लाभ झाल्याने या सर्वच लेखनाला वास्तवाची बैठक आहे; विश्वसनीयता आहे हेही लक्षात घ्यावे लागते. जीएंच्या अंतरंगात लेखिकेने प्रवेश मिळविला आहे, जीएंच्या भावविश्वाचे गडदगूढ कोपरे तिने धुंडाळले आहेत; आणि जीएंच्या अंतर्जीवनातील संघर्षाचाही सहृदयतेने वेध घेतला आहे, असे या पुस्तकावरून आपल्याला आढळून येते.

विद्या सप्रे यांची भाषाशैली ही जीएंच्या भाषाशैलीशी बरीच जुळणारी आहे. या कादंबरीचा मोठाच भाग जीएंच्या प्रथमपुरुषी निवेदनाने व्यापलेला आहे. या निवेदनात जीएंच्या कथा आणि जीएंची निरनिराळ्या व्यक्तींना लिहिलेली पत्रे यांमधील उतारे आलेले आहेत. ते उतारे आणि लेखिकेने लिहिलेली वाक्ये, या दोहोंमधला फरक जाणवू नये इतके हे रसायन एकरूप झालेले आहे. 'जुन्या सागवानी पेटीत केवडा-बकुळ ठेवून जतन करून ठेवलेल्या महावस्त्रासारखी होती कमलताई.' 'पलीकडे टेकडीपर्यंत सारं स्वच्छ विंचरलेलं, निळसर दिसत होतं. एखादी लाट गोठल्याप्रमाणे दिसणाऱ्या चढ-उतारावरील आंब्या-फणसांची, सुरू-नारळीची झाडं स्तब्ध होती. कारंज्यांवर फेस दिसावा त्याप्रमाणे फुलांचा पांढरा रंग. ठिकठिकाणी शिंपडलेली आकाशमोगऱ्याची झाडं त्या हिरवाईत उठून दिसत.' अशासारखी वाक्यं वाचताना ती विद्या सप्रे यांची आहेत की जीएंची, असाही संभ्रम पडेल. "सर, तुमची भाषा कवितेशी नातं सांगणारी, अगदी स्वाभाविकपणेच प्रतिमांमधून बोलणारी ! तुमच्या मराठीचा पोतच कुलवंत, रेशमी इरकली लुगड्याप्रमाणे झळकणारा ! तुमची प्रतिमाच विजेप्रमाणे डोळे दिपवणारी– मिटल्या डोळ्यांपुढेही तेजस्वी उधळण करणारी ! (पृष्ठ १९)," असे लेखिका जीएंच्या भाषावैशिष्ट्याचे स्वरूप सांगते; त्याचाच वारसा ती स्वतःही गिरवताना दिसते. तोही सहजतेने.

**प्रेमकथेला केंद्रस्थान**

जीएंच्या जीवनाचे हे चित्र उभे करताना लेखिकेने जीएंची प्रेमकथा ही केंद्रस्थानी बसवून, जीएंच्या वर्तनातील एकलकोंड्या तुसडेपणाची, अलिप्तपणाची आणि लेखनातील शोकात्म नियतिवादी आत्मशोधाची संगती लावली आहे. 'लेखकाच्या चरित्रातील एखाद्या घटनेचा उपयोग, त्याच्या एखाद्या कलाकृतीचा उलगडा अधिक चांगल्या रीतीनं करून घेण्यासाठी होत असेल तर तसा तो अवश्य करून घ्यावा; परंतु त्यापलीकडे मात्र लेखकाच्या चरित्रात डोकावण्याचा समीक्षकाला अधिकार नसावा,' असे एक सूत्र लेखिकेने मनोगतात, आपल्या सहकारी प्राध्यापकाचे म्हणून उद्धृत करून, 'ही मर्यादा कटाक्षाने पाळल्याची' हमी दिली आहे.

जीएंच्या चरित्रात अशी प्रेमभंगाची कहाणी मध्यवर्ती बसवून जीएंच्या साहित्याचे आणि व्यक्तिमत्त्वाचे त्या अनुषंगाने वेगवेगळे पदर उलगडत जाणे, हे लेखिकेने अत्यंत

चातुर्याने आरंभापासून अखेरपर्यंत सांभाळले आहे. जीएंचा प्रेमभंग झाल्याने ते अविवाहित राहिले हे बहुतेकांना ज्ञात आहे; पण त्या कहाणीचा तपशील मात्र आजवर अज्ञात होता. त्या घटनेच्या वेगवेगळ्या टप्प्यावरची साक्षीदार या नात्याने लेखिकेने या कहाणीचे निवेदन ठामपणाने आणि आत्मविश्वासाने केले आहे.

कमल ही जीएंची विद्यार्थिनी. गॅदरिंगमध्ये तिचे नृत्य गाजले. तिची शारदा नाटकातली भूमिकाही गाजली. जी. ए. तिला मराठी शिकवायला तिच्या घरी जात. एका संक्रांतीला हलवा देताना तिने रुमालावर निळ्या रेशमाने भरलेल्या अक्षरांतून आपले मनोगत प्रकट केले : "मी तुमच्या आयुष्यात येऊ शकेन का?" आपल्या व तिच्या वयातील अंतर, तिच्यावरील भावंडांची जबाबदारी, आपली संभाव्य आर्थिक स्थिती या सर्वांचा विचार करून जी. ए. तिला म्हणतात, "जर तुझ्या माझ्याविषयीच्या भावना एवढ्या तीव्र असल्या तर लग्नाचा विचार न ठेवता आपण भेटत राहणे बरोबर नाही. विवाहबद्ध व्हावं हे बरं." तीही 'लवकरात लवकर लग्न करू' म्हणते. लग्नानंतर राहण्यासाठी एक प्रशस्त बंगला जी. ए. भाड्याने घेतात– 'स्वप्नभूमी' नावाचा... ती त्यांच्यासाठी अंगठी आणते. गौतम बुद्धाची मूर्तीही भेट देते. एका कागदावर त्यांची पदमुद्रा घेऊन ठेवते. दिवसभर पिकनिकला जाऊनही जी. ए. तिला स्पर्श करत नाहीत. 'तुझा हात प्रथम धरायचा तो विवाहाच्या वेळीच... देवाब्राह्मणांच्या साक्षीनं, कुलवंताच्या घरची होणाऱ्या सुनेनं एवढा संयम पाळायलाच हवा.' ख्रिसमसच्या सुटीत लग्नाचा बार उडवून द्यायचे ठरते. घरच्यांना कल्पना न देता, पण त्रिपुरेश्वराच्या मंदिरात आवश्यक ते धार्मिक विधी करून सनई, फोटोसह. परंतु लग्नाच्या मुहुर्ताला ती येतच नाही. दिवसभर वाट पाहून भटजी थकतात. तिच्या घराला कुलूप. त्या धक्क्याने तीन दिवस जी. ए. घरात कोंडून घेतात. अर्धवट ग्लानीत असतात. घरमालक कॉलेजमध्ये ही बातमी पोचवतात. सहकारी प्राध्यापक येतात. शुश्रूषा, औषधोपचार... जी. ए. स्वतःला सावरतात. काहीच घडले नाही, असे समजून कॉलेजला येऊ लागतात.

### जीएंचे दर्शन

या काळात सहा-सात वर्षांची चिमुरडी विद्या ही कमलकडे नृत्याचे शिक्षण घेत असते. जीएंना बघत असते. जीएंकडून कौतुक करून घेत असते. धारवाडच्या धोतर-टोपी संस्कृतीत साहेबी सुटा-बुटातले जी. ए. गव्हर्नर म्हणून ओळखले जात. एस. एस. सी.ला बोर्डाला नंबर लावणारी पहिली मुलगी विद्या पुढे जीएंची विद्यार्थिनी होते. जीएंचे संग्रह त्यांच्याकडून मिळवून वाचते. त्यांचे मार्गदर्शन मिळवते.

ते तिला वाचनालयातून पुस्तके मिळवून देतात. कथा-कविता लेखनात, मार्गदर्शन करतात. अमुकतमुक वाच, असे सांगतात. स्कोअरिंगसाठी संस्कृत घेतलेल्या विद्याला बोलावून मराठी घ्यायला लावतात. "उद्या खूप मार्क मिळतील म्हणून कॉलेजनं कोंबडीची पिसं मोजायचा विषय ठेवला, तर तो घेणार का?" असा त्यांचा प्रश्न. त्यांनी शिकविलेली

गोविंदाग्रजांची वाग्वैजयंती, फडक्यांची जादूगार. तिने लिहिलेली कादंबरी वाचून दिलेला सल्ला. (आधी खूप वाच म्हणजे लेखन वाचनीय ठरेल) विद्याच्या कवितांचं केलेलं कौतुक, चित्रकलेवरची चर्चा. . . एम. एस्सी. झाल्यावर विद्याचा विवाह; परंतु संसारात बेबनाव. १९७० मध्ये पुन्हा धारवाडला येऊन कर्नाटक कॉलेजात प्राध्यापिकेची नोकरी. त्यामुळे जीएंशी पुन्हा जुळलेले नाते. 'मीरेवर लिही... अभ्यास कर.' हे मार्गदर्शन.

कमलने पुन्हा सरांशी संपर्क साधण्यासाठी केलेला धारवाडचा दौरा. त्या वेळी विद्याकडेच असणारा मुक्काम. विद्याकडे खुले केलेले हृद्गत. . . जीएंचे विकोपाला चाललेले डोळ्यांचे दुखणे... पुण्याला जाण्याचा त्यांचा निर्णय... कमलने परत केलेली सौभाग्यलेणी जीएंना पोहोचवण्याची कामगिरी पुन्हा विद्यावरच येऊन पडलेली; आणि त्रिपुरेश्वराच्या कुंडात त्यांचे विसर्जन करण्याची जबाबदारीही जी. ए. सोपवतात ती विद्यावरच. साहजिकच जीएंच्या जीवनकथेवर लेखन करण्यासाठी आवश्यक असा बराच भाग विद्या सप्रे यांना आपोआपच लाभलेला आहे; आणि जीएंच्या वाङ्मयाच्या व्यासंगाची आवड मुळापासून असल्याने त्या आघाडीवरही त्यांची तयारी जंगी आहे. 'गूढयात्री'ही कादंबरी त्यामुळेच जीएंच्या गूढरम्य व्यक्तिमत्त्वाचे अनेक कोपरे प्रकाशझोतात आणून उजळवून टाकते. "अडीच तपे तुमच्या निकट वावरण्याची माझी पुण्याई असल्यामुळे" जीएंबद्दलचे गैरसमज दूर करून, त्यांचे विलोभनीय व्यामिश्र व्यक्तिमत्त्व लोकांपुढे उभे करण्याची जिद्द विद्या सप्रे यांनी बाळगली आहे. "तुमच्या साहित्याची मुळीच जाण नसतानाही तुमच्याशी खोट्या मोठेपणासाठी जवळीक साधू पाहणाऱ्यांना तुमच्या स्वभावातील खारटपणाचीच चुणूक दिसे. . . त्या खारट समुद्राला रत्नाकर असंही का म्हणतात हे इतरांना पटवून द्यायला मी निघाले तर तुमची परवानगी आहे ना ?" असेही त्या प्रास्ताविकात विचारतात.

### पात्रमुखी निवेदनाचे तंत्र

जीएंची ही कथा सांगताना पात्रमुखी निवेदन तंत्राचा वापर करण्यात आला आहे. एकूण दहा प्रकरणांपैकी दोन, चार, सहा, आठ, दहा ही सम प्रकरणे जीएंच्या म्हणजे कथाकाराच्या प्रथमपुरुषी निवेदनातील आहेत. पहिले (४ पृष्ठे) पाचवे (२० पृष्ठे) आणि नववे (३० पृष्ठे) ही प्रकरणे लेखिकेच्या म्हणजे विद्या या पात्राच्या आत्मनिवेदनाची आहेत. सात पृष्ठांचे तिसरे प्रकरण हे जीएंच्या कॉलेजमधील सहकारी प्राध्यापकाच्या मनोगताचे आणि २५ पृष्ठांचे सातवे प्रकरण कमलच्या आत्मकथनाचे आहे. कमलला जीएंनी दिलेल्या सौभाग्यलेण्यांच्या विसर्जनाच्या वेळचे मनातील विचार सांगून जीएंच्या चरित्रकथेच्या लेखनाचा संकल्प विद्या सोडते हे पहिले प्रकरण. दुसरे प्रकरण जीएंच्या मृत्यूच्या आदल्या दिवसाच्या घटनांचे आणि त्या वेळी होणाऱ्या भास-आभासांचे आरंभी दर्शन घडवते. मृत कमलची देदीप्यमान सौंदर्यमूर्ती डोळ्यांसमोर उभी राहते. 'अरे, आपली भेट झाली होती.

कोमल हातांनी मी अतिशोभिवंत स्वप्नं तुझ्या डोळ्यांवर ठेवत गेले आणि त्यांचं मूल्यही मी शोषून घेतलं.' तेव्हा कथाकार उत्तर देतो, 'मग कदाचित तू तीच असशील. माझी भाग्यदेवता. तुझ्या भेटीसाठीच तर पावलं रक्तओली करत मी आयुष्यभर वणवणलो.' पुढे कमलच्या आरंभीच्या भेटी, तिचे कॉलेजमधले नृत्य, शारदा नाटकातले काम, तिच्याशी होणाऱ्या गप्पा व विवाहाची योजना येथपर्यंतचा तपशील या प्रकरणात येतो. कथाकाराचे कॉलेजमधील आधीचे दिवस, स्टाफरूममधील वातावरण, हास्यविनोद आणि विवाहसमारंभाचा विचका झाल्यावर, दारे-खिडक्या बंद करून ग्लानीमध्ये काढलेले तीन दिवस; सहकारी प्राध्यापकाच्या पत्नीने केलेली शुश्रूषा व त्यापुढे जीएंच्या वृत्तीत आलेला माणूसघाणेपणा– याची काही चित्रे तिसऱ्या प्रकरणात येतात. चौथ्या प्रकरणात कथाकार लग्नाच्या तयारीचे, नंतरच्या वैतागाचे वर्णन करून 'माझी अशी अवहेलना करण्याचा तिला काय हक्क होता ? खेळ मांडलाही तिनंच; मोडलाही तिनंच. पण या खेळात माझा मात्र जीव गेला.' 'तिच्या कुजकट आठवणीचा शेवाळी पडदा माझ्या संगमरवरी सौंदर्यविश्वात फडफडत राहतो,' असे आपले अंतःकरणातले शल्य प्रकट करतो. थडग्यावर ओलं चांदणं पसरावं तशी सावळी हुरहुर वेढून राहते. देव, दैव, नियती ही रानटी माणसं आपत्ती-दुःखाचे धोंडे लहानपणापासून माझ्यावर फेकून माझा चेचून बळी देताहेत (पृष्ठ ८४) अशी आत्मकणवही कधी जाणवते. लेखना-वाचनाचा कैफ पुरेनासा झाला की सिगेरटचा झुरका घेण्याची तल्लफ येई. धाकट्या बहिणीचा मृत्यू, शॅलॉट, माणूस नावाचा बेटा, राधी इ. कथांचे संदर्भ, पहिल्या कथासंग्रहाची प्रसिद्धी, माधव आचवलांची भेट, मावसबहिणींचे घरी आगमन, रक्तचंदनला मिळालेले राज्य सरकारचे बक्षीस वगैरे विषयही या प्रकरणात येऊन जातात. प्रयाग– अलाहाबाद दौरा, सत्यकथेचे रौप्यमहोत्सवी वर्ष, भैरप्पांची वंशवृक्ष कादंबरी, करेव्वा, उडपीच्या मंदिरातील पाठमोऱ्या कृष्णाची कथा, आचवलांनी लिहिलेले समीक्षात्मक लेखन, हस्तसामुद्रिक व ज्योतिष्यांचे अनुभव, काजळमायाची अर्पणपत्रिका, अकादमीचे बक्षीस, "भरलेले ताट समोर आले तरी लगेच देवाचे आभार मानू नयेत बाबा. कारण ताटातलं अन्न पोटात जाईलच याची खात्री नसते," या आईच्या उद्‌गारांचे स्मरण, नंदाचे लग्न, इडिपस रेक्स, मामांचा मृत्यू, बेळगावमधील बालपणच्या स्मृती, रमलखुणाचे प्रकाशन, भूतकथांचे जग, संगप्पाने दूर केलेली पिशाच्चबाधा, मुंबईतील डॉक्टर मित्राचा ठरलेल्या भविष्याप्रमाणे झालेला मृत्यू, बेलूर– हळेबीडची शिल्पकला, पाणमाय, कांचनमृग इ. कथांच्या जन्मकथा, दृष्टान्त कथांचे तत्त्वज्ञान, सांजशकुनची सिद्धता हे सारे विषय सहाव्या प्रकरणात येऊन जातात.

आठव्या प्रकरणाच्या आरंभी कमलने स्वप्नभासदृश्यात येऊन "मी आता चालले आहे. तुमच्या शब्दात सांगायचे तर अनंताच्या प्रवासाला. तिथून परतीचा रस्ताच नसतो..." असे सांगितल्याचे दाखवले आहे. "तू दिसणार नसशील तर या डोळ्यांचा मला काय उपयोग ?" असे म्हणून कथाकार आपल्याच डोळ्यांवर मुठींनी प्रहार करतो..."मला किती

मरणं भोगायला लावणार आहात तुम्ही?" "मी भूतकाळाकडे वळून पाहत नाही," एवढ्याच संभाषणाने अठरा वर्षांनंतरचा कमलचा दिलजमाईचा प्रयत्न निकाली निघाला. प्रो. मल्लापुरांनीही आपला कोट काढून दिला आणि तोही एका बैलाला– त्याची कहाणी, स्वामी कथेची जन्मकथा, प्लँचेट, जीएंना प्रेसने अर्पण केलेला काव्यसंग्रह, संध्याकाळच्या कवितांचे झपाटलेपण, इन्ग्रिड बर्गमन, कृष्णी गाय, बळवंत मास्तर, कवठे ही कथा, गंगाधर गाडगीळांनी केलेली 'भोवऱ्यात अडकलेला कलावंत' ही संभावना, डॉनची कुचाळी करतही त्याच्याबरोबर राहिलेला सँको, पिंगळावेळची तयारी, शंकर सारडा यांच्या गुलमोहोरवरील प्रतिक्रिया, काजळमायाच्या पारितोषिकातून केलेला उत्तर भारताचा प्रवास, 'मनोहर', 'किर्लोस्कर' मासिकांबद्दलची प्रतिक्रिया, पु. ल/सुनीता देशपांडे यांची धारवाडला भेट, माधव आचवलांचे निधन, मुग्धासाठी सांगितलेल्या गोष्टी व कॅसेट, पॉप्युलरला विकलेले पुस्तकांचे हक्क, अमोल पालेकरशी कैरीच्या संदर्भात केलेली चर्चा, अनुवादित पुस्तके, ऐंशी सालचा खग्रास सूर्यग्रहणाचा अद्‌भुत अनुभव, पोटदुखी-दातदुखी, फ्ल्यू, इ. तक्रारी, बा. भ. बोरकर यांच्या कविता, डोळ्यांपुढे अचानक आलेली अंधारी, नंतर जवळच्या वस्तूही अंधूक दिसू लागल्याने आलेली सुन्नता, अशा अनेक गोष्टींबद्दलचे निर्देश वा चिंतन या प्रकरणात आले आहे.

### पुण्यातील वास्तव्य

अखेरच्या प्रकरणात कमलची पत्रे न वाचताच फाडून टाकण्यात, तिची बाजू समजून घ्यायचा उदारपणा न दाखवण्यात आपली चूक झाली असा सूर व्यक्त होतो. 'ज्या रत्नासाठी मी ऐहिक जीवन लाथाडलं, तारुण्य सांडलं, रक्त अर्पण केलं, ते रत्न माझ्या ओंजळीत असल्याचा मला भास झाला; ती रत्नप्राप्ती म्हणजे स्वतःच्या दृष्टीत घडून आलेलं परिवर्तन हेही त्यांना जाणवले. (पृ. ३४३). दृष्टी मंदावल्यामुळे वाचन बंद झाले; धारवाड सोडून पुण्याला राहायला जाण्याचा निर्णय, जवळच्या पुस्तकांचा संग्रह वाटून टाकण्यातला उतावीळपणा, प्रा. हातकणंगलेकर यांच्याशी चाललेला पत्रसंवाद, पुण्यातील काही घटना, दिनक्रम, अश्वत्थ वृक्षांची गळून पडणारी आणि 'समजत नाही, समजत नाही' म्हणणारी पाने, आणि कालपुरुषाशी केलेली अखेरची बातचीत–'तू माझ्यापासून खूप हिरावून घेतलेस. त्यामुळे मी तुझ्यावरच्या संतापाने जळत राहिलो हे खरे असले तरी तो सल मनात ठेवू नकोस. आता निघण्याच्या क्षणी माझ्या मनात कसले वैषम्य तर राहिले नाहीच, पूर्वदिखील मी तुझा उगीचच द्वेष केला हे मला जाणवले आहे. मी गेल्यावर एक अद्वितीय भावविश्व पूर्णपणे विरून जाणार आहे. या अंतिम क्षणी तू मला मुक्त, स्वच्छ, निरंजन मनाने निरोप दे.'

त्या वेळी आपल्यासाठी आपली प्राणसखी टांगा घेऊन आली आहे हे जाणून कथाकार तिच्याजवळ उडी मारून बसतो आणि टांगा खडखडत धावू लागतो... असा अंतिम क्षणाचा अहवाल देऊन ही कहाणी संपते.

विद्या सप्रे-चौधरी यांनी जीएंच्या चरित्रकहाणीला कमलवरील प्रेमाचे, प्रेमभंगाचे अंतःसूत्र देऊन त्याद्वारे जीएंच्या कथासृष्टीचे, जीवनदृष्टीचे आणि तुटक वर्तनाचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न केला आहे. हे प्रेमप्रकरण नेमके कधी घडले असावे, त्याचा स्पष्ट उल्लेख नाही. काळाचे उल्लेख संदिग्ध आहेत. 'रक्तचंदन'ला बक्षीस मिळण्यापूर्वी आठ-नऊ वर्षे आधीची ही घटना असल्याचा उल्लेख 'व्यवसायबंधू'करतात. (पृष्ठ ६८). कमल परत जीएंना भेटायला धारवाडात येते ती १८ वर्षांनी. ती जीएंच्या प्रेमात पडते तेव्हा ते तीसपेक्षा जास्त वयाचे असतात. म्हणजे कमल बी.ए.च्या शेवटच्या वर्षाला असताना नाताळात लग्नाची तारीख नक्की होते (१९५८). त्यानंतर अठरा वर्षांनी भेट. परंतु १९५८ पूर्वीच्या जीएंच्या कथांतही स्त्रीविषयक तुसडेपणा आणि त्यांच्या वर्तनातला तुटकपणा आढळतोच. त्यामुळे या प्रेमभंगाच्या कहाणीचे मध्यवर्ती सूत्र पूर्णतया स्वीकारणे अवघड ठरते. तरीही विद्या सप्रे-चौधरी यांनी ते सबंध कादंबरीभर मोठ्या हिकमतीने खेळवले आहे; जीएंच्या दृष्टिदोषाशी त्याची सांगड घातली आहे; तसेच तिच्या मृत्युसमयी ती त्यांना भेटून जाते; जीएंच्या अंतिम क्षणीही त्यांच्यासाठी स्वर्गीय वाहन घेऊन येते, वगैरे आभासदृश्ये रेखाटून या नात्याचे गांभीर्य आणि अरभाटपण प्रकट केले आहे. ही कमल कोण, याबद्दलचे काही तर्क केले जात; त्यावरही त्यामुळे पडदा पडू शकेल.

प्रेमभंगाचे हे सूत्र बाजूला ठेवूनही जीएंच्या कथानिर्मितिप्रक्रियेवर, जीएंच्या जीवनात आलेल्या व्यक्तींवर, जीएंच्या मित्रांवर, वाङ्मयीन आणि अन्य विषयांवरील मतांवर, जीएंच्या चौफेर वाचनावर, अतींद्रिय मानसशास्त्र-चेटूक– गूढवाद– रमलविद्या वगैरे विषयांच्या अभ्यासावर या पुस्तकात तपशीलवार मजकूर देण्यात आला आहे. जीएंच्या लेखनातील आणि पत्रांमधील उतारेच्या उतारे समाविष्ट करण्यात आले आहेत. प्रथमपुरुषी निवेदनामुळे जीएंची स्वतःची भूमिका तर कळतेच; विद्या, कमल आणि व्यवसायबंधू यांमुळे जीएंचे कॉलेजातील अध्यापनकौशल्य, क्लबवरील सहकाऱ्यांशी असणारे संबंध, विद्यार्थ्यांशी असणारे नाते, आर्थिक नेमस्तपण, आदरातिथ्याचा आग्रह, तसेच प्रेयसीच्या दृष्टिकोनातून दिसणारे जीए या गोष्टी स्पष्ट होतात. जीएंच्या पूर्वजीवनाचे आणि पुण्यातील वास्तव्याचे तपशील मोजकेच आले आहेत. धारवाडमधील वास्तव्यावरच अधिक भर आहे. प्रा. हातकणंगलेकर, माधव आचवल, प्रेस, शंकर सारडा, सुनीता व पु. ल. देशपांडे, सुभाष अवचट, अमोल पालेकर, पां. ना. कुमठा, रामदास भटकळ, जयवंत दळवी वगैरेंच्या पत्रांचा आणि आठवणींचा वापर योग्य तेथे करण्यात आला आहे.

या सर्वांचा मनावर ठसा कसा उमटतो ? जी. ए. या व्यक्तिमत्त्वाबद्दल असणारे गूढ काही अंशी उलगडते, वाचकवर्गात असणाऱ्या मूळ प्रतिमेला धक्का न बसता जीएंच्या जीवनचरित्राचा मागोवा घेता येतो. जीएंबद्दलचे काही गैरसमज दूर होतात, परंतु त्यामुळे त्यांच्याबद्दलच्या आदरभावनेत भरच पडते. आपल्या साहित्याची दखल घेतली जावी, त्यावर समीक्षकांनी लिहावे, त्याला वाचक लाभावेत, ते व्यर्थ जाऊ नये ही ओढ त्यांना



अनुक्रमणिका

होती. 'पिवळा पक्षी'मध्ये शेवटी हीच भावना उत्कटपणे प्रकट झाली आहे. 'ती निघून गेल्यावर तिची आठवण मला आहे. कधी तरी कातल्यावेळी मलादेखील ते मातीचे मोठे घर सोडून जावे लागणार आहे. हे सारे माझ्या आठवणीत आहे व माझे मन घुंगुर झाले आहे. मी गेल्यावर त्या साऱ्याची आठवण कुठे राहील का ? राहावी ! राहावी ! ! राहावी ! ! !"

गूढयात्री ही मराठीतील एक लक्षणीय चरित्रकथा ठरेल. जीएंशी समरस झालेली आणि जीएंना बरेचसे जवळून जाणणारी लेखिका, तिने केलेला सर्वकष अभ्यास आणि जीएंसारखीच काव्यात्म, प्रतिमासमृद्ध भाषा, या सर्वांचा अनोखा संगम झाल्याने या चरित्रकथेला विश्वासार्हतेबरोबरच कलात्मक दर्जाही प्राप्त होतो. गेल्या दोन वर्षांत खानोलकर, विष्णुशास्त्री, पु.भा. भावे, डॉ.हेडगेवार प्रभृतींवर कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत; 'गूढयात्री' त्या सर्वांमध्ये सरस ठरेल. जीएंच्या जीवनाला व्यापून राहिलेल्या कमलताईंच्या व्यक्तित्वाचं वर्णन पूर्णतया शब्दांतून उभं करू शकलो नाही, अशी व्यथा मनोगतात प्रकट करतानाच, 'इतर कुणाच्या रूपगुणांची उसनवारी त्यासाठी करण्याची गरजच नव्हती,' असेही लेखिका म्हणते.

प्रत्यक्षातील काही व्यक्तींची नावे, स्थळांचे तपशील यांत बदल केले आहेत. तसा सल्ला प्रा.म.द. हातकणंगलेकर यांनी दिला आणि लेखिकेने तो पाळला. त्यामुळेच की काय, काही जागा व तारखा संदिग्ध झाल्या आहेत. मी असतो तर अशी संदिग्धता टाळण्याचा आग्रह धरला असता, शेवटी सूची व टीपा वगैरे देऊन कथांमधील उतारे, पत्रांतील उतारे, काही विशिष्ट घटनांबद्दलचे पुरावे वगैरे संदर्भ स्पष्ट केले असते तर तेही अभ्यासकांच्या दृष्टीने उचित झाले असते. ही चरित्रात्मक कादंबरी आहे, चरित्र नव्हे; तेव्हा संदर्भग्रंथांच्या सूचीची व टीपांची काय जरूर, असे म्हणून जबाबदारी झटकण्याची जी वृत्ती दाखवली जाते ती गैर होय. चरित्राला आणि चरित्रात्मक कादंबरीला अशा संदर्भांच्या उल्लेखामुळे एक प्रकारचा अधिकृतपणा लाभतो. लेखकाने विशिष्ट घटना व मते मांडताना ती केवळ स्वतःची लहर म्हणून मांडलेली नाहीत, त्यामागे उपलब्ध पुराव्यांचे अधिष्ठान आहे हे स्पष्ट व्हायलाच हवे. वास्तवाला, सत्याला कोठे मुरड घातली असेल तर त्याबद्दलही खुलासा हवाच. चरित्रात्मक कादंबऱ्या लिहिणाऱ्यांनी याबाबत टाळाटाळ वा अळंटळं करून भागणार नाही. विद्या सप्रे-चौधरी यांनी हे संदर्भ देण्यासाठी तयारी केली होती, परंतु कादंबरीला टीपांची गरज काय, असे म्हणून प्रकाशकांनी ते छापण्याचे टाळले, असे सांगण्यात आले. तसे असेल तर पुढच्या आवृत्तीत त्या संदर्भांचा जरूर समावेश करावा, हे आवर्जून सांगावेसे वाटते. संदर्भामुळे वाचकाच्या मनातील अनेक शंकांचे निरसन होणे सुलभ होते आणि लेखकाच्या परिश्रमाबद्दल आणि नेमकेपणाबद्दल विश्वास वाढतो.

(गूढयात्री : विद्या सप्रे-चौधरी. पारख प्रकाशन, २१, चर्च स्ट्रीट, कँप, बेळगाव. पृष्ठे : ३६८. एकशेपन्नास रुपये. प्रथमावृत्ती— ११ डिसेंबर १९९०.)












# चारापाणी : रा. रं. बोराडे

## दुष्काळग्रस्त ग्रामजीवनाच्या शोषणावर नेमके बोट ठेवणारे ललित भाष्य

डॉ. अरविंद वामन कुलकर्णी

ग्रामीण कथाकार रा. रं. बोराडे यांची नवी कादंबरी 'चारापाणी'.

१९८५ साली अवर्षणामुळे निर्माण झालेल्या स्थलकालनिबद्ध परिस्थितीची चौकट कथेसाठी घेऊन या चौकटीतूनच चौकटीबाहेरच्या सार्वकालाचा समावेश 'चारापाणी'च्या आशयविश्वात ते करू पाहत आहेत. महाराष्ट्रातील ग्रामजीवन आणि त्याशी निगडित असा दुष्काळ हे प्रस्तुत कादंवरीचे सूत्र आहे. हा दुष्काळ ८५ सालचा आणि मराठवाड्यातला असला तरी तो ग्रामजीवनाच्या सार्वकालिक वास्तवालाच स्पर्श करणारा आहे.

नायक सुखदेव याने नुकतीच एम. ए. ची परीक्षा दिलेली आहे. ग्रामीण विद्यार्थी संघटनेचा अध्यक्ष, पत्रकार, दुष्काळपीडित शेतकऱ्याचा मुलगा. यामुळेच त्याचे विचारचक्र, अस्वस्थता आणि त्याने केलेले प्रयत्न उपरे वाटत नाहीत. लेखक हे सर्व त्याच्याशी मुद्दाम जोडतो आहे असे वाटत नाही. वाचकाला पटवून देईल, विश्वासात घेईल अशीच ही योजना आहे.

दुष्काळ हे केंद्र आणि सुखदेव हा आधार यांच्यातील संबंध दोन पातळ्यांवर बेतलेले आहेत : वैयक्तिक आणि अवैयक्तिक. सुखदेव, त्याचे आई-वडील– म्हणजेच दुष्काळाचा घरावर आलेला ताण ही वैयक्तिक पातळी आणि गावाशी-समाजाशी संबंधित ती अवैयक्तिक पातळी. या दोन्हीतील लवचिकपणामुळे त्यांना हवाबंद कप्प्यांचा हिशेबी यांत्रिकपणा आलेला नाही. पात्रनिर्मिती आणि त्यांच्यातील परस्परसंबंध हे या पातळ्यांच्या आधारेच साधले गेले आहेत.

आवाराव शेळके हा गावातील एक श्रीमंत सावकार शेतकरी. तो सरळ सरळ शोषकांचा प्रतिनिधी आहे. पण सांकेतिक ग्रामीण सरपंच, खल नव्हे. त्याच्या शोषण पद्धतीत रानटीपणा नाही. अहिंसक वाटेल असा हिशेबी चलाखपणा आहे. चाऱ्याच्या आणि पाण्याच्या कमतरतेमुळे आपले बैल कसायाला विकायला किंवा सोडून द्यायला निघालेल्या शेतकऱ्यांना मदत म्हणून त्याचे बैल फुकट सांभाळण्याची तयारी दाखवितो. म्हणजेच चाऱ्यावारी आपल्या शेतात असे बैल राबवून घेत असतो. नंतर तर कष्टकामे न झाल्यामुळे पड पडणारी शेतकऱ्यांची शेती खंडाने करण्याची (पुन्हा औदार्यानेच) तो तयारी दाखवितो. त्याचा हा डाव ओळखून तो उलथण्याचा प्रयत्न करणारा सुखदेव हा शोषितांचा प्रतिनिधी. त्याचा साहाय्यक आहे आवारावाच्या आहारी गेलेल्या सर्जेराव शिंदे याचा भडक माथ्याचा मुलगा जयराम. सुखदेवाचा सनदशीर संघर्ष आणि जयरामाचा असहाय प्रक्षोभक संघर्ष



अनुक्रमणिका






कादंबरीत आला आहे. घरात आणि घराबाहेर सुखदेव एकटा कसा पडत जातो, इतरांच्या दृष्टीने कसा अडचण ठरत जातो, याचे चित्रण काटेकोरपणे केलेले आहे.

तर्कदृष्ट्या कथेचा व्यूहही निर्दोष आहे. दुष्काळावर उपाय शोधण्यासाठी मदतीखातर सुखदेव ज्यांना भेटतो तो क्रम, गावचा सरपंच, तहसीलदार, गट विकास अधिकारी, साखर कारखान्याचे एम्.डी. व चेअरमन असा दिसतो. सर्वांत शेवटी शेतकरी संघटनेचे तालुका संघटक येतात. हे दाखविताना बेपर्वाई व भ्रष्टाचार यांचेही दर्शन घडविले जाते. सुखदेवाच्या पदरी सर्वत्र येते ती निराशा.

वैयक्तिक पातळीवर त्याच्या घरातील चारापाण्याचे दुर्भिक्ष अनेक प्रसंगांतून जाणवते. त्या अडचणींचे टोक गाठणारा प्रसंग म्हणजे सुखदेवाच्या बहिणीचा नवरा– त्याचा मेव्हणा आपली गुरे सुखदेवाच्या घरी संभाळण्यासाठी धाडतो. म्हणजे दुष्काळातील तेरावा महिनाच. गुरे परत धाडली तर बहीण घरी पाठविली जाईल ही भीती ! गाव सोडून निघालेला दत्तू घायवट, शिंगांना दाखले बांधून बैल सोडून द्यायला निघालेला बाळबा शेलार, केवळ पाण्यासाठी बायको कोरड्या विहिरीत पडल्यामुळे तपासाला आलेल्या पोलिसांकडून लुबाडला जाणारा रामा सुराशे, सुखदेवाच्या हालचालींमुळे अधिकच दमछाटीला आलेले त्याचे आई-वडील, दुष्काळी वार्तापत्रे इत्यादींद्वारा एका बाजूला दुष्काळाचे परिणाम आणि दुसऱ्या बाजूला सुखदेवाचा कोंडमारा लेखकाने गडद केला आहे. पण सुखदेव आता माघारी वळू शकत नाही.

या कादंबरीतील वैचारिक किंवा सैद्धान्तिक भाग फार महत्त्वाचा आहे. तो शेती आणि निसर्गावलंबनामुळे शेतीच्या होणाऱ्या दुर्दशेसंबंधीचा आहे. त्याद्वारा ग्रामीण जीवनातील भयकारी वास्तवाचीच जाणीव होते.

पाण्याच्या टंचाईचे कारण पाऊस नाही आणि पाऊस नसण्याचे कारण वृक्षतोड हे पर्यावरणवाद्यांचे मत इथे मांडले जातेच, पण त्याबरोबर उपलब्ध पाण्याच्या वाटपासंबंधीही काही उपाय सुचविले जातात. ही कादंबरी जे विचारचक्र सुरू करून देते ते याहून महत्त्वाचे आहे.

. दुष्काळात फक्त शेतकऱ्यांचेच अतिहाल का होतात असा प्रश्न वाचकांच्या मनात ही कादंबरी जागा करते. दुष्काळाशी मुकाबला करण्याची ताकद औद्योगिक प्रभावक्षेत्रात दिसते. (प्रस्तुत कादंबरीत तर असे दिसते की तालुक्याच्या गावालाही दुष्काळाची मोठी झळ लागलेली नाही !) दुष्काळात फक्त शेतकऱ्यांवर गुराढोरांसह गाव सोडण्याची, रस्त्यावर येण्याची किंवा रोजंदारीच्या कामावर जायची पाळी का येते हा चक्रावणारा प्रश्नांकित विचार आहे. 'शेतीमालाला रास्त भाव मिळत नसल्याने शेती व शेतकरी यांचे सतत शोषण होते आणि कसल्याही संकटाला तोंड द्यायची त्याच्यात ताकद राहत नाही' अशा अर्थाची प्रतापराव कदमांनी त्याबाबत केलेली मीमांसा लक्षणीय वाटते. कारण बेकिफायतशीर अशा शेतीच्या व्यवसायावर अवलंबून असणाऱ्या ग्रामीण जीवनाला आलेली अवकळा

अर्थमूलक आहे हे अगदी उघड आहे.

'चारापाणी' वाचल्यावर असा समज होतो की बागायतदार शेतकरी किंवा ऊसउत्पादक सुखी आहेत. हाल होतात ते फक्त कोरडवाहू शेतकऱ्याचेच. पण असे दिसते की दुष्काळात सर्वच शेतकरी एकाच जात्यात भरडले जात असतात. ऊसवाल्या रंगनाथ फावडे याची परवड 'चारापाणी'त सुखदेवानेच दिलेली आहे. तसेच शेतकरी संघटनेच्या कार्यपद्धतीबद्दलचे चित्रण गैरसमजातून आलेले दिसते.

वाङ्मयदृष्ट्या 'चारापाणी'चा विचार करताना अशीच एक उणीव जाणवते. (लेखक प्रस्तावनेत सांगतो त्या) त्याच्या 'होरपळ' या दीर्घकथेचे हे विस्तारित रूपही कादंबरी म्हणू असे झालेले नाही. यातील घटनाप्रसंगांची मालिका तर्कदृष्ट्या सुसंगत वाटते पण रसदृष्ट्या वाटत नाही. वास्तविक दुष्काळ ही एक व्यापक सामुदायिक आपत्ती होय. तिच्या व्याप्तीचा, प्रचंडतेचा प्रत्यय 'चारापाणी'त येत नाही. तसा दुष्काळ समजतो, पण त्यातील दाहकता जाणवत नाही. त्यातील गांभीर्याची जाणीव होते, पण मनावर दडपण येत नाही. दुष्काळासारखी वस्तुस्थिती म्हणजे मनुष्यस्वभावाच्या अनेकविध ज्ञात-अज्ञात, परिचित-अपरिचित छटा वा तऱ्हा दाखविण्याची लेखकाला मिळणारी मोठीच संधी होय. 'चारापाणी'त असे काही दाखविणे जमलेले नाही. विषयाचा वकूब ओळखून लेखकाने तो विस्ताराने हाताळला नाही, त्यात दडलेल्या अनेकविध शक्यता पडताळून पाहण्याचा प्रयत्न केला नाही.

तरीही ग्रामजीवनाच्या शोषणावर नेमके बोट ठेवणारे अर्थमूलक ललित भाष्य म्हणून हा प्रयत्न महत्त्वपूर्ण आहे.

(चारापाणी : रा. रं. बोराडे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०, पृष्ठे १२०, चाळीस रुपये)

(अरविंद वामन कुलकर्णी १४, स्वयंसिद्धा सोसायटी, पौड रस्ता, पुणे ३८)

---

## 'हाकुमी' व 'तांदळा' : सुरेश द्वादशीवार

### माडिया जमातीच्या पार्श्वभूमीवरील हाकुमी; रहस्यमय तांदळा

डॉ. राजेंद्र डोळके

'हाकुमी'चा नायक कन्ना हा माडिया आदिवासी तरुण आहे. पुण्याहून डॉक्टर होऊन, उच्चभ्रू संस्कार घेऊन तो आपल्या गावी– कांदोडीला– परततो. आणि आपल्या गावात सुधारणा करण्याचा प्रयत्न करतो. या प्रयत्नांचं चित्रण हा या कादंबरीचा गाभा होय.

अंधश्रद्धा, पारंपरिक समजुती येथे प्रभावी असतात. परंपरेविरुद्ध जाणं हे अवघडच. पोचम अवल ही देवता गावाची रक्षक. तिला नाराज केलं तर अरिष्ट ओढवलंच. लग्नाच्या



अनुक्रमणिका






बाईनं फक्त पांढरं अन् तेही एकच कापड वापरायचं, अंगात चोळी, झंपर वर्ज्य. लग्नाच्या बाईने छाती झाकली तर तिला पोरं होणार नाहीत. शेतात पीक यावं म्हणून लहान मुलाचा बळी द्यायची प्रथा. मानेवर गळू असणं हे भाग्याचं लक्षण. अशिक्षितपणा इतका की कन्रा शिकतो म्हणजे नेमकं काय करतो हेही त्याच्या वडिलांना माहीत नसतं.

गावात दवाखाना काढून लोकांना बरे करणे हेच कन्राचं ध्येय नाही. समाजसुधारणा, अंधश्रद्धानिर्मूलन, समाजजागृती यासाठी तो गावात शाळा काढतो, मुलाला बळी देण्याची प्रथा थांबवतो, बायांनी इच्छेनुसार अंगभर वस्त्रं घालावीत म्हणतो. गळूची ऑपरेशन्स करतो. गावच्या लोकांशी– प्रत्यक्ष आईबापांशीही– विलक्षण टक्कर देतो आणि यशस्वी होतो.

कांदोडी ही निरक्षर, अंधश्रद्धाळू, मागासलेली असेल पण मनानं श्रीमंत. कन्राने पाहिलेल्या पुण्याच्या मानाने अनेकपट 'अस्सल'. पुण्याच्या संस्कृतीचे वर्णन काहीसे उपहासात्मक आहे. तर या आदिवासी गावाचा भावनिक शोध लेखकाने समरसून घेतला आहे. अंगभर दारिद्र्य असले तरी ही माणसं धडधाकट आहेत, काटक आहेत. हसतमुख, समाधानी आहेत, निष्कपट आहेत.

कन्राच्या या प्रवासातील महत्त्वाच्या व्यक्ती म्हणजे अनिता, रूपी व राजय्या. अनिता व रूपी ह्या त्याच्या प्रेयसी. रूपी ही माडिया तरुणी. कन्रावर जीव तोडून प्रेम करणारी. इतकी की, आईबापांनी इच्छेविरुद्ध लग्न ठरविले तेव्हा कन्रा नाही तर कन्राचा विवाहित भाऊ चालेल म्हणून दुसरेपणाचा कमीपणा घेऊन कन्राच्या घरात येते. त्याच्या येण्याची वाट पाहून एक दिवस घरातून निघून जाते. नक्षलवाद्यांच्या टोळीत सामील होते. काही वर्षांनंतर कन्राची भेट होते. कन्रा तिला 'परत चल' म्हणतो. तिच्याशी लग्न करण्याची इच्छा प्रगट करतो. ती 'नाही' म्हणते. हा प्रसंग हृदयस्पर्शी आहे.

त्यामानाने अनिताचे चित्रण कमी ताकदीचे वाटते. पुण्याच्या वास्तव्यात ती भेटते. अनिता आदर्शाच्या, सुधारणेच्या गोष्टी बोलत असते. परंतु त्या॰ी 'ाहिजे तेवढ्या हृदयातून बोलल्याचा भास होत नाही. तरुण वयात समाजसेवेचं व्रत घेतलेली एक निष्ठावान कार्यकर्ती व कन्राशी सहवास आल्याने मनोमन त्याच्यावर हळुवार प्रेम करणारी अशी व्यक्तिरेखा लेखकाला उभी करायची असावी. तिची अनुदारता पाहून त्याचे मूळ अनितेच्या व्यक्तित्वाविषयी लेखकाच्या अधुऱ्या कल्पनेत असावे, असे वाटते.

राजय्या हा नक्षलवादी टोळीचा प्रमुख. सुशिक्षित, घरंदाज, एम. एस सी. मोठमोठ्या धनिकांशी आणि अधिकाऱ्यांशी वडिलांची दोस्ती. अरण्यातल्या शोषकांविरुद्धच्या नक्षलवादी संघर्षात त्याला थ्रिल वाटते. लेखकाचे या नक्षलवादी लोकांविषयी चांगले मत आहे. सावकारी मोडून आदिवासींना चोख न्याय ते मिळवून देऊ पाहतात. भ्रष्ट अधिकाऱ्यांना वठणीवर आणतात. शिवाय डोबी, चुक्की, जुरू, पवरी वगैरे आणखीही दुय्यम पात्रे या कादंबरीत आहेत व त्या पात्रांचीही स्वभावचित्रणे चांगली वठली आहेत.

संपूर्ण कादंबरीतून निसर्गवर्णनं फारशी आढळत नाहीत. नाही म्हणायला जंगलातील गर्द झाडांची वगैरे काही वेळा सोवत आहे. लेखकाची शैली ठीक आहे. अलंकारांचा सोस नाही. कादंबरीत एकापाठोपाठ एक घटना वेगाने घडत जातात. कादंबरीचे पोत कसदार आहे. शृंगारिक वर्णने लेखकाने कटाक्षाने टाळली आहेत. माडियांच्या बायकांची उघडी शरीरं, रेल्यांतून तरुण पोरं-पोरी एकमेकांचा हात धरून पळून गेल्यानंतर त्यांचा प्रणय, शारीरिक मीलन व विशेषतः रूपी घरात एकटी असताना किंवा कादंबरीच्या शेवटी तिचा व कन्नाचा मुक्त प्रणय ह्या ठिकाणी शृंगारिक वर्णनांना वाव असूनही द्वादशीवारांनी तो मोह टाळला आहे.

**तांदळा**

आपलं उमद्या तरुणाशी लग्न व्हावं, त्याच्याकडून शरीरसुख मिळावं ह्या तारुण्यसुलभ भावना तांदळाच्या नायिकेच्याही असतात. परंतु दुर्दैवाने त्या पूर्ण होत नाहीत. तिच्या आईच्या अंगात देवी येत असल्यानं तिच्याकडेही लोक त्याच नजरेनं बघू लागतात. हळूहळू तिच्यावर देवपणाची आलेली खोळ अधिक पक्की होत जाते, लोक देवी म्हणून तिला नमस्कार करतात, तिची मनोमन पूजा करतात. बरोबरीच्या मैत्रिणींचे आईबाप तिच्या पाया पडतात. खुद्द आई व नंतर वडीलही तशीच आदराची वागणूक देतात. तिच्याशी लगट करणाऱ्या मुलाला, प्रत्यक्ष देवीशी लगट करण्याचं पाप केलं असं समजून त्याचे वडील यमसदनास पाठवितात. पुढे रिधोऱ्याच्या महाराजाच्या एक पांगळ्या मुलाशी तिचे लग्न होते. परंतु तिचा नवराही तिच्याकडे देवी म्हणूनच पाहतो. ती अतृप्तच राहते.

नबावसाहेब ऊर्फ व्यंकटेश्वरराव यांच्या पौरुषाने ती भारावते. पण हे रंगेल नवाबही तिला पाहिजे ते देऊ इच्छित नाहीत. प्रत्येक वेळी तिचा पराभव होतो. बेदरकार होऊन भोगून घेण्याची तिची इच्छा एकदाही पूर्ण होत नाही. ती खचते, नाउमेद होते, निराशेच्या खाईत लोटली जाते. देवीचा तांदळा (चेहरा) माझ्याच वाट्याला का आला असे तिला वाटत राहते...

द्वादशीवारांच्या कथेचा धागा असा आहे. बालेश्वराच्या देवळात लेखकास ही स्त्री भेटते. त्यानंतर अचानक ती नाहीशी होते. त्या स्त्रीविषयीच्या उत्कंठेपोटी वाचक ही कादंबरी उत्सुकतेने वाचतो. कादंबरीच्या कथानकाला आवश्यक असणारी वातावरणनिर्मिती लेखकाने उत्तम रीतीने केली आहे. काहीशी गूढ, रहस्यमय, भयानक अशी ही वातावरणनिर्मिती आहे. एखादा रहस्यमय हिंदी सिनेमा डोळ्यांसमोर आणा. जनकपूर हे गाव काहीसे भयाण आहे. पन्नासेक झोपड्या, एक तुटकी मशीद आणि एक चौरस्ता आहे. वस्तीच्या विरुद्ध बाजूला हिरव्या दाटीआड प्रचंड पण ओसाड 'उत्तरेचा महाल'. रस्त्यानं जाणारा माणूस सहसा या महालाकडे फिरकत नाही. या वास्तूची सगळ्या परिसरात एक अनाम दहशत आहे. दुसरीकडे उंच टेकडीवरचं बालेश्वराचं देऊळ. खाली गौतमी नदी. या



अनुक्रमणिका

गावाला कसलातरी शाप दिसतो. सारे स्त्रीदेहाचे भुकेले. वखवखलेले. मादीकडे पहावे तसे बघणारे. हे वातावरण वाचकालाही भारून टाकते. दिवाकर काका, त्यांची ठेवलेली बाई लक्ष्मी, लक्ष्मीची मुलगी जुई, दिवाकरकाकांचा मुलगा सवाई शंकर, यांचीही चित्रणे रहस्यात भर घालतात..

कादंबरीच्या सुरुवातीस नायिकेची आणि लेखकाची भेट झाल्यापासून वाचकाच्या मनात नायिकेबद्दल अत्यंत उत्कंठा जागी होते. परंतु ती शमविण्याऐवजी कथानकाच्या दृष्टीने अनावश्यक पात्रे आणली जातात. दीनसाहेब, त्यांच्या पत्नी, शंकरची सासू, सी. रघुनाथराव, थोडेसे नारायण महाराज ही पात्रे पूर्णतः गाळली जरी असती तरी मूळ कथावस्तूला 'यत्किंचितही ढळ पोचला नसता. शेवटी हे रहस्य उकलते. पण आरंभी जी हवा निर्माण केलेली आहे, त्या मानाने हे रहस्य अगदीच सामान्य ठरते. अपेक्षाभंग करते.

(हाकुमी, तांदळा ; सुरेश द्वादशीवार, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठे प्र. १३९, प्रत्येकी पन्नास रुपये.)

(डॉ. राजेंद्र, डोळके, बँक ऑफ महाराष्ट्र, लोहारा शाखा, एम ई एल, चंद्रपूर.)

---

## कृष्णमयी : विद्या सप्रे-चौधरी

### मीरेचे मुग्ध करणारे भावविश्व

प्रा. सौ. शुभदा शहा

'मीरा' हा शब्द उच्चारताच मनात जागे होते ते मधुर भावभक्तीने परिपूर्ण कृष्णभक्त मीरेचे रूप! 'मेरे तो गिरिधर गोपाल, दुसरो न कोई' या भावनेने भारलेल्या, 'पग घुँघरू बाँध मीरा नाची रे' म्हणत नृत्य-गायन करून अविनाशी परमेश्वराला आळविणाऱ्या मीरेची मूर्तीच डोळ्यांसमोर उभी राहते. भक्त मीरेचे रूप मनाला मोहविणारे आहे, यात शंकाच नाही. पण मीरेचाच रूपवेध घेत, आपल्या गाढ व्यासंगातून, एका नवीन दृष्टिकोनातून, लेखिका मीरेच्या जीवनाकडे पाहते. सुमारे ४४० वर्षांपूर्वीच्या इतिहासातील, मारवाडच्या व मेवाडच्या राजवंशांचा सखोल अभ्यास करून मीरेचे व्यक्तिचित्र लेखिकेने रेखाटले आहे. त्या काळात एका स्त्रीने 'मला लग्न करायचं नाही असा पवित्रा धीटपणे घेणं व कौटुंबिक, सामाजिक बंधने धुडकावून देऊन स्वतःच्या मनाला पटेल अशा मार्गानं जाणं सोपं नव्हतं. 'पतिनिधनानंतर सती जाण्याची सक्ती होत असताना 'सती न होस्याँ, गिरिधर गास्याँ, मनमोह्यो धननामी' असं राजसत्तेला ठणकावून सांगणारी संत मीरा. 'स्त्री स्वातंत्र्याची पहिली उद्‌गाती' या भूमिकेतून लेखिका मीरेकडे बघते.

**सूक्ष्म भाववृत्ती**

कादंबरीत पात्रमुखी निवेदनाचा अवलंब केला आहे. त्यामुळे प्रत्येक व्यक्ती आपल्या

मनातील सूक्ष्म भाववृत्ती प्रकट करू शकते. रंगभूमीवर ज्याप्रमाणे (अभिनेत्यावर), दोन बाजूंनी व वरून प्रकाशझोत टाकल्याने अभिनेत्याचे रंगरूप, अभिनय प्रकाशात उजळून निघते, त्याप्रमाणे या कादंबरीत ललिता, भोज व उदा यांच्या निवेदनाच्या प्रकाशझोतातून मीरेचे आंतर्बाह्य व्यक्तिमत्त्व झळाळून प्रगटते, त्याची रेष न् रेष, पदर न् पदर उजळून निघतो.

आकर्षक सुरुवात हे कादंबरीच्या यशाचे पहिले पाऊल ! मीरेविषयीच्या जिव्हाळ्याने व आत्मीयतेने ओतप्रोत ललिता मीरेच्या मनाचे सूक्ष्म कंगोरे रेखाटते. मीरेची काळजी वाहण्यासाठी व सेवा करण्यासाठीच जणू जन्माला आलेल्या ललितेचे जीवन मीरेला सर्मर्पित असल्याने 'जिची काळजी करायची ती काळजी करण्यापलीकडे निघून गेलीय' हे जाणवल्यावर, मीरेच्या संदर्भात जी पावले उचलली गेली, जो सल्ला दिला गेला, त्याविषयी आत्मनिरीक्षण व आत्मपरीक्षण करून ती आपल्या देहाचे अर्घ्य समुद्राला देणार आहे. ललितेच्या निवेदनाने कादंबरीची सुरुवात लेखिका करते; पण ही सुरुवात होते तीच मीरेच्या जीवनातील अखेरच्या क्षणांचे वर्णन करत ! परमात्म्याच्या रूपात आपले अस्तित्व मिटवून टाकणाऱ्या मीरेच्या शुभ्र साडीचा पदर वाऱ्यावर फडफडताना ती पाहते; त्या पदराच्या टोकाशी बांधलेली गाठ मागे-पुढे हेलावताना पाहिल्याचा भास होतो व लेखिकेची लेखणी एकदम झेप घेते ती मीरेच्या जीवनातील मध्यकालावर– मीरा व भोजराज यांच्या विवाहप्रसंगावर ! घटनाक्रम बदलून, पण सुसूत्रतेला बाध न आणता लेखिकेनं कादंबरीची सुरुवात जिज्ञासा वाढविणारी व मनोवेधक केली आहे.

### नितांत रमणीय दर्शन

मीरा हा या कादंबरीचा केंद्रबिंदू ! मीरेचे विवाहपूर्व जीवन, विवाहोत्तर जीवन व पारमार्थिक जीवन अशा तीन टप्प्यांतून मीरेच्या जीवनाचा प्रवास लेखिका दाखविते. श्रीकृष्णाच्या प्राप्तीसाठी तळमळणाऱ्या, कासावीस होणाऱ्या, त्याच्या चरणांवर लीन होणाऱ्या मीरेचे एक रूप व लौकिक जीवनातील संघर्षाला व विरोधाला सामोरं जाणारं तडफदार, प्रज्ञायुक्त, दृढ आत्मविश्वास प्रकट करणारं दुसरं रूप. ही दोन परस्परविरोधी रूपं एकाच व्यक्तीमध्ये उभी करणं अत्यंत अवघड आहे. याचा समतोल राखणं व मीरेच्या एकसंध व्यक्तिमत्त्वाला तडा जाऊ न देता ती रेखाटण्याचे कौशल्य लेखिकेच्या प्रतिभेत आहे.

बालवयातील हळुवार, संवेदनशील मनात रुजलेला कृष्णभक्तीचा संस्कार व 'गिरिधर तुझा नवरा. आता चालू लाग पाहू !' आईने सहज उद्गारलेल्या या शब्दांनी मीरेच्या भक्तीभावनेला मिळालेली दिशा मीरेच्या जीवनात अनेक समस्या निर्माण करते, तरीही आत्मबलाने मीरा आपल्या लक्ष्याप्रत कशी पोचते याचे नितांत रमणीय दर्शन या कादंबरीत होते. बालवयातील तिची कृष्णभक्ती डोळस असण्यापेक्षाही कृष्णाविषयीच्या जिव्हाळ्यातून निर्माण झालेली दिसते. कोमल मनाने कृष्णाचा ध्यास घ्यावा, व सत्यापेक्षाही कल्पिलेल्या



अनुक्रमणिका






अनुभवात मग्न व्हावे व त्यालाच सत्य समजावे ही मानसिक अवस्था मीरेची ! त्यामुळे कृष्ण जवळ आहे, त्याने तिला उचलून धरले आहे इ. अनुभव सत्यापेक्षाही तिला होणारे भ्रम किंवा भास आहेत. हळव्या मनःस्थितीत अत्यंत भावुकतेने अनुभवलेले हे क्षण तिच्या मनातील कृष्णभक्तीची ओढ व्यक्त करणारे आहेत. कृष्णावरील अलोट प्रेम, त्याच्याशी साधली जाणारी तन्मयता व त्यातून स्वाभाविकपणे प्रकटणारे नृत्य कौशल्य, संगीत, काव्यप्रतिभा हे मीरेचे गुण दाखवून अत्यंत अलगदपणे लेखिका मीरेच्या व्यक्तिमत्त्वाच्या पाकळ्या विलग करते.

भोजराजाबरोबर विवाह झाल्यानंतर मीरेचे कणखर, खंबीर, तडफदार रूप अधिक प्रकर्षाने प्रगट होते. उदाला, (भोजराजाची बहीण) सासरी न पाठविण्याचा ठाम निर्णय तिच्या वृत्तीतील करारीपणाचे दर्शन जसे घडवितो, तसेच सर्वांगीण विचार करण्याची तिची क्षमताही दर्शवितो. 'स्त्री पतिव्रता असावीच पण पतीही पत्नीव्रताची तत्त्वं पाळणारा पाहिजे.' हा पति-पत्नीसंबंधातील निष्ठा सडेतोडपणे सांगणारा मीरेचा दृष्टिकोन धीट व पुरुषी वर्चस्वाला आव्हान देणारा निश्चितच वाटतो. तिच्या मते परिवारामुळे बंधने पडत नाहीत, उलट 'परितः वारयति' म्हणजे सर्व दोषांपासून मुक्त करणारा तो परिवार, ही परिवारासंबंधी तिची भावना आहे. मीरा-भोज, मीरा-उदा यांच्यामधील चर्चेतून, संवादातून मीरेचे हे दुसरे रूप लेखिकेने चितारले आहे.

मीरेविषयी वाटणाऱ्या आकर्षणापासून ते उत्कट प्रेमापर्यंतचा चढता आलेख भोजराजाच्या व्यक्तिरेखेत लेखिकेने रेखला आहे. भोजराजाच्या मनातील भावनिक आंदोलनेही लेखिका हळुवारपणे टिपते. मीरेच्या मनातील कृष्णाविषयीचे प्रेम व ओढ पाहून कधी असूया तर कधी उदासीनता वाटणे; क्षणिक अप्रीती वाटणे; होणाऱ्या अपमानाने, अवहेलनेने अप्रसन्न, निराश होणे तर कधी समजुतदारपणे तिचे मन जाणून तिच्याशी प्रेमळपणे वागणे, मृदू शब्दात बोलणे असे अनेक सूक्ष्म कंगोरे लेखिकेने चित्रित केले आहेत. ही भावकंपने जितकी स्वाभाविक तितकीच हृदयस्पर्शी आहेत. मीरेचे प्रेम लाभावे म्हणून भागवतचर्चेतही रस घेणारा राजा भोज वैवाहिक जीवनात अपयशी आहे. वास्तविक गिरिधरावर जसे मीरेचे उत्कट प्रेम व अभंग निष्ठा आहे, तसेच राजा भोजाचे उत्कट प्रेम व अचल निष्ठा मीरेवर आहे. मीरेच्या प्रेमाचा पोत शुद्ध सात्त्विक तर भोजराजाच्या प्रेमाचा पोत गर्भरेशमी. उदात्त, सात्त्विक प्रेमाबरोबरच मीरेच्या सौंदर्याचे स्वाभाविक आकर्षण, पती या नात्यातून त्याच्या मनात आहे. भोजराजाच्या मनातील संयम, समजुतदारपणा, प्रेम, निष्ठा, मीरेचे मन समजून घेण्याचा त्याचा प्रामाणिक प्रयत्न भोजराजाच्या व्यक्तिमत्त्वाला अशा एका उंचीवर नेतो की जिथे मीरेसारखे अलौकिकत्व जरी त्याला लाभले नाही, तरी त्याचे असामान्यत्व निश्चितच जाणवते. सूक्ष्म बारकाव्यांनिशी ही व्यक्तिरेखा अत्यंत समर्थपणे लेखिकेने उभी केली आहे.











**नाट्य व रोचकता**

शांत-सात्त्विक, धीरगंभीर पारमार्थिक जीवनाच्या प्रवासात रोचकता कशी येणार? पण मीरेविषयी मत्सर असणाऱ्या लोकांकडून तिचा केला जाणारा अपमान, निंदानालस्ती व तिचे जीवन नष्ट करण्यासाठी केलेले कपट-कारस्थान यातून या पारमार्थिक जीवनात नाट्य व रोचकता लेखिका निर्माण करते. संघर्ष हा नाट्याचा आत्मा. मीरेच्या आध्यात्मिक जीवनात संघर्षाचे क्षण नाट्य निर्माण करतात. अनेक पातळ्यांवरून लेखिका हा संघर्ष चित्रित करते. राजनैतिक, सामाजिक, कौटुंबिक व भावनिक पातळ्यांवरचा; स्थूल व सूक्ष्म स्वरूपाचा; लौकिक व पारलौकिक क्षेत्रातला संघर्ष मीरेचे पारमार्थिक जीवनही वेधक करतो. अत्यंत सहजसुंदरतेने हे नाट्यमय प्रसंग लेखिका चितारते.

**अत्यंत प्रत्ययकारी रेखाटन**

मीरेच्या पारमार्थिक जीवनाला तत्त्वज्ञानाची डूब लेखिका देते. खरा संन्याशी कोण? चित्तशुद्धीचा मार्ग कोणता? मुक्तीसंबंधीचे तत्त्वज्ञान, कर्म व ज्ञान यांच्यापेक्षा भक्ती श्रेष्ठ कशी? अशी अनेक अंगांनी केलेली तत्त्वचर्चा मीरेच्या पारमार्थिक जीवनाची प्रगल्भता व गांभीर्य प्रकट करतात. मीरेला झालेल्या परमेश्वराच्या साक्षात्काराचे अत्यंत प्रत्ययकारी रेखाटन लेखिका करते. पंचज्ञानेंद्रियांच्या संवेदनांना– रूप, रस, नाद, गंध, स्पर्श– आवाहन करून साक्षात्काराचा अलौकिक व अतींद्रिय अनुभव लेखिका वाचकांना देते. परमेश्वराच्या अस्तित्वाचा स्पर्श जाणवावा– सौम्य, स्निग्ध, तरल पारदर्शक, नितळ व प्रसन्न– असा या अनुभवाचा पोत आहे. श्रवण, कीर्तन, स्मरण, वंदन, अर्चन, पादसेवन, दास्य, सख्य व आत्मसमर्पण या नवविधा भक्तीच्या पायऱ्यांवरून चढत जाऊन कृष्णमीलनाच्या लक्ष्याप्रत जाऊन पोचणाऱ्या मीरेच्या वाटचालीचे हे रेखाटन अप्रतिम आहे.

**सखोल व्यासंग-गाढ अभ्यास**

दंतकथा, दैवी चमत्कार, आख्यायिका यांच्या वर्णनातून कथानकाला अद्‌भुताचा स्पर्श होतो व गूढरम्य वातावरणाची निर्मिती करून कथानकाची आकर्षकता व वेधकता लेखिका वाढविते. वाचकांची उत्सुकताही ताणून ठेवली जाते. हे सारे घटक कादंबरीच्या रोचकतेत व सौंदर्यात भर घालणारे आहेत हे निश्चित. पण या साऱ्या माहितीवजा तपशिलाने कादंबरीत रुक्षता, कंटाळवाणेपणा निर्माण होत नाही. उलट लेखिकेच्या बहुश्रुततेचा, सखोल व्यासंगाचा व गाढ अभ्यासाचा प्रत्यय येतो. या दंतकथा किंवा कृष्णजन्म, रामावतार या व अन्य हकिगती कथानकाशी अत्यंत एकजीव झाल्या आहेत. लेखिकेचे लेखनकौशल्य थोडे जरी कमी पडले असते तर या हकिगती 'पॅच' प्रमाणे वाटल्या असत्या. ही माहिती कथानकाला मारक न ठरता पूरक ठरते.



अनुक्रमणिका

**मीरेचे मानसचित्रण, जीवनचित्रण**

मीरेचे मानसचित्रण, जीवनचित्रण हा जरी कादंबरीचा गाभा असला तरी मीरेच्या जीवनाशी संबंध व संपर्क राखणाऱ्या सुष्ट-दुष्ट माणसांचे; रीतीरिवाजांचे, श्रद्धा-अंधश्रद्धांचे, धर्माचरणाचे, बदलत्या राजवटींचे वर्णन कादंबरीच्या विषयाची व्याप्ती वाढविते. तत्कालीन समाजजीवनाचे व राजकारणाचे घडणारे दर्शन वाचकांना मीरेच्या काळात घेऊन जाते व कथानकात चैतन्य, जिवंतपणा निर्माण करते. महत्त्वाकांक्षी राजांचा धोरणीपणा, लोकांचा राजसत्तेकडे बघण्याचा दृष्टिकोन; बदलत्या राजसत्तांचा समाजजीवनावर होणारा परिणाम, लेखिका ओघाओघात वर्णन करते. मीरेच्या लहानपणी यवनांचे राज्य. मुलीचा जन्म नको वाटे. तिला सुरक्षित ठेवायची म्हणजे पित्याच्या नाकी नऊ येत. सासरहून मुलगी माहेरी येताना किंवा माहेरहून सासरी जाताना लूटमारीचे भय वाटे. गौरीमंदिराजवळ भरलेल्या जत्रेत एकाएकी धावपळ झाली अन् १४० कुमारिका घोड्यांवर जेरबंद केल्या गेल्या. अशा कृत्यांमुळे संस्थाना संस्थानात लढाया होत इ. घटनांची वर्णने व तपशील त्या काळाचे जिवंत चित्र तर डोळ्यांसमोर उभे करतोच पण समाजातील सुरक्षिततेच्या, असुरक्षिततेच्या भावनेवरही प्रकाश टाकतो.

**भाषाशैली : कादंबरीचे ऐश्वर्य**

झुळझुळीत, पारदर्शक वस्त्राने आच्छादिलेल्या चेहऱ्याचे सौंदर्य जसे लोभस वाटते, तसे शब्दशैलीच्या अवगुंठनातील मीरेचे मनोविश्व मुग्ध करणारे तर आहेच, पण त्याचबरोबर शब्दांच्या तलम, मृदू पोताचा प्रत्यय देणारे आहे. या कादंबरीची भाषाशैली हे या कादंबरीचे ऐश्वर्य आहे. भाषाविलासाची व कल्पनासौंदर्याची असंख्य उदाहरणे कादंबरीत पावलोपावली विखुरलेली आहेत. विरमकाकांच्या निधनाची बातमी ऐकून, 'कमलकळ्यांवरून दवबिंदू उतरावेत, तशी मीरेच्या थरथरत्या पापण्यांखालून आसवं ओघळली.' यांसारखी वाक्ये किंवा चित्रदर्शी शैलीतील निसर्गवर्णने. 'दूरवर क्षितिजाशी दिसणाऱ्या विंध्य सातपुड्याच्या रांगांतील बैठी शिखरं, एखाद्या गृहिणीनं ओळीनं फुलपात्रं पालथी घालून ठेवावीत, तशी दिसत होती.'

'राजवाड्यातील पक्वान्नातून भेटीला येणाऱ्या चारोळीचे इथे जमिनीवर गालिचे अंथरलेले दिसत होते. झुडुपं-वेली यांनी एकमेकांना अशी गळामिठी मारली होती, की तो चक्रव्यूह अभिमन्यूलाही भेदता आला नसता.' मेघमल्हाराचे अचूक स्वरूप दाखविण्यासाठी मीरा गाऊ लागते तेव्हा 'त्या मधुर, रसरशीत स्वरांतून मेघमल्हारांचा घनगंभीर विस्तार ऐकताना, विश्वातल्या वायुतत्त्वानं आसमंताच्या घड्यात फुंकर घातल्यामुळे तो घुमतोय; असा भास होऊ लागला. पोटातून उमटणारा आणि ओठातून फुंटणारा तो स्वर जणू आकाशाला भेदू लागला, अगोचर मेघांना विंधू लागला.' किंवा,

'आपल्या गंडस्थळातून वाहात असलेला मद पुसण्यासाठी हत्तीने प्रचंड वृक्षांना धडक द्यावी, तशा त्या नाजुक स्वरलहरी आकाशाच्या द्वारावर आदळू लागल्या. लपलेल्या मेघराजाला आवाहन करू लागल्या.' 'अचानक उद्यानातील झाडं अंगात आल्यासारखी आळोखेपिळोखे देऊ लागली. त्या झाडांच्या असंख्य रव्यांनी आसमंत घुसळलं जाऊ लागलं. गार झुळूक पलीकडे जाताना वावटळीचे मनोरे उभारू लागली. धूळ, वाळलेली पानं, गवताच्या काड्या. त्यातून भिरभिरू लागल्या. तळपत्या सूर्याचा प्रकाश थोडा मंदावला.' लेखिकेच्या भव्य कल्पनाशक्तीचा प्रत्यय देणारी, समर्पक शब्दांत चितारलेली काव्यात्म वर्णने हे या कादंबरीचे वैभव आहे. उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, स्वभावोक्ती अलंकारांनी शब्दशैलीला असे देखणेपण बहाल केले आहे की, ही शब्दशिल्पे अंतःकरणात जपावीत. 'आजवर गरम वाळूत चालून पावलं हुळहुळी होऊन गेली होती. त्यांना यमुनेच्या झुळझुळत्या पाण्याचा स्पर्श अतिशय सुखद वाटला.' यातील वर्णांची पुनरुक्ती व नादानुकारी शब्द केवळ शाब्दिक सौंदर्य निर्माण करत नाहीत तर स्पर्शसंवेदनेला आवाहन करून वाळूच्या चटक्याची तीव्रता जाणवून देतात. त्या चटक्याचा परिणाम 'हुळहुळी' या विशेषणातून तर 'झुळझुळत्या पाण्याचा' यातून पाण्याचा शीतल सुखद स्पर्शाचा अनुभव लेखिका वाचकांपर्यंत पोचविते.

सूचक वाक्यांचा प्रयोग, शब्दांची व्युत्पत्ती, फोड व शब्दांचे अर्थ, अशा कौशल्याने लेखिका सांगते की, कथानकाचा ओघ कुठे खंडित होणार नाही, पण वाचकांच्या ज्ञानात भर पडेल. 'मीरा शब्दाचा अर्थ जलाशय, जलनिधी. त्याचं स्त्रीलिंगी रूप मीरा. ही जललक्ष्मी आपल्या पायगुणानं दुष्काळी राजपुतान्यातील पाण्याची टंचाई घालवील, या श्रद्धेनं हे नाव ठेवलं.'

सुंदर चेहऱ्यावरील लहानसा तीळही सौंदर्यात भर घालणारा ठरतो, कारण त्या तिळामुळे चेहऱ्याची नितळता, मुलायमता अधिक जाणवते, तसेच या कादंबरीबाबत म्हणता येईल. क्वचितप्रसंगी अलंकार योजनेत आलेली बोजडता, अपवादात्मक दिसणारा वर्णनातील स्थूलपणा हे दोष इतके नगण्य आहेत की, ते शोधले तर सापडतात, एरवी लक्षात येणेही कठीण.

केवळ मीरेच्या भावविश्वातील चढउतार, आंदोलने, उत्कटता, विव्हलता, वेदना यांचे चित्र रेखाटणारी ही कादंबरी नसून, तत्कालीन समाजरचना, राजकारण, वातावरण व मानवी सुष्ट-दुष्ट प्रवृत्तीचे सम्यक् दर्शन घडविणारे एक उत्कृष्ट 'महाकाव्य' आहे.

आकार व गुणवैशिष्ट्यांनी मोठी असलेली एक सुरेख, अभ्यासपूर्ण कलाकृती वाचल्याचं समाधान ही कादंबरी देऊन जाते.

(कृष्णमयी : विद्या सप्रे-चौधरी, पारख प्रकाशन, बेळगाव पृष्ठे ५१२, एकशेपासष्ट रुपये)

(प्रा. सौ. शुभदा शहा, टिळकवाडी, बेळगाव)



अनुक्रमणिका






# जगबुडी : वामन पात्रीकर
## भौतिक संस्कृती विरुद्ध आत्मिक संस्कृती

मेघा सिधये

'जगबुडी'ही वामन पात्रीकर यांची नवी कादंबरी. यापूर्वी एक स्वतंत्र आणि दोन अनुवादित कादंबऱ्या, नाटके, एकांकिका, कथासंग्रह, ललितलेख असे लेखन पात्रीकरांच्या नावावर आहे. पण त्यांचे नाव वाचकांपुढे आले ते 'जगबुडी'ला दोन पारितोपिके मिळाल्यामुळे !

एका युगांतरामुळे ढवळून निघालेले एका व्यक्तीचे भावविश्व हा या कादंबरीचा विषय. गांधीयुगाचा अस्त आणि नेहरू युगाचा उदय म्हणजे खेड्यांच्या भारताचे शहरीकरणात रूपांतर. उद्योगीकरणाचा प्रारंभ. कृषिसंस्कृतीचा लोप आणि यंत्रसंस्कृतीचा जन्म. नांगराऐवजी ट्रॅक्टर. माणसामाणसातील नात्यापेक्षा व्यवहाराकडे लक्ष. या सांस्कृतिक उलथापालथीत गुदमरून गेलेल्या एका मनाचे आक्रंदन, हा या कादंबरीचा गाभा. या संस्कृतिबदलामुळे निसर्ग, निसर्ग राहिला नाही. माणसं, माणसं राहिली नाहीत.

या कादंबरीला देऊळगाव, मुळतापी, बैतुल या प्रदेशाची, महाराष्ट्र-मध्यप्रदेश यांच्या सीमेवरची पार्श्वभूमी आहे. पण प्रादेशिक स्पर्श असूनही ती प्रादेशिकतेच्या चौकटीत अडकलेली नाही. तिच्यातून खोल जीवनाशय व्यक्त होतो. गारंबी, पडघवली ही गावं जशी त्या त्या कादंबऱ्यांत एक पात्र म्हणून येतात तसंच या कादंबरीत देऊळगाव येतं. इथे जे जग बुडलं आहे ते जग या चिमुकल्या देऊळगावातलं जग आहे. देऊळगाव धरणाखाली बुडालं याच्यापेक्षा एक माणूस 'आतून' उद्‌ध्वस्त झाला याचा प्रत्यय ही कादंबरी देते. भूप्रदेश प्रातिनिधिक ठरू शकतो. त्याच्यासाठी तळमळणारं नायकाचं चित्रण कादंबरीला जीवनमूल्यांच्या पातळीवर नेतं.

राघव लोहित हा गावच्या पाटलाचा मुलगा. आई, बापू, भुलीआत्या, लक्ष्मणदादा आणि शेतीवाडीतली मजुरांच्या प्रेमाच्या छायेत, कौतुकं झेलत लहानाचा मोठा झालेला. स्वतःचा वाडा, निसर्ग, गाईगुरं, पाखरं, चुडैलीची कोठी या सगळ्यांनी त्याला वाढवलं, हसवलं. इथंच काही बाबतीत तो अज्ञानामुळे फसला. काही गोष्टी शिकला. शिक्षणासाठी देऊळगाव सोडल्यावर तर मूळची माती आतल्याआत तगमगत राहते. व्यवहारी जगाची ओळख पटत जाते. माणसं, आपण समजतो तितकी आपली नसतात हे कळतं. एका बाजूला तारुण्य-सुलभ भावना उमलू लागतात तर दुसऱ्या बाजूला व्यवहारी जगाचे हिशेबही समजू लागतात. नागपूरला गेल्यावर अनेकविध अनुभव येतात. हा व्यक्तिमनाचा प्रवास संपन्न शैलीत चितारला जातो. उघड्या डोळ्यांनी जग पाहू शकणारा राघव, गाव मोठं होणार,

धरणाखाली गेल्यावर त्याचं जुनेपण संपणार या जाणिवेने व्याकुळ होतो. गावात फिरणारी मोटारसायकल, ट्रॅक्टर या चीजा त्याला अस्वस्थ करतात. देऊळगावच्या मातीला या यंत्राची सवय नाही. तिला सवय आहे नांगरांची. गाई-बैलांच्या खुरांची. माणसांच्या पावलाची. ही त्याची भावना. तो अंतर्यामी जखमी होतो. यांत्रिकीकरणामुळे, नवीन सुधारणांमुळे काही चांगल्या गोष्टी होतील हे त्याच्या बुद्धीला कळतंय, पण धरणाखाली वुडू पाहणाऱ्या त्याच्या द्वारकेसाठी त्याचं मन आक्रंदत राहतं.

राघवला समांतर पण विरुद्ध भूमिका घेणारी व्यक्ती म्हणजे सदू. राघवच्या दूरच्या नात्यातला सदू राघवकडेच आश्रित म्हणून वाढलेला. यांत्रिकीकरण, उद्योगीकरण याकडे पाहण्याचे दोघांचे दोन दृष्टिकोन या कादंवरीतील संघर्ष निर्माण करतात. त्यांचा विरोध तात्त्विक आहे. वैयक्तिक नाही. दोघांना एकमेकांबद्दल प्रेम आहे. ओढ आहे. पण परिस्थितीने बनलेले मनोधर्म भिन्न आहेत.

कादंवरीत भावपूर्ण चित्रण येतं ते फक्त राघवच्या मनातील वादळाचं, आकांताचं. त्यामानाने सदूचे दुःख खोल असले तरी इथे प्रभावी रीतीने साकारले गेले नाही. गावात रस्ता असता तर माझे वडील सर्पदंश झाल्यावर तडकाफडकी मृत्युमुखी पडले नसते. औषधोपचार करता आले असते. आश्रित म्हणून जगावे लागले नसते. राघवच्या वडिलांची नजर माझ्या आईवर गेली नसती. खूप धिंडवडे टळले असते. या विचाराने पोखरून गेलेला सदू त्याच्या ठसठशीत रूपात इथे भेटत नाही. राघवइतक्याच ताकदीने या कादंवरीत सदू उभा केला गेला असता तर दोन वेगवेगळ्या प्रवृत्तींचे दर्शन घडले असते.

सदू नव्या युगधर्माला सामोरा जातो. देऊळगावात होऊ घातलेला बदल त्याला स्वागतार्ह वाटतो. राघव जुने वातावरण, जुनी जीवनमूल्ये यांना धरून ठेवू पाहतो. भावनिकदृष्ट्या संपन्न आयुष्य लाभलेला राघव मनोहारी भूतकाळात दंग होतो आणि वास्तवाचे चटके बालवयातच सोसलेला सदू भूतकाळ गाडून टाकून भविष्यकाळाला जिद्दीने सामोरा जाऊ पाहतो. राघव आणि सदू यांच्या एकाच घटनेच्या संदर्भातील दोन प्रतिक्रियांमधून मानवी जीवनातील 'आतली', गूढ संगती लागते. जगण्याचा आशय किती खोल, सूक्ष्म, हळुवार आणि तरीही कणखर असतो याची जाणीव होते. या कादंबरीत मात्र ही जाणीव पृष्ठपातळीवरच राहते. या दोन व्यक्तिरेखांचा तोल साधला गेला असता तर त्यांचे मनोधर्म आणि त्यामुळे त्यांना अनुभवावे लागलेले ताण यांना सखोल अर्थ प्राप्त होऊन कादंबरीची उंची वाढली असती.

देऊळगाव दोघांनाही आपापल्या परीने खुणावत आहे. राघवला गावाचे मूळ रूप भावव्याकुळ करते तर सदूच्या वास्तववादी, व्यवहारी दृष्टीला त्याच्या विकासाची स्वप्ने दिसतात. खरे तर स्वप्ने दोघेही पाहतात पण दोघांच्या स्वप्नांचे कालिक संदर्भ वेगळे आहेत. देऊळगावचा कायापालट आणि राघव व सदूचा एकमेकांबद्दलचा मनःपालट दोन्ही गोष्टी अटळ झाल्या आहेत. देऊळगावचे 'देऊळपण' हरवते तसेच राघव व सदूचे










नातेसंबंधही हरवतात.

या कादंबरीत अनेक प्रसंग, घटना, व्यक्ती यांचा पट मांडलेला आहे. या सगळ्याचा अगदी मोजका, नेमका, हवा तेवढाच संदर्भ, पार्श्वभूमीदाखल त्या त्या ठिकाणी येतो नि मग त्या व्यक्ती अंतर्धान पावतात. परिणाम साधून घटना मागे पडतात. चित्राकृतीच्या सौंदर्यात त्यांच्या नसण्याने उणीव निर्माण झाली असती असं जाणवावं इतक्या कलात्मकतेने, विलक्षण संयमाने ही रेखाटने केलेली आहेत. हा संयम, सूचकता, चिंतनशीलता हे या कादंबरीचे वैशिष्ट्य आहे. देऊळगाव, तिथला परिसर, माणसं, पाटलांचा वाडा, यंत्रांचं आक्रमण झाल्यानंतरचे गावातील बदल सगळे दृष्टिगोचर आहे. वर्णनशैली चित्रकाराची आणि शब्दकळा कवीची, अधूनमधून प्रादेशिक बोलीचा स्पर्श, छोटी पण आशयसंपन्न वाक्ये. मिताक्षरी पण प्रवाही शैली. सुखावणारी.

सुरुवातीपासून ललितरम्य चिंतनाचा आकार धारण करत गेलेली ही कादंबरी उत्तरार्धात पार ढेपाळले. राघव मंत्री होतो तिथपासून ही कादंबरी उतरणीला लागते. उत्कटता संपते. काव्य हरवते. उरतो तो पसारा. या पसाऱ्यात प्राण उरत नाही. राघवची सही होते आणि धरणयोजना प्रत्यक्षात येते. जे घडायला नको म्हणून राघव तळमळत होता तेच घडते. अगदी त्याच्याच हातून घडते. एवढेच लेखकाला या भागातून सांगायचे होते. पण ते सांगताना कादंबरीतला भावनात्मक ताण सैल पडतो. पूर्वार्धातला राघव ज्या उत्कटतेने चित्रित केला ती उत्कटता उत्तरार्धात नाही. बदललेले, नकोसे वास्तव लेखकाला खऱ्या अर्थाने पकडता आलेले नाही.

अशा उणिवा स्पष्ट दिसतात. तरी ही कादंबरी मनाला भावते. का ? वास्तविक आज आपण क्षण जगण्याचं तत्त्वज्ञान आत्मसात करू पाहतो आहोत. बऱ्याच माणसांनी ते तत्त्वज्ञान केव्हाच पचवलं आहे. ज्यांनी ते पचवलंय तीच माणसं आपल्या वाटचालीत पुढे असलेली दिसताहेत. गावासाठी इतकी घालमेल होत असलेला राघव क्वचितच दिसतो, वाट्टेल ते करून जिंकायचंच अशा ईर्षेने माणसे जगण्याला भिडतात, पण या जिंकण्यातच पराभव असतो. या सुखातच दुःख असतं. इतरांना फसविल्याचं समाधान मानणारी माणसं स्वतःच फसलेली असतात. 'जगवुडी'तल्या राघवला असं फसायचं नव्हतं. त्याला साधंसुधं, जीवन जगायचं होतं. त्यासाठी देऊळगाव होतं तसंच राहायला हवं होतं. पण कालचक्राला हे मंजूर नव्हतं. प्रकृतिधर्म राजकारण्याचा नसतानाही राघव निवडणुकीला उभा राहिला. जिंकला. मंत्री झाला. आणि परिस्थितीचा बळी झाला.

एखाद्या लहानशा गावात सुखसोयी येणं हे चांगलं का वाईट ? भौतिकदृष्ट्या चांगलं. सांस्कृतिकदृष्ट्या घातक. या कादंबरीतला मूळ पेच हा भौतिक संस्कृती विरुद्ध आत्मिक संस्कृती असा आहे. यंत्र माणसाला सुखाची चटक लावून माणसाचंच यंत्र बनवून टाकतं. ही भौतिक संस्कृती प्रकृतीला विकृत करूनच जन्माला येते. जीवनाचं हे मानसिक कुरूपपण प्रत्येक भावनाशील व्यक्तीला टोचत असतं. ही माणसं उद्ध्वस्त होतात. राघव असाच

संपला. उरलं ते सत्ता, पैसा उपभोगणारं निर्जीव यंत्र. ही शोकांतिका, यंत्रयुगात माणूस म्हणून जगू पाहणाऱ्या सर्वांचीच आहे. म्हणूनच ही कादंबरी हुरहुर लावते.

(जगबुडी : वामन पात्रीकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४. पृष्ठे २००, ऐंशी रुपये)

(मेधा सिधये, ३०५ नारायण पेठ, पुणे ३०.)

---

# काळगर्भ : विजय सिरसट

## दलित नेतृत्वाची शोकांतिका

---

**के. व्ही. सरवदे**

---

विजय सिरसट यांची 'कुस्ती' नंतर आलेली 'काळगर्भ' ही दुसरी कादंबरी दलित साहित्य पारंपरिकतेला छेद देते. प्रस्थापित आणि विस्थापिताचे संतुलन राखून मानवी मूल्यांचे अत्यंत व्यापक रेखाटन करते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या निर्वाणानंतर दलित चळवळीने जे वळण घेतले, त्यावर ही कादंबरी प्रकाशझोत टाकते. दलितांची चिरंतन वेदना आणि दुःखाचा सूर पकडण्याचा लेखक प्रयत्न करतो.

चांदणी गावातील भीवा-जीवा आरकडे या दोन भावांच्या भोवती ही कादंबरी फिरते. एकाच आईच्या पोटी जन्माला येऊनही या भावांच्या स्वभावात आणि विचार-कृतीत कमालीची भिन्नता आहे. भीवा सातवी पास. मुंबईला डॉ. आंबेडकरांच्या अंत्यदर्शनाला जातो. चैत्यभूमीवर दलित पुढाऱ्यांनी बाबासाहेबांच्या मृतदेहाला साक्ष ठेवून दिलेला दिलासा त्याला प्रेरणादायक वाटतो. तो गावी परततो. भीमनगरात सुधारणा करू इच्छितो. अर्धगाभोळी पुढारपणामुळे तो गावच्या राजकारणात ओढला जातो. गावचा पोलिस पाटील अर्जुनतात्या याच्या तालाने नाचत राहतो. याउलट जीवा अत्यंत वलदंड आणि रासवट आहे. तो त्याच्याच वयातील मांगाच्या पोरांमध्ये राहतो. गांजा, दारू आणि पत्ते खेळण्यात मश्गुल राहतो. दोस्त नाथा याच्या बरोबर उचापती करत घरातून पळून जातो. सैन्यात भरती होतो. घरी पैसे पाठवतो. भीवाचे राजकारण त्याला पसंत नसते.

सैन्यात गेलेल्या जीवाला वाटत असते की आपल्या भावाने जमिनीची मशागत करावी. त्यातून उत्पन्न काढून चार दिवस सुखाचे पाहावेत. पण नेतृत्वाची नशा चढलेल्या भीवाला घर-प्रपंचाचे मुळीच भान राहत नाही. जन्मदात्या आई-वडिलांच्या औषध-पाण्याचाही त्याला विसर पडतो. त्यात ती दगावली जातात. जीवा बऱ्याच कालावधीनंतर गावी येऊन पाहतो, तेव्हा गावाचे चित्रच बदललेले त्याच्या नजरेत येते. भावाच्या उधळपट्टीची कल्पना त्याला येते. भाऊ सुखी-समाधानी व्हावा असे वाटणाऱ्या



अनुक्रमणिका






जीवाला तो दुष्मनासारखा वाटू लागतो. तो वायको-पुतणीला घेऊन जम्मूला नोकरीच्या गावी निघून जातो आणि भावाचे संबंध तोडून टाकतो.

तो गेल्यामुळे घराला आलेले घरपण आणि त्यातून मिळालेली स्थिरताच नष्ट होऊन जाते. भीवाचा पुढारीपणाचा रुबाब भावकीच्या डोळ्यांत सलतो. एखादा माणूस पुढे चालला, तो खाऊन सुखी जीवन जगू लागला, त्याचे घर सुधारू लागले की, पहिल्यांदा त्याची जातच इथे वैरी बनते. पहिल्या निवडणुकीत निवडून आलेला भीवा, त्याच्याच वार्डातून दुसऱ्यांदा आपटी खातो. येथूनच अधःपतन सुरू होते. त्याला पोलिस पाटीलकी मिळते. पण 'घरात नाही दाणा मला पाटील म्हणा' अशी त्याची अवस्था होते. उपाशी मरायची वेळ येते. अशी दमकोंडी झाली असतानाही मोठा हिय्या करून खळे मागण्यास तो जातो तर त्याची निर्भर्त्सना होते. खळदळे मागण्यास आडवी येणारी पोलिसपाटीलकी तो सोडतो तेव्हा निर्भेळ आनंद त्याच्या चेहऱ्यावर ओसंडून वाहतो. इथेच कादंवरी संपते.

विजय सिरसट या कादंबरीच्या माध्यमातून काही प्रश्न उपस्थित करतात. लोक ज्या ग्रामीण संस्कृतीचा उदो उदो करतात, ती संस्कृती शिल्लक राहिली आहे काय ?

दलितांमधील अंतर्गत संघर्ष आणि प्रस्थापित वर्गाची एकूणच व्यवहारावर असणारी पकड या दोन्हींचे अवधान या कथेत जाणवते.

गायरानाच्या झगड्याद्वारे दलितांचे होणारे शोषण रंगवले आहे. महार-मांग यांतील संघर्षही वेगवेगळ्या पातळ्यांवर जाणवतो. महाराच्या लग्नाची वरात मांगवाड्यातून जाण्यास विरोध होतो. असे अनेक तपशील यात येतात.

परिस्थितीचे गांभीर्य पाळून संतुलन राखतानाही खिल्ली उडवणारे नाईक फौजदार, गावाला स्वतःच्या बोटावर नाचविणारे अर्जुनतात्या पाटील, त्यांचा रंगेल मुलगा ईश्वर. 'कुठं हाणू रुमणं' असे आडदांड वागणारे, राजकारणी डावपेच खेळणारे परवतराव, मतलबाशी गाठ घालणारे हौसलमलसाहेब. अशी अनेक पात्रे उभी केलेली आहेत. गायकवाड गुरुजी हाही सुधारणावादी पुढारी. एका विवाहित तरुणीला पळवून नेतो. लग्न करतो. प्रा. फुलपगार, बाबूराव कदम यांसारखे दलित नेतेही येथे आहेत. मात्र लेखकाचा प्रवक्ता म्हणून गायकवाड जाणवतो; खळे मागण्याची पाळी भीवावर लेखक का आणून सोडतो हे कळत नाही. अगतिक होऊन त्याने पोलिस पाटीलकीचा राजीनामा देणे एकवार समजू शकते. पण खळे मागण्यास त्यामुळे अडसर येतो म्हणणे ही चळवळीशी प्रतारणा ठरते. आंधळेपणाने दलित चळवळ चालविणारे अर्धकच्चे नेतेच या चळवळीचा पराभव करतात असे म्हणावे लागेल !

लेखनशैली काहीशी मिस्कील, चिमटे आणि फिरक्या घेत घेत करुण-गंभीर चिंतनशीलता वाढविणारी आहे.

(काळगर्भ : विजय सिरसट, प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठे १६२. साठ रुपये)

(के. व्ही. सरवदे, अशोक नगर, कळंब ४१३ ५०७.)



अनुक्रमणिका







# तीन भिंती : वैजनाथ कळसे
## महाविद्यालयीन क्षेत्रातील जातीय राजकारण

माधव पिटके

गेल्या काही वर्षांत शिक्षणाचा प्रसार झपाट्याने झाला आहे. गावोगाव शाळा-कॉलेजे, शिक्षणसंस्था निघत आहेत. शिक्षणापासून वंचित असा एक मोठा समाज शिकून शहाणा होत आहे. अज्ञान दूर होत आहे. तरुणांना त्यांच्या अस्मितेची, हक्काची, त्यांच्यावर सतत होणाऱ्या अन्यायाची, जातीयतेची, आर्थिक विषमतेची तीव्रतेने जाणीव होत आहे.

सुशिक्षित, हुशार, तरल बुद्धीच्या अशा तरुणांचे भावजीवन नव्याने अनुभवाला येत आहे.

अशाच एका तरुणाची मनोव्यथा वैजनाथ कळसे यांनी 'तीन भिंती' या कादंबरीत मांडली आहे.

ग्रामीण भागात स्थापन होणारी महाविद्यालये ही गटबाजी, स्थानिक राजकारण, मूठभरांची मक्तेदारी, जातीय वर्चस्व यांना यथोचित खतपाणी घालत आहेत. त्यामुळे शिक्षणाचे क्षेत्र दूषित होऊन शाळा-कॉलेजे ही अन्याय, जुलूम-जबरदस्तीची केंद्रे बनत आहेत. नियम धुडकावून लावणे, कायदेकानूतून पळवाटा काढून त्यांची वासलात लावणे, नोकरीत कायम न करणे, गुणवत्तेनुसार पगार न देणे या गोष्टी सर्रास घडत आहेत. त्यामुळे गुणवान, होतकरू, हुशार पण ग्रामीण भागातून दलित समाजातून येणाऱ्या प्राध्यापकावर अन्याय होत आहे. त्यांना अगतिक होऊन मानहानी सहन करावी लागत आहे.

विश्वनाथ माधवराव रांकोळे या तत्त्वज्ञान विषय घेऊन एम्. ए. झालेल्या, प्राध्यापकाच्या पेशाला सर्वथैव योग्य असलेल्या तरुणाला कोणकोणत्या प्रसंगांतून जावे लागते, त्याचे चित्रण या कादंबरीत आहे.

कादंबरीचा आवाका मोठा नाही. प्रा. रांकोळे एकूण सहा वर्षांच्या कालावधीत पाच महाविद्यालयांतून नोकरी करतो. पहिली दोन खानदेशातली आहेत. तर नंतरची कोकणातली आहेत. त्याला भेटलेले प्राचार्य, विभाग-प्रमुख व बरोबरचे प्राध्यापक यांच्या संबंधाचे, स्वभाव वैशिष्ट्यांचे, त्यातून मिळत जाणाऱ्या अनुभवांचे चित्रण लेखकाने केले आहे.

हे अनुभव कथन वस्तुस्थितीचे थेट दर्शन घडवणारे म्हणून मनाला भिडणारे आहे.

प्रा. रांकोळेचे आई-वडील काबाडकष्ट करणारे साधे मजूर आहेत. अडीअडचणींना तोंड देत, जीवाचा आटापीटा करीत मुलाला ते शिकवतात. थोड्या प्रतीक्षेनंतर त्याला खानदेशातील एका कॉलेजात अर्धवेळ प्राध्यापकी मिळते. मुलगा आता मोठा झाला, 'साहेब' झाला, आता आपले दैन्य दूर होईल, सुखाचे चार दिवस येतील, असे










आई-वडिलांना वाटत असते.

मुलाला दरमहा दोनशे रुपये तनखा मिळतो. बायको, लहान मूल यांना घेऊन तो नोकरीच्या गावी राहतो. घरभाडे ऐंशी रुपये असते. आई-वडिलांना पन्नास रुपये पाठवतो. अर्धपोटी राहणे, अंगभर कपडा नसणे हा अनुभव त्याला काही नवीन नसतो.

कॉलेजातील वातावरणाशी तो जमवून घेण्याचा प्रयत्न करतो. देतील ते काम मुकाट्याने स्वीकारतो. त्याच्या विभागाचे प्रमुख जोशी हे एक भले प्राध्यापक. ते त्याला धीर देतात. अडीअडचणीला मदत करण्याची तयारी दाखवतात. 'मुलाच्या पाठीवर हात ठेवावेत तितक्या ममतेने त्याच्या पाठीवर सरांनी हात ठेवला' ही जवळीक त्यांच्यात असते.

'तुम्ही अर्ज देऊन ठेवा. गरज भासली तर कळवूच.' असे वर्षाअखेर प्राचार्यांना तो भेटायला गेला त्या वेळी त्याला सांगण्यात येते.

त्याच्या विषयाची फुलटाइम जागेची शक्यता असताना त्याचे भवितव्य अनिश्चित झाले. कारण ?

संभाजी पाटील नामक ग्रह प्रा. रांकोळेच्या राशीला लागला होता. त्याला बी. ए. ला किंवा एम्. ए. ला क्लास नव्हता. पण तो प्राचार्यांचा नातेवाईक होता. स्पेशल केस म्हणून त्याला घेतले होते. प्रा. रांकोळयांच्या जागी त्याची वर्णी लागणार होती.

भोसले कॉलेजातला हा अनुभव तर नंतरच्या गोखले कॉलेजात आणखी काही वेगळे घडते. तिथल्या विभागप्रमुख प्रा. शिरोडकरबाई तर 'तुम्हाला साधी मराठी बोलता येत नाही. तुमच्या बोलण्यात तुमच्या भागातील बोली भाषेचा हेल असतो.' म्हणून त्याला नाकारतात. खरे तर, या बाईंशी तो भिऊन, आदब ठेवून वागत असे. त्यांचे कितीतरी ऑफ पिरिअडस् त्यांच्या अडीअडचणीच्या वेळी आपण होऊन घेत असे.

हा आणि अशाच तऱ्हेचा कितीतरी अनुभव पाठीशी बांधून प्रा. रांकोळे अखेर कोकणात नोकरीसाठी जातो.

कोकणात धनकवलीच्या कॉलेजात पूर्णवेळ जागेची जाहिरात वाचून तो येतो. तर 'तुमची पोस्ट जाहिरातीमध्ये पूर्णवेळ म्हणून चुकून पडलेली आहे. ती अर्धवेळ आहे. अर्ध वेळ काम करण्याची इच्छा असेल तरच पुढचे बोलू.' प्राचार्य तानाजीराव पिसाळ सांगतात. प्रा. रांकोळेवर थक्क होण्याची पाळी येते.

'आपल्यावर अन्याय होतो आहे' हे सांगायला जावे तर 'बाकीच्या संबंधी तुमचं काही देणं-घेणं नाही. तुम्ही फक्त तुमच्यापुरते बोला !' असे प्राचार्यांचे उत्तर !

'मग सर, पुढच्या वर्षासाठी अर्ज तरी देऊन ठेवू काय ?' असे विचारल्यावर "ठेवा देऊन कारकुनाकडे." इतके सहज, बेफिकीर उत्तर.

देवकोट येथील कॉलेजात अर्धवेळ प्राध्यापकी स्वीकारल्यानंतरही यापेक्षा वेगळे काही अनुभव आले नाहीत.

रत्नपुरी या जिल्ह्याच्या ठिकाणच्या मोठ्या कॉलेजात पूर्णवेळ प्राध्यापकाची नोकरी



अनुक्रमणिका






मिळते. आतातरी आपल्याला प्रतिष्ठेचे, चार घास सुखाचे मिळतील असे वाटते. महिना संपताच साडे-अकराशे रुपये पगार त्याच्या नावावर बँकेत जमा झालेला. त्याचं मन आज आकाशाला गवसणी घालायला निघालं असतं. पण मागच्या कडू आठवणींची चव जाणवत असते.

रत्नपुरीच्या कॉलेजातले अनुभव अधिकच अस्वस्थ, संतप्त करणारे. जातीयवादी वृत्तीचे दर्शन त्याला तिथे घडते. शक्य असूनही नोकरीत कायम करण्याची संधी नाकारली जाते. वैध मार्गाने विद्यापीठ, शासकीय यंत्रणा, प्राध्यापक संघटना यांच्याशी तो झगडत राहतो. पण कुठेच दाद लागत नाही. तेव्हा अखेरचा उपाय म्हणून तो कॉलेजच्या प्रवेशद्वाराशी प्राणांतिक उपोषणास बसतो त्या वेळीही त्याला संधिसाधूपणाचे अनेक मासले दिसून येतात.

प्रा. रांकोळे अन्याय, मानहानी सहन करत जातो. वेळोवेळी संतप्त होतो. पण संयम पाळतो. भडकून जातो, पण आक्रमक होत नाही. "माझ्याकडून तसूभरही चूक होणार नाही याची मी काळजी घेईन, काही चूक नसताना दोष आलाच तर तोही मी स्वीकारीन. कारण मला जगायचं आहे !" हे त्याचे उद्‌गार.

उपोषणाच्या चौथ्या दिवशी प्रा. रांकोळेची बायको बरोबर लहान मुलीला घेऊन भेटायला येते. त्या वेळी ती म्हणते, "तुम्ही स्वतःच्या शरीराची एवढी दशा कशाला करून घेता ? हे एवढं मोठं जग आहे. ह्या उघड्या जगात लाखाने पशुपक्षी रस्त्यावर जे मिळेल ते खाऊन फिरतात. आपण तर माणसं आहोत. तुमच्याकडे एवढी मोठी पदवी आहे. सुखात नाही तर नाही; पण पोटभर दोन घास खायला कुठं का होईना पण मिळेलच. आतापर्यंत खात आलोच की !" बाईचे हे संयमाचे, समजूतदारपणाचे बोलणे अंतःकरणाला भिडणारे आहे.

प्रा. रांकोळेची ही कहाणी खूप काही सांगून जाते व आणखीही काही सांगायचे शिल्लक राहिले असे वाटत राहते.

वैजनाथ कळसे यांचे हे दुसरे पुस्तक. त्यामानाने त्यांनी चांगले यश कमावले असे म्हणता येईल.

(तीन भिंती : वैजनाथ कळसे, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई ४. पृष्ठे १६८. साठ रुपये. प्रथमावृत्ती— फेब्रु. ९०.)

(माधव पिटके ७६ माची, सातारा)

---

*साभार-स्वीकार*

**चरित्रे-आत्मकथने**

* **सरदार बापू गोखले**— सदाशिव आठवले, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे— २११, ऐंशी रुपये.
* **नक्कलनामा**— नाना टेलर, जयश्री प्रकाशन, नागपूर-१०, पृष्ठे— १४०, पंचेचाळीस रुपये.
* **माझी वाकळ**— रत्नाजी आगवणे, कॉंटिनेटल, पुणे-३०, पृष्ठे— १४७, पंचवीस रुपये.



अनुक्रमणिका






# क्षुद्रदेवता : डॉ. केशव रेड्डी
## गाजलेल्या तेलगू कादंबरीचा अनुवाद

आशा मुंडले

'क्षुद्रदेवता' ही मूळ तेलगू कादंबरी. लेखक डॉ. केशव रेड्डी, अनुवादक डॉ. अरविंद कोरबा. या निमित्ताने आधुनिक तेलगू साहित्याच्या दर्जेदार संपन्नपणाचा परिचय झाला.

मूळ लेखक व्यवसायाने डॉक्टर. रेड्डी जमातीचे. त्यांनी तेथील पूर्वास्पृश्य माला, नादिगा या समूहाचे भेदक जीवनदर्शन घडवले आहे. पण केवळ त्यात शोषणाचे चित्रण आहे म्हणून पुस्तक चांगले असे मात्र नाही. तेलगूत १९७९ साली प्रसिद्ध झालेली ही एक उत्कृष्ट साहित्यकृती आहे.

मला स्वतःला आंध्रमध्ये नक्षलवादी लोकांची चळवळ जनतेला जवळची का वाटते याचा उलगडा हे पुस्तक वाचल्यावर झाला. अर्थात या पुस्तकात चळवळीबद्दल एक शब्दही नाही.

रामचंद्र नावाच्या रामपालूची ही कहाणी. रामपालू ही माला (महार) यांची एक पोटजात. तो, त्याची बायको नागी आणि मुलगा किस्ना यांचे जीवन उद्ध्वस्त करणारी ही कहाणी.

रामचंद्राला एक विशेष व्यक्तिमत्त्व आहे. तो आतून पूर्ण चेपलेला नाही. त्याला स्वाभिमान आहे, त्याला राग येतो, खऱ्या-खोट्याचा विचार करता येतो. आपल्यावर येणारी संकटे मानवनिर्मित आहेत हे त्याला कळते. जमीनदार जुलमी आहे हे त्याला कळते. समोरच्या माणसाशी तो संवाद करू इच्छितो.

पण समाजरचना तशी नाही. त्याची विचारशक्ती हा जमीनदाराचा अधिक्षेप आहे अशी भावना इतर मालांमधेच आहे. तेच त्याचा शेवटी विध्वंस करतात.

पण रामचंद्र गाव सोडून पुढे निघतो. जिथे जातो तिथे त्याला तोच अनुभव येतो.

या कादंबरीचा शेवट ग्रीक ट्रॅजेडीसारखा अटळ वाटतो. कारण त्याचे मूळ रामचंद्राच्या धर्मभोळेपणात आहे. अगदी शेवटी त्याला अर्जुन रेड्डी आश्रय देतो, स्वतःच्या झोपडीत.

दारूच्या नशेत अर्जुन त्याला जातिभेद नष्ट करण्याचा कायदा आहे हे समजावतो. चिडलेले इतर महार अर्जुनच्या झोपडीला आग लावतात. जिवंत जळणारा अर्जुन अंगाची आग कमी व्हावी म्हणून मरण्यापूर्वी देवळातल्या समईतले तेल माझ्या फोडांवर घाल म्हणून विनवतो.

पण इतर अनेकवेळा स्वतंत्र वागणारा रामचंद्र गाभाऱ्यात प्रवेश करायला नको म्हणून जागीच उभा राहतो आणि मरण्यापूर्वी सारे बळ गोळा करून अर्जुन त्याच्या तोंडावर थुंकतो.



अनुक्रमणिका







क्षुद्रदेवता हे नाव अन्वर्थक आहे.

खेटराने, केरसुणीने मार खाऊनच संतुष्ट होणारी बोंवा मंगम्मा ही आंध्रमधील खरोखरचीच लोकदेवता आहे. काल्पनिक नाही. तिचे पारंपरिक साम्य आपल्याकडच्या मरीआईशी आहे. तिचा प्रभावी प्रतीकात्मक वापर लेखकाने केला आहे.

गुलामाच्या मनात रुजलेली गुलामी वृत्ती हीच अखेर त्याचा पराभव करते हे विदारक, कटु सत्य यात आहे.

लेखकाचे वैशिष्ट्य म्हणजे यात फक्त सरळ साधी गोष्ट आहे. ओळीने घडणारे रामचंद्राच्या आयुष्यातले काही दिवस फक्त. कुठेही भाष्य किंवा उपदेश नाही. पण प्रभावी वर्णनशैलीमुळे आणि अतिशय भेदक संवादांतून आपल्या मनावर न विसरणारा, झोप उडवणारा अस्वस्थ ठसा उमटतो. १९८० सालातला हा आंध्र शरदबाबूंच्या गेल्या शतकातल्या बंगालइतकाच अजून किडलेला आहे.

समकालीन भारताचे हे चित्र इतके भेसूर आहे, यातली वरिष्ठ वर्गाची उद्दाम आत्मतुष्टता इतकी संतापजनक आहे की महाराष्ट्रातल्या पूर्वास्पृश्य जातींनाही ती अनोळखी वाटावी.

नारळाच्या खोडात जमीनदाराने लपवलेल्या ब्लेडमुळे मांड्या कापल्या जाऊन किस्ना मरतो तेव्हाचा प्रसंग या दृष्टीने विशेष वाचण्यासारखा आहे. त्याच्या मर्तिकाचा खर्च देताना मुन्सब जे भाषण करतो ते अविस्मरणीय आहे. त्यातला दंभ, शेखी आणि इतरांची मुन्सबाच्या थोरवीबद्दलची खात्री एकत्र अनुभवली की आम्ही माणूस कधी होऊ का नाही अशी शंका भारतीय समाजाबद्दल येऊ लागते.

क्षुद्रदेवता हा न विसरणारा साहित्यिक अनुभव आहे. नुसता आक्रोश किंवा नुसताच प्रचार याचा स्पर्शही नसलेली ही एक उत्तम कादंबरी आहे.

आपल्याकडे साहित्याची गुणवत्ता यावर विचार करणाऱ्या आणि वाचनातून मन सजग आणि समृद्ध होते असं मानणाऱ्या सर्वांनीच ही वाचण्यासारखी आहे. अनेक पातळ्यांवर हिच्यातले शब्द ,वर्णने आणि संवाद आपल्याला भिडतात.

कुत्री, डुकरे यांच्या अचूक वर्णनातूनं लेखकाच्या भेदक निरीक्षणाचा प्रत्यय येतो. माणसांची वागणूक व लगेचच केलेले कुत्र्यांचे वर्णन लेखकाने भाष्य न केल्यामुळे अधिकच प्रभावीपणे आपल्याला जे सांगायचे ते सांगतात. असे समर्थ चित्रण आजतरी मराठीत सहज सापडत नाही.

(क्षुद्रदेवता : डॉ. केशव रेड्डी, अनुवाद— अरविंद कोरवा, मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश, हैद्राबाद. चाळीस रुपये)

(आशा मुंडले, मनश्री सोसायटी, ब्लॉक १६, सर्व्हे १६३, बी. पी. रोड, औंध, पुणे ७.)



अनुक्रमणिका

## बोलगाणी : मंगेश पाडगावकर–
### सहज स्वाभाविकतेचा बुरखा पांघरलेली बोलगाणी–

आशा भिडे

'बोलगाणी' वाचल्यावर त्यावर अभिप्राय म्हणून चक्क कविताच सुचली मला, नि तीही बोलगाण्यातच.

**बोलगाण्यावरचं गाणं–**

*बोलबोल बोलता, मी 'बोलगाणी' वाचली*
*होलसेल भावात मी गोडी त्याची चाखली*
*बोलगाण्याचा बोलबाला*
*आधीच होता झाला*
*गणपतीत, नवरात्रीत*
*कवी होता गायला*
*म्हणून त्याची सुरावट आधीच मनात ठसली*
*बोल बोल बोलता मी बोलगाणी वाचली*
*होलसेल भावात मी गोडी त्याची चाखली*
*आहे थोडी गंमत त्यात*
*तुम्हीही व्हाल सहमत ह्यात*
*मग बसाल कविता गात*
*ताला सुरात, मनातल्या मनात*
*म्हणून मीही अशीच एकदा वाचनसमाधी लावली*
*बोलबोल बोलता मी बोलगाणी वाचली*
*होलसेल भावात मी गोडी त्याची चाखली*
*काही कविता थिल्लर आहेत*
*आणखी काही चिल्लर आहेत;*
*पाखरं, चिऊ, आजोबा, विदूषक*
*या स्पिन बोलर आहेत*
*म्हणून एकदा वाचाच तुम्ही, मग म्हणाल 'भावली'*
*बोल बोल बोलता मी बोलगाणी वाचली*



अनुक्रमणिका






*होलसेल भावात मी गोडी त्याची चाखली*
*तुम्ही एकदा वाचा तरी*
*जास्त वेळ लागणार नाही;*
*निदान वेळ वाया गेला*
*असं मुळीच वाटणार नाही*
*दुर्बोधतेनं डोकेदुखी म्हणणार नाही लागली*
*बोल बोल बोलता मी बोलगाणी वाचली*
*होलसेल भावात मी गोडी त्याची चाखली*

बोलगाणी ही गाणी म्हणजे भावगीतं नाहीत किंवा मुक्तछंदात लिहिलेल्या कविताही नाहीत. (अपवाद– या संग्रहात उरलेली जागा भरून काढण्यासाठी दिलेल्या छोट्या छोट्या कविता. श्रेय, मरणं, दुपार, मृत्यूनंतर, खरं गाणं, अंगण, गोष्ट वगैरे. या कवितांचा विषय किंवा रचना बोलगाण्याची नाही. म्हणून या कविता या संग्रहात अप्रस्तुत किंवा विसंगत वाटतात. सर्वदूर पसरलेल्या हिरव्यागार गवताच्या लॉनवर मधेच निशिगंधाचे धांडे बहरलेले दृष्टीस पडावेत तसे वाटते. या छोट्या कवितांचा दर्जा खरं पाहू जाता बोलगाण्यांपेक्षा वरचा आहे. छोट्याशा पण वरंच काही सांगून जाणाऱ्या या कविता आहेत. राजा व विदूषक या दोन दीर्घ कविताही वेगळ्या पडतात.)

या बोलगाण्यांना गेयतेचे अंग नाही (पण आजकाल नवकाव्याला-गद्याला चाल लावणारे महाभाग संगीतकार आहेत) तरीपण या गाण्यांना एक प्रकारची लय व ताल आहे. मात्रांची ठराविक आवर्तने यात नाहीत. तंतोतंत गाण्यासारखा यांचा रचनाबंध नाही. ध्रुपद दर कडव्यानंतर गाण्यात येते तसे येत नाही, तर कवीला हवे तेव्हा तीन, चार कडव्यानंतर कुठेही ते येते. या कवितांना अंगभूत अशी स्वतःची चाल आहे, ताल आहे, तरीही ती गेय गीते नाहीत.

रोजच्या बोलभाषेशी जवळीक साधणारी गाणी आहेत. बोलीतला नैसर्गिक तोंडवळा व बोलभाषेतली शब्दकळा यांचा समन्वय यात झाला आहे. म्हणून ही बोलगाणी छोट्या मुलांची 'बडबड गीते' असतात तशी मोठ्या माणसांची 'बडबड गीते' आहेत.

ही बोलगाणी सादरीकरणाचा आव मनात ठेवूनच लिहिलेली आहेत. म्हणून पाडगावकरांचा काव्यगायनातला 'विदुषकी बाज' या बोलगाण्यात आहे, 'ढुंगणाला फोड आला' ही त्यांची कविता मी त्यांच्याकडून विदुषकी हावभाव व शब्द उच्चारण्याची त्यांची एक स्वतःची शैली या सर्वासह ऐकत आले आहे. (आपणही ऐकली असेल. त्यापेक्षा ही 'बोलगाणी' सुसह्य आहेत.) 'ढुंगण' हा त्यांचा फार लाडका शब्द दिसतोय. कारण बोलगाण्यातही तो अनेकदा आलाय.

*कुणाला वाटेल बोलगाणी गावीत*
*कुणाला वाटेल ऐकत न्हावीत,*
*तर राहू दे की !*

असं पाडगावकरांसारखंच म्हणावंसं वाटतं.

'बोलगाणी' ही सहज कुणालाही समजण्यासारखी आहेत. त्यांची भाषा वाचकांशी सहज सुसंवाद साधणारी आहे. तरीपण यातील गाण्यांचं वर्गीकरण करायचं झालंच तर 'होय्योचं गाणं' हे अगदीच पोरकट वाटतं, 'शहाणपणाचं गाणं' अतिशय सामान्य वाटतं, 'तर काय तर काय ! खाली डोकं वर पाय' हे गमतीदार वाटतं. 'चिऊताई, दार उघड' ही कविता जीवनाचे तत्त्वज्ञान सांगते. 'तरीसुद्धा' या पहिल्याच गाण्यात, ही गाणी प्रत्येकाला मनात वाचता आली पाहिजेत आणि वाचता वाचता मनात प्रत्येकाला नाचता आलं पाहिजे, असं कवी सांगतो. 'मनमोकळं गाणं' हे सुंदर साधलेलं बोलगाणं आहे.

*सूर तर आहेत : आपण फक्त झुलायचं !*
*मन मोकळं, अगदी मोकळं करायचं,*
*पाखरू होऊन पाखरांशी बोलायचं !*

पाडगावकरी लय मनात ठेका धरते, कानात घुमत राहते. वाचता वाचता कवितेबरोबर आपण झुलू लागतो.

मोरासारखा फुलून येणारा अंधार, फांद्याचे हिरवे रावे भिजून गेले, मातीच्या मौनाला इवलं इवलं फूल आलं अशा प्रतिमा बोलगाण्यात वारंवार येतात. थेंबोणी, अनवट यांसारखे नवनिर्मित शब्द आपले लक्ष वेधून घेतात.

निराशेची राख फुंकरून आशेचं स्फुल्लिंग जागवण्याचा प्रयत्न येथे आहे. जगण्यावर, जगावर, जीवनावर मी प्रेम केलंय तसं तुम्हीपण करा असं कवी सांगतो आहे. 'कम ऑन, मी गाणं गातोय, मनातल्या मनात नाचतोय, तल्लीनतेनं झुलतोय. तुम्ही पण गा, नाचा, झुला माझ्यावरोवर. जीवनातला आनंद लुटा, मौज करा, आशावादी व्हा. मन ताजतवानं राखा.'

'आताचा हा क्षण', 'याचं असं काय होतं ?', 'राजा', 'विदूपक', 'खरं काय वाटतं त्याचं गाणं' यामधून सामाजिक व राजकीय समस्यांवर प्रकाश टाकला आहे. नानाकाकांच्या लग्नाचा वाढदिवस, नसलेल्या आजोबाचं असलेलं गाणं, ही सामान्य गद्य गोष्ट वाटते. काव्यासारखे दोन-तीन शब्दच एका ओळीत लिहीत गेले म्हणजे त्याला कविता म्हणायचे का ? 'नसलेल्या आजोबांचं असलेलं गाणं' या कवितेत,

*"आजोबा, बॅड मॅनर्स,*
*व्हाट आर यू डुइंग ?"*

आजोबांचं हसून उत्तर :

*"आय ॲम जस्ट ढेकरिंग !"*

या ओळीत कसले काव्य आहे ? नावाजलेल्या लोकांनी काहीही लिहिलं तरी ते काव्य होतं, बोलगाणी होतात असं मानायचं का ? काही कल्पना मात्र सुंदर आहेत.

*निराशेच्या पोकळीमध्ये*
*काही सुद्धा घडत नाही !*
*आपलं दार बंद म्हणून कुणाचंच अडत नाही (चिऊताईचं गाणं)*
*आषाढाच्या धारात तुमचं*
*शरीर, मन न्हाऊ लागतं;*
*वसंताच्या फांदीवरून*
*कुहू कुहू गाऊ लागतं ! (यात काही पाप नाही)*
*मातीतच परमेश्वर*
*हिरवागार सजून येतो;*
*मातीच्या मार्दवातच*
*फुलांनी सजून येतो ! (पाखराशी नातं)*
*फुलून येते संध्याकाळः*
*रंगाची बाधा होते !*
*निळ्या निळ्या कृष्णासाठी*
*सगळी सृष्टि राधा होते ! (गाणं जगण्याचं)*
*पाखरं जरी दिसली नाहीत*
*ऐकू येतात गाणी,*
*आभाळ कुठलं कळत नाही*
*इतकं निवळ पाणी ! (एकटं असावंसं वाटतं)*

अशा सुंदर ओळी वाचकांच्या मनाला त्या कविता पुन्हा वाचण्यास मोहिनी घालतात.

'प्रेम म्हणजे प्रेम असतं', 'गाणं घरच्या राजाचं', 'याचं असं का होतं ?', 'तिने लाजून होय म्हटलं' ही गाणी कविसंमेलनात दाद देणारी व टाळ्या घेणारी आहेत.

(बोलगाणी— मंगेश पाडगावकर, मौज प्रकाशन, मुंबई ४. पृष्ठे १२०. पन्नास रुपये)

(आशा भिडे, बी-९, विजय अपार्टमेंट, आराधना टॉकीजजवळ, ठाणे (पश्चिम), ४००६०२)

---

**साभार-स्वीकार**

* **जन्म झुंजाराचा**— संदीप हळदणकर, मार्ग प्रकाशन, पुणे-१, पृष्ठे— १७८, पंधरा रुपये.
* **मर्यादापुरुषोत्तम राम**— श्री. मा. कुलकर्णी, मासश्री प्रकाशन, नागपूर-९, पृष्ठे— ३१६, शंभर रुपये.
* **स्त्री आत्मकथने**— सं. चंद्रकुमार नलगे, गंगाधर पानतावणे, सुरेश एजन्सी, पुणे- , पृष्ठे— १४४, पन्नास रुपये.
* **प्राचीन भारतातील महापुरुष**— भाग्यश्री काळे, ज्ञानेश प्रकाशन, नागपूर-२२, पृष्ठे— ४२, बारा रुपये.
* **स्वस्तिश्री बटेशु**— भाऊ बाविस्कर, जनवाणी प्रेस, पुणे-२, पृष्ठे—८०, वीस रुपये.

# देवराई : वसंत सावंत

## निसर्ग व लोकजीवन यांच्याशी जोडलेले सौंदर्यदृष्टीचे नाते

डॉ. वि. म. कुलकर्णी

देवराई हा वसंत सावंत यांचा तिसरा काव्यसंग्रह. त्यांचे यापूर्वीचे 'स्वस्तिक' व 'उगवाई' हे संग्रह रसिकमान्य झाले आहेत.

या संग्रहात कोकणभूमीतील निसर्गरम्य परिसराची स्पंदने सर्वत्र जाणवतात. कविवर्य बोरकरांची परंपरा पुढे चालवणारा हा कवी भावसंपन्न व शब्दसुंदर स्वतंत्र रचना करण्यात चतुर आहे. अस्सल कोकणी बोलीतील ७/८ कविता या संग्रहात आल्या आहेत.

मराठीचे नितळ रूप व भावभावनांचे चंचल तरंग यांचा मिलाफ येथे आढळून येतो. मुक्तछंद ओवी-अभंग ही सारी माध्यमे कवीने हाताळली आहेत. कवीची प्रामाणिक भावना आहे ती अशी :

*अक्षरांच्या वाटेनेच । गाठली मी तुझी राई*
*जिथे गाठीभेटी झाल्या । तिथे सांडली ही शाई ॥*

प्रा. रमेश तेंडुलकर यांनी आपल्या आस्वादक प्रास्ताविकात म्हटल्याप्रमाणे– 'सावंतवाडीमुळे सह्याद्री आणि तळकोकणचा निसर्ग आणि त्या परिसरातील लोकजीवनामधल्या पारंपरिक श्रद्ध-संकेतांचे विश्व यांच्याशी त्यांची कविता विलक्षण तादात्म्य पावते. सृष्टीतील चैतन्याची स्पंदनं घेऊन निसर्ग त्यांच्या प्रतिमासृष्टीत अवतरतो.'

जीवनातल्या हळुवार प्रेमभावालाही या कवितेत विशेष स्थान प्राप्त झाले आहे. 'नको गगन पेटवू', 'तू अशी गप्प गप्प जाशी समोरून', 'एवढी जरी हसलीस तरी', 'अर्घ्य' इ. कविता पाहण्याजोग्या आहेत. "आहे खोल मनी" ही त्यांची कविताही एक वेगळा ठसा मनावर उमटवून जाते. 'एकान्त आता' अस्सल प्रेमकवितेची प्रतिमा धुंद शब्दांत साकार करते.

या कवितेला आत खोलवर कुठेतरी अध्यात्माचा, ॐकाराचा, शब्दांपलीकडच्या सूक्ष्म आंतरलयीचा स्पर्श झालेला आहे. 'देवराई' हे नावही सार्थच म्हणावयास हवे.

ही कविता सूचक अर्थाचा पदर सोडून निरर्थक गद्य वाटेने प्रवास करताना कोठेच आढळत नाही. अर्थगर्भ, सुभाषितवजा ओळीही काही कवितांना एक निराळीच जरतारी नक्षी लावून जातात.

'गूढ प्रारब्धाची गती– सूत्र चालवितो कोण ?' असे ते म्हणतात तेव्हा मन अंतर्मुख होते.



अनुक्रमणिका







*'एक क्षण चुकतो आणि अख्खा जन्म जातो वाया*
*मूळात तो नसतो हाती, अशी नियतीची छाया'*
*'कळावे तुला आणखी या जगाला, न प्रीतीविणा पूर्णता लाभते'*
हे चरणही असेच चिरंतन सत्याने भारलेले व मनाला भिडणारे आहेत.

या संग्रहातील काही कविता आटोपशीर व आशयघन आहेत. हे या कवितेने घेतलेले एक नवीनच वळण आहे.

आशय व्यक्त होऊन संपला की, कविताही उगाच लांबण लावत पुढे जात नाही.

'वाजत वाजत आले पाऊल, घुंघुर घुंघुर कान । डोळे रंगुन उरला मोहन, झिंगुन माझे प्राण' अशा चरणांतून एक अनोखे भावविश्व उमलत जाते व आशय व्यक्त होताच पूर्णविराम देऊन थांबते.

'घरभरणी', 'उडूनि गेली नीज', 'मला तुझे हात', 'शिवरात' इ. कवितांतून काही अपार्थिव आनंदाचे क्षण हाती लागतात.

कवीला एका विशिष्ट आत्मसत्त्वाचा नाद लागला आहे, ध्यास लागला आहे म्हणून ही देवराई आगळे आंतरस्वर लेवून उभी आहे हे ध्यानात येते.

हा कवी आस्तिक किंवा आस्तिक्यवादी आहे. त्याचे लावण्यसंपन्न कोकणच्या भूमीवर आंतरिक प्रेम आहे, म्हणूनच तो 'जय कोकणभू' ही (कोकणी भाषेतील) जयजयकार करणारी कविता लिहितो, व्यक्त करतो.

'अशा देवभूमीत' ही कविता उत्कट भावप्रकटनामुळे संस्मरणीय उतरली आहे.

*"युगांचे नवे अर्थ लावीत गेले*
*अशा देवभूमीत जन्मास आलो*
*रसीं रूपलावण्य ज्यांनी दिले ॥...*

'ऐसा महाकवींचा देव' ही, चंद्रभागेच्या तीरी उभ्या असलेल्या पांडुरंगावरची कविता, आतून गहिवरून आलेल्या मनाची, पण प्रस्तुत वास्तवाचे भान असलेल्या दृष्टीची द्योतक आहे. 'ऐसा महाकवींचा देव । वेद उपनिषदांचा राजीव । संतमहंताचा केशव । पाहिला मी ॥' या भावसंपन्न चरणाने आपले मन झपाटून जाते.

'देवराई' मधील कविता रसिकाला तृप्ती देईल अशीच आहे. मग ती झांजरल्या वाटेवर दार असणाऱ्या नाचणची असो की 'नीरव शांत एकांतात' गाणे गाणाऱ्या व सजणाला डोलविणाऱ्या साजणीची असो. निसर्गाचे कितीतरी रुमझुमते संदर्भ या दर्दभरल्या कवितेत भेटतात. व्यक्तिगत जीवनातली नाती निसर्गाशी इथे सहजासहजी जोडली जातात.

सावंतांची शब्दकळाही खास आहे. 'स्वप्नहिरवे', 'चंद्रधून', 'फुलझुळू', 'आभाळवेधी' 'धुवांध' सारखे शब्द त्यांच्या कवितात भेटतात. सावंतांच्या काही कविता दीर्घ आहेत. 'सुना था दिल्ली बहोत दूर है,' 'मी स्कायलॅबसारखा कोसळतो तेव्हा', 'पाच जणींची पाच

गाणी'– त्यातही शब्दकौशल्याच्या आत एक कविमनाला भावलेला निराळा संदर्भ नांदतो आहे. लावणीपासून तो मुक्तछंदापर्यंत सारे छंद स्वच्छंदपणे हाताळणारी ही कविता कटुतेचा किंवा विद्रोहाचा वारा सहसा मिरवीत नाही. जीवींचा जिव्हाळा व्यक्त करणारा, निसर्गाशी आणि लोकजीवनाशी नाते जोडून राहिलेला एक सौंदर्यदृष्टीचा कवी आपल्याला येथे भेटतो.

(देवराई– वसंत सावंत, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ७५. पस्तीस रुपये)

(डॉ.वि.म. कुलकर्णी, 'कमळवेल' ६१/४८, एरंडवणे, पुणे ४)

---

## ऋतू फुलांचा : रमण रणदिवे

### चाकोरीबद्ध, पण सुंदर

राजा दीक्षित

रमण रणदिवे यांच्या 'ऋतू फुलांचा'मधील कविता फुलाप्रमाणे सहज उमललेली, टवटवीत आणि सुंदर आहे. मुक्तछंदातल्या दुर्बोध कवितांच्या जमान्यातली ही सुबोध छंदोबद्ध कविता आहे. अर्थात सुबोधता-दुर्बोधता आणि छंद-मुक्तछंद ही गुणदोषांची लक्षणे नव्हेत, तर तो वैशिष्ट्याचा भाग म्हटला पाहिजे. शांता शेळके यांनी म्हटल्याप्रमाणे ही "कविता उगाच चलाख, चटपटीत, वाचकाला चकवे घालणारी नाही, किंवा ती कसला आवही आणत नाही."

रणदिवे हे प्रामुख्याने गीतकार आहेत. गीतकार म्हणजेच कमी दर्जाचा कवी, असे मानण्याचे कारण नाही. चांगले गीत बहुधा चांगली कविताही असते.

*'डोळ्यांमधून डोळे नेलेस तू जरी*
*होईल बोलबाला याचा कधीतरी',*

किंवा

*'आताच चाललास का निघून साजणा ?*
*पहाट व्हायची गडे अजून साजणा–'*

येथे आशय आणि आविष्कार या दोहोंची जातकुळी गीतलेखनाची आहे. या संदर्भात गीत आणि गझल ढोबळमानाने एकाच पंथातले मानले आहेत.

भावनाप्रधानता, हळुवारपणा, एकाच आशयाची गोड आवर्तने, रचनेची सफाई, गेयता यासारखे गीतरचनेचे विशेष या कवितेत आढळतात. त्यांच्या गीतांचे संगीतमय सादरीकरण रसिकांची दाद मिळवून गेलेले आहे. गजाननराव वाटवे यांनी संगीतबद्ध केलेले आणि अनुराधा मराठे यांनी गायलेले पुढील गीत लक्षवेधक आहे.

— *'कळेना लाजताना हा कसा रागावला चाफा ?*
*पुन्हा रागावतानाही जरा भांबावला चाफा'*–

रणदिवे हे एक चांगले गझलकार आहेत.

*'जन्म काट्यात मी काढला हा तरी*
*मी फुलांना कसा घावरू लागलो ?'*

किंवा

*'जरि कुंचलाच माझा नाकारला जगाने*
*मागेल आवडीने आभाळ रंग माझा'*–

गझलचे विविध रचनाबंध सफाईने आणि निर्दोषपणे ते वापरतात.

कविसंमेलनांच्या लाडक्या अशा विशिष्ट भावविश्वाच्या चाकोरीत ही कविता घोटाळत असल्याचे जाणवते. फुले, गजरा, मकरंद, मेंदी, मोरपिसे, मधुमास, ऋतू, नभ, मेघ, चंद्र, चांदणे, नक्षत्रे, लोचने, अश्रू, क्रूस, राख, स्वप्ने, श्वास, पालखी यांनी साकारलेल्या भावविश्वाच्या परिघात ही कविता वावरत राहते.

*'एक मी साधा कवी साध्यासुध्यांचा*
*फाटलेल्या माणसांच्या भावनांचा',*

किंवा

*'मी जगाचे ओठ झालो, बोलतो सारे खरे*
*दुःखितांचे दुःख माझ्या अक्षरातुन पाझरे'*

यांसारख्या ओळींवर भाष्य करताना शांताबाई म्हणतात की, "त्यांच्या कवितांशी सुसंगत अशी त्यांची काव्यविषयक भूमिका आहे." पण या मताशी सहमत होणे शक्य होत नाही. या कवितेतील करुणा प्रामाणिक वाटते; पण ती दीनदुबळ्यांची, दुःखितांची प्रातिनिधिक उक्ती मात्र वाटत नाही.

*'आज माझ्या अक्षरांना वचन दे रसिका तुझे*
*या स्वरांच्या चांदण्याला गगन दे रसिका तुझे'*–

या ओळी वाचकांना नव्हे, तर सरळसरळ श्रोत्यांना उद्देशून लिहिलेल्या आहेत हे जाणवते. गीत आणि गेयतेच्या आसक्तीपोटी रूढ आशयाच्या काही ढोबळ कविताही लिहिल्या गेल्या आहेत. उदा. प्रभो मज असेच दे वरदान, तुझाच जयजयकार देवा, मानवा क्षणभर तू इथला, कालतरूवर नववर्षाची नवकलिका फुलली, इत्यादी. दुसरीकडे जेव्हा तो ही चाकोरी मोडून वेगळ्या आशयात आणि मुक्तछंदात शिरू पाहतो. "(उकिरड्याच्या लायकीचा) आमचा समाज 'झकास असतो'– अशा ओळी लिहून जातो, तेव्हा साधारणतः तो प्रयोग फसलेला असतो. गीतकारितेच्या आहारी न गेलेली गीते रणदिवे लिहितात तेव्हा त्या–



अनुक्रमणिका







*'डोळ्यांत बाहुल्यांच्या मी सावल्या टिपाव्या*
*मेंदीतल्या नभाने ओल्या खुणा जपाव्या'*

– अशा तरल-सुंदर कविता ठरतात. म्हणून 'ऋतू फुलांचा' आवडतो. मनात रेंगाळतो. सुंदरतेची अशी सुमने सध्या प्रसिद्ध होणाऱ्या भाराभर कवितासंग्रहांमध्ये दुर्मिळ आहेत.

('ऋतू फुलांचा' : रमण रणदिवे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती– एप्रिल १९९०, पृष्ठे ९५, तीस रुपये.)

(राजा दीक्षित, कुलकर्णी बिल्डिंग, ३९ पी अँड टी कॉलनी, शरणपूररस्ता, नाशिक ४२२००५.)

---

# आरसा : आसावरी काकडे

## सर्वांगानं उमलू पाहणाऱ्या मनाची कविता

**मेधा राजहंस**

'आरसा'च्या पहिल्याच पानावरच्या चार ओळींनी रेंगाळायला लावलं–

*'मी तुला माझा,*
*अगदी माझाच असलेला*
*आरसा दिला तरी*
*त्यात तुला तुझंच रूप दिसेल !'*

पुन्हा पुन्हा या ओळी वाचल्या, अर्थाचे तरंग हलकेच स्पर्शून गेले. पुढे वाचण्यासाठी खुणावू लागले. आणि मग वाचतच गेले. शब्दांचे सामर्थ्य आणि मर्यादा न जाणवता सरळसरळ अर्थच मनात उमलायला लागला. आपले मन शब्दांत किती व्यक्त करता येईल ? असा प्रश्न कित्येकांना पडत असेल. मलाही पडतो. 'आरसा' वाचताना मला एक सुंदर अनुभव आला तो, शब्द आणि अर्थ आणि ते सगळं व्यक्त करणारं मन यांच्या एकरूपतेचा. खूप परिचयानंतर जसं 'मैत्री' केव्हा घडली ते आठवू नये असा हा अनुभव. 'मनाचा मनाशी संवाद' हे वाक्य कितीही साहित्यिक वाटलं तरी तेच मला म्हणायचं आहे. 'आरसा' वाचताना मला शब्द दिसले नाहीत, अर्थ दिसला.

एका संवेदनशील व्यक्तीची ही कविता. ही व्यक्ती 'बाई' आहे ही वस्तुस्थिती. पण या 'बाई' असण्यानंच खूप काही घडत असतं. मनातल्या मनात बरंच काही घडत असताना काहीच घडलेलं नाही, घडत नाही हे दाखवायचं असतं. निखळ सुखाची अनुभूती येणार आहे की नाही माहीत नाही, पण दुःखाच्या वेगवेगळ्या चवी चाखून झालेल्या असतात. हे सगळं भोगताना 'नियती'ची शाश्वतता पार्श्वभूमीसारखी असतेच. आणि मग एका सुंदर अलिप्ततेनं स्वतःकडे, स्वतःच्या मनाकडे आणि त्याच वेळी बाहेरच्या जगाकडे बघण्याचं



अनुक्रमणिका






भान येतं. हे भान येण्याच्या वळणावरच्या आसावरी काकडे यांच्या कविता आहेत.

खूप वेळा प्रश्न पडतो की अमुक प्रकारे शब्द मांडले की त्याला 'कविता' म्हटलं जातं. पण असं का? 'कविता म्हटल्यावर जे जाणवायला पाहिजे असतं ते दरवेळी 'कविता' नामक शब्दांच्या उतरंडीमधून' कुठे व्यक्त होतं? अशा शब्दांच्या उतरंडी भारंभार पुस्तकांमधून कोसळत असतात. खूपजण त्यांनाच 'कविता'ही म्हणत असतात. म्हणजे पुन्हा खरी, अस्सल चांगली कविता आणि खोटी, कमअस्सल, वाईट कविता हे प्रकार झालेच. खरीखुरी 'कविता' भेटल्याचा निखळ आनंद आसावरी काकडेंची कविता देते. 'आरसा'तल्या पंचावन्न कवितांमधल्या ७/८ कविता सोडल्या तर इतर सर्व कविता अर्थाच्या नितळतेपर्यंत पोचतात आणि मनाला त्यांच्याशी संवाद करायला लावतात.

कविता लिहिण्याची पण एक वेळ असणार. मनाच्या खेळांकडे दुरून बघता येण्याची ती वेळ. आनंद, दुःख, वेदना, आसक्ती, नीतिनियम, नियती विश्वाच्या पसाऱ्यातलं आपलं बिंदुवत अस्तित्व या सगळ्यांकडे कुतुहलानं बघण्याची वेळ. ही सगळं जाणवण्याइतकं आयुष्य जगून होणं याचा कवितेशी, त्यातल्या शब्दांशी नक्की संबंध असणार. आसावरी काकडेंची कविता अशी योग्य वेळी फुलली आहे.

कविता एवढी का मोहवते याचा जर विचार केला तर असं वाटतं की कविता वाचून मला काय मिळतं, काय कळतं, काय जाणवतं ते महत्त्वाचं. एखाद्या सुंदर पक्ष्याला कोणीतरी क्रूरपणे जखडून ठेवावं, त्याचीच त्याला सवय झालीय असं वाटून आपण दुःखी व्हावं आणि मग संधी साधून त्यानं हळूच आपलं खरं रूप दाखवावं, स्वातंत्र्याची उर्मी, त्याची आस, शरीराच्या पलीकडे पोचण्याची तीव्र इच्छा स्वच्छपणे व्यक्त करावी; आणि हा मनांचा संवाद तिसऱ्याला कळू नये इतक्या हळुवारपणे व्हावा आणि मग एखादं सुंदर स्वप्न जपावं त्याप्रमाणे आपण तो संवाद स्वतःशी जपावा तसं मला 'आरसा' वाचताना वाटलं.

'आरसा' मला सर्वांगानं उमलू पाहणाऱ्या, उमलण्याची उत्कट इच्छा असलेल्या मनाची कविता वाटते. यातलं मन बाईचं आहे. घर– संसार– सजवलेली दालनं, शिष्टाचार, महत्त्वाकांक्षा यांच्या पसाऱ्यात राहूनही त्या पसाऱ्याचा भाग व्हायला नाकारणाऱ्या मनाचं हे चित्र आहे. या मनाला 'पहारे' नकोत असं वाटत नाही. पण पहाऱ्यांवरचा पहारा माझाच असू दे असं वाटतं. बेगडी सुखापेक्षा आपलं हळवं दुःख जास्त निरागस म्हणून सुंदर वाटतं. 'स्वतंत्र' मनात 'कुणाच्या' आठवणी येतात हे आवडतं पण या आठवणी आपल्यालाच संपवतील म्हणून भीतीही वाटते. मनाने पुढे टाकलेलं पाऊल शरीराने टाकू नये म्हणून आटापिटा दिसतो. आणि हे सगळं मनातल्या मनातच चालू आहे याबद्दल एक समाधानी निःश्वासही दिसतो.

कुणी बेतून दिलेलं आयुष्य ही कविता नाकारते, निर्भर्त्सना करते पण पुन्हा अडथळ्याची शर्यत चालायचीच सवय झाल्याचं मान्य करते. परीसस्पर्श झाल्यावरही सोनं व्हायचं विसरून जाते.



अनुक्रमणिका







यातल्या कवितेत अस्वस्थ मनाचं हलणारं पण स्पष्ट प्रतिबिंब आहे. दुःखाच्या वणव्यात राख होता येतं, अश्रूंच्या धारेत भिजून शांत होता येतं ही समज आहे, पण कवितेला तर वरदान मिळतं अस्वस्थतेच्या धगीचं. धड ना राख होऊ देणारं आणि धड ना शांत राहू देणारं.

कवितेबरोबर अस्वस्थ मनाचं हे प्रतिबिंब अधिक अधिक कळायला लागतं. आपल्या अनुभवांशी तोलून बघायला लावतं. आणि आपलंच मन आपला कवीच्या शब्दांत वाचतो आहोत असा वेगळाच, शांत करणारा अनुभव येतो.

'आरसा'तल्या कविता मला आजच्या कोणत्याही संवदेनशील बाईच्या मनाची चित्रं वाटतात. आजची बाई अशा एका नाजूक टप्प्यावर आहे जिथे तिचं तिलाच भविष्य ठरवावं लागणार आहे. स्वतंत्र मनाची धाव खूप पुढे पोचायला बघते आहे. घर-संसार– शिष्टाचार, रूढी-नीतिनियम या सगळ्यांशी नेमका 'आपला' संबंध काय, असं तीव्रतेनं वाटायला लागलंय. आपण जसे आहोत तसे खरेखुरे व्यक्त होण्याची, तोंडावर घेतलेला बुरखा आपला आपणच फाडण्याची गरज वाटायला लागलीय. या खऱ्याखुऱ्या अस्तित्वाची झळाळी स्वतःला आणि परिघातल्या इतरांना झेपेल की नाही या शंकेनं घाबरून परत एकदा निमूटपणे बुरख्यातच जाणाऱ्या आजच्या पिढीच्या बाईचं चित्र आसावरीची कविता फार सहजपणे चितारते. आणि म्हणूनच ती खरी 'कविता' म्हणून समोर येते.

शब्द इतक्या कमी संख्येतून अर्थाचा वेध घेतात हा सुखद अनुभव शब्दांची गरज मान्य करून टाकतो आणि शब्दांतून व्यक्त 'करणं' अगदीच कुचकामी नाही, तर शब्दांतून व्यक्त करायलाच हवं हे पुन्हा एकदा पटवून देतो.

यातल्या कितीतरी कविता उद्धृत करणाचा मोह मी टाळला आहे. कारण हा 'आरसा' ज्याचा त्यानं वाचावा आणि आसावरी म्हणते त्याप्रमाणे आपलं प्रतिबिंब बघावं– जसं दिसेल तसं.

(आरसा– आसावरी काकडे, सेतू प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६४, पंचवीस रुपये.)

(मेधा राजहंस, उन्मेष प्रकाशन २६ पर्वती, पुणे ९.)

---

## साभार-स्वीकार

* **आठवणी माझ्या कारावासाच्या**– पा. पु. शिरोडकर, गोमंतक मराठी अकादमी, पणजी, पृष्ठे– १७४, चाळीस रुपये.
* **सिंधुलहरी**– सिंधु गाडगीळ, श्रीविद्या प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे– १३३, पंचेचाळीस रुपये.
* **पं. जवाहरलाल नेहरू**– अरविंद ताटके, वरदा बुक्स, पुणे-१६, पृष्ठ– ४८८, दीडशे रुपये.
* **पीटसबर्ग डायरी**– ना. ग. गोरे, ठाकूर प्रकाशन, पुणे-५२, पृष्ठे– १६७, पन्नास रुपये.

# काफला : सं. सुरेश भट, अविनाश कांबळे
## वाटाड्या नसलेला 'काफला'

**प्रकाश धुळे**

'काफला' या मराठी गझलांच्या प्रातिनिधिक संग्रहात ७३ गझलकारांच्या १२५ गझला समाविष्ट केल्या असून त्याचे संपादन सुरेश भट आणि प्रा. अविनाश कांबळे यांनी केले आहे. भटांचे वाक्य प्रमाण मानून लेखन करणाऱ्या गझलकारांच्या पिढीचाच हा काफला असल्याने त्यात वैविध्य असे कमीच आहे. परंतु मराठी साहित्यात नियतकालिके, अनियतकालिके आणि दिवाळी अंक अशा माध्यमातून विखुरलेली मराठी गझल एकत्र आणण्याचे जिकिरीचे काम केल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करायला हवेच.

'काफला' मधील गझला वाचल्या की आजच्या मराठी गझलांच्या मर्यादा सहज लक्षात येतात. यातील सोयरे, पाटी, पाय, दीप, आज, चुपराही, कशी सांगू यांसारख्या गझला भरतीच्या वाटतात. सुरेश भटांच्या वाटेनंच आजची मराठी गझल जात आहे याचा हा संग्रह म्हणजे भक्कम पुरावा आहे. केवळ कल्पना, आशय, शब्दकळा यापुरतीच ही नक्कल मर्यादित राहत नाही तर काही मिसरे उगीचच कंसात टाकायची प्रथाही यात जागोजाग दिसते. यामागील गझलकारांची भूमिका एकदा स्पष्ट व्हावयास हवी असे वाटते. पृष्ठ क्र. ८९ वरील 'सांग गोदेच्या किनाऱ्या' या गझलेत 'मी' तर पृष्ठ क्र. ९६ व ९७ वरील 'श्वास' आणि 'तक्रार' या गझलेत 'ती' सारखी डोकावताना दिसते. शुद्ध गझलेत असे होता कामा नये. पृष्ठ ५४ वरील 'क्षेमकुशल'चे पहिले दोन शेर 'होकारात्मक' अंगानं जातात तर तिसऱ्या शेरापासून ती नकारात्मक होत जाते.

काफल्यातील काही गझलांत पुनरुक्तीचा तर काही गझलांतून दुर्बोधतेचा दोषही आढळतो. पृष्ठ. ३७ वरील 'वादळ' या गझलमध्ये 'कळ्याफुलांच्या दंवात ओल्या भिजले वादळ' असा एक मिसरा येतो.

आता या ओळीत 'ओल्या' हे विशेषण दवाचं आहे की भिजल्या वादळाचं? दंव ओला असणार तसेच भिजले वादळही ओले असणारच. ही पुनरुक्ती नव्हे का? हीच गत पृष्ठ ६७ वरील 'मी मलाच माझ्या हाती नुकताच गवसलो आता' यात आढळते. या वाक्यात 'मी मलाच गवसलो' म्हटल्यावर 'माझ्या हाती' म्हणण्याची किंवा 'नुकताच' म्हटल्यावर 'आता' म्हणण्याची काही गरज उरते का? शेर हा अल्पाक्षरी व गोटीबंद काव्यप्रकार असल्याने त्यात अशा पुनरुक्तीस जागा नसते याकडे संपादकांनी काणाडोळा का करावा?

पृष्ठ क्र. ९९ वरील एक शेर असा आहे :



अनुक्रमणिका








*मध्यान्ह पेलली मी जेव्हा मुक्या दंवांनी*
*होती भरीत माझ्या ती रंग आसवांनी ।*

आता या शेरात 'मध्यान्ह मुक्या दंवांनी पेलायची' 'म्हणजे काय हे कोण सांगणार?'

*केस हे पिकले तरीही*
*ऊन का गळणार नाही? (पृ.८३)*

या शेराचा अर्थ तरी कुठे स्पष्ट होतो? तो व्हावयास नको का?

पृष्ठ क्र.३८ वरील इलाही जमादारांचा एक शेर असाच पाहण्यासारखा आहे.

*मी माळले तुलाही हृदयात खोल माझ्या*
*बघ लेखणीस माझ्या येतो सुवास आता ।*

या शेरात तिच्या सामीप्यानं शायरचं जीवन, लेखन सुगंधी होऊन जातं असं म्हणायचं असावं. पण त्यासाठी त्याची 'हृदयात खोल माळले' ही शब्दयोजना योग्य वाटत नाही. एखादी गोष्ट खोल गाडता येईल, पण खोल माळता कशी येणार? अर्थात हे माझं मत झालं, हेच मत जर कविवर्य भटांनी व्यक्त केलं असतं तर ते सहज स्वीकारलं गेलं असतं. म्हणून ही अशी लहानमोठी 'शल्यकर्मे' भटांनी आपल्या संपादकीयातच करावयास हवी होती.

प्रस्तुत गझलसंग्रहात 'सब घोडे बारा टक्के' या न्यायाने कवींचा क्रम लावताना आडनावातील आद्याक्षरांचा आधार घ्यायची गरज नव्हती. त्याऐवजी भटांनी या ७३ गझलकारांपैकी त्यांना उत्कृष्ट वाटणारे १०/१५ गझलकार निवडून त्यांच्या गझला आपल्या शिफारशींसह अग्रक्रमाने द्यायला हव्या होत्या. म्हणजे उद्याची गझल आम्हाला कुणाकडून अपेक्षित आहे याची सूचना वाचकांना मिळाली असती.

एकंदरीतच काफल्याच्या संपादनात भटांनी आपली 'जान' ओतलेली नाही हे स्पष्ट आहे. 'काफला' मराठी गझलच्या प्रांतात मैलाचा दगड ठरण्याची शक्यता असल्याने त्याचे संपादन अधिक चोखंदळपणे व्हावयास हवे होते. त्या अनुषंगाने भटांनी आजच्या मराठी गझलेची परखड समीक्षा करून तिच्या विकासाचा आढावा घेतला असता तर अधिक बरे झाले असते. अनायासेच शे-सव्वाशे गझला हाताशी असल्यामुळे त्यांनी कुणाची मुलाहिजा न ठेवता गझलातील वेगळेपण, त्यातील उणिवा, सौंदर्यस्थळं, शक्तिस्थाने, गझलकाराची कारागिरी यावर टिप्पणी करून अल्पाक्षरी ओळी कशा यायला हव्यात, एकच काफिया वेगवेगळ्या प्रकारे कसा चालवावा, 'इस्लाह' मुळे शेर कसा 'कामयाब' किंवा 'ताकदवर' बनविता येऊ शकतो हे सांगावयास हवे होते. त्याचा वाचकांइतकाच गझलकारांनाही उपयोग झाला असता. आजची मराठी गझल सुरेश भटांपासून सुरू होऊन सुरेश भटांपाशीच संपते, कारण सुरेश भटांच्या मागेही एक (उर्दू) गझल आहे हे जोवर आजचे गझलकार जाणून घेणार नाहीत तोवर त्यांची गझल भटांच्या पुढे जाऊच शकणार नाही, हे स्पष्ट आहे.

सुरेश भटांनी गझल उर्दूतून मराठीत आणली, स्थिर केली. यासाठी त्यांना मराठी

गझलचा 'प्रेषित' मानले तरी त्यांचीही कुठेतरी गल्लत/गफलत होऊ शकते. त्यांनी गझलबरोबर आणखी जे काही मराठीत आणावयास हवे होते, किंवा जे त्यांच्या कळत-नकळत मागे राहून गेले, ते शक्य असल्यास आता आणता येणार नाही का? याचाही विचार कुठेतरी व्हावयास हवा. अर्थात त्यासाठी आजच्या गझलकारांनी सुरेश भटांच्या गझलला वळसा घालून सरळ उर्दू गझलला जाऊन भिडण्याचे धैर्य दाखवायला हवे.

'काफला' वाचताना आणखी एक गोष्ट लक्षात येते ती म्हणजे यातील गझला बऱ्याच जुन्या वाटतात. याच गझलकारांच्या अलीकडच्या गझला कितीतरी अधिक सफाईदार वाटतात. छपाईचा प्रकल्प ७/८ वर्षे जर रखडला असेल तर संपादकांनी छपाई सुरू करण्याआधी नव्या गझला मागवून घ्यावयास हव्या होत्या. प्रत्येक कवीची एक जुनी व एक नवी गझल छापली असती तर ते अधिक औचित्यपूर्ण ठरले असते. अशा गझलांतून कवीचा वैयक्तिक विकास तर दिसलाच असता, शिवाय मराठी गझलच्या प्रवासाचा एक आलेखही आयताच हाती आला असता. आहे या स्थितीत 'काफला' यांपैकी काहीच देऊ शकत नाही.

पुस्तकाच्या अखेरीस गझलकारांचा संक्षिप्त परिचय आणि पत्ता देण्यात आला आहे. एकमेकांशी संपर्क ठेवू पाहणाऱ्या गझलप्रेमींसाठी हे उपयुक्त ठरावे.

खरं तर 'काफला' आहे यापेक्षा कितीतरी अधिक वेधक व अभ्यासपूर्ण करता आला असता. नव्हे, तो जाणीवपूर्वक तसा करावयास हवा होता. मराठी गझल या वळणावर रसिकांसमोर ठेवताना इतकं अलिप्त राहावयास नको होतं. आपले वैयक्तिक हट्ट, दुराग्रह दूर ठेवून मराठी गझल अधिक समृद्ध करण्यासाठी काय करता येईल, कसं करता येईल हे अधिक खुल्या मनानं आपल्या नव्या गझलकारांना सांगावयास हवं होतं. मग असं करताना त्यांना आपल्या काही वाटा बदलून घ्याव्या लागल्या असत्या तरीही मागं हटण्याचं कारण नव्हतं. पण स्थळ, काळ योग्य असूनही हे केलं गेलं नाही असं खेदानं म्हणावं लागतं.

काफल्याकडून होणाऱ्या या अपेक्षाभंगाची सुरुवात नावापासूनच होते. 'काफला' हा मुळातच अमराठी शब्द. मराठीत तो वापरू नये असं नाही. प्रत्येक काफल्याला एक वाटाड्या असावा लागतो. ज्याला उर्दूत 'अहले-कारवाँ' म्हणतात, तोच इथं नाही. संपादकांनी आपली अहले-कारवाँची भूमिका योग्य रीतीनं पार पाडली असती तर हा काफला निश्चितच आपल्या मुक्कामावर पोचला असता. आता जर तो आपल्या अपेक्षित स्थळी पोचला नाही, वाटेतच कुठंतरी हरवला तर त्याची जबाबदारी कोणावर? ती संपादकांवरच असणार.

(काफला. संपादक—सुरेश भट, अविनाश कांबळे, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०.
पृष्ठे १६०. तीस रुपये)

(प्रकाश घुले ८४/१८ टिळक नगर, पाचवा रस्ता, गोरेगाव (पश्चिम), मुंबई ६२.)



अनुक्रमणिका






# अवथर : रेणू पाचपोर
## शब्दांच्या देशात पायऱ्या उतरताना कधी घाई करू नये

शंकर सारडा

अवथर हा रेणू पाचपोर यांचा कवितासंग्रह. यातील ४५ कवितांपैकी आठ कवितांवर कविता हेच शीर्षक आहे. त्या जोडीला तीन कविता, चार कविता, मनाच्या कविता, सईसाठी तीन कविता अशीही शीर्षके आहेत. पापण्या आणि पापण्यात ही देखील दोन कवितांची शीर्षके आहेत. पाऊस, हा पाऊस, पाऊस– काही ओळी अशाही तीन कविता आहेत. ओळी, ओळीओळीत आणि रांगोळीच्या ओळी अशाही तीन कविता आहेत. अंग, जीव, काया, पापण्या/ किनारे, गंगा, ठिबक, पूर/ प्रदेश, शहर/ चांद, चांदणे/ प्रिय, डार्लिंग अशीही शीर्षके कवितांना दिलेली आहेत. पापण्या आणि पापण्यात या शीर्षकांद्वारे नेमके काय वेगळेपण कवीला अभिप्रेत आहे; पाऊस, हा पाऊस यानेही काय फरक सुचवायचा आहे असा प्रश्न केला तर त्याचे समर्पक उत्तरे मिळणे अवघड दिसते.

किंबहुना काही ठराविक अनुभव, कल्पना व प्रतिमा पुनः पुन्हा या कवितांमधून आवर्तने घेत राहतात. सगळ्या कविता मिळून एकच कविता होते असेही म्हणता येईल.

कधीतरी भेटलेली, जीवाला ओढ लावून गेलेली कोणीतरी सखी; आणि आता तिच्या उरलेल्या आठवणी; या दोहोंना छेदून जाणारा कवितांचा पसारा. हे सूत्र याच सर्व कवितांमधून गोवलेले दिसते.

झिरझिरत्या पावसात भेटलेल्या सखीच्या पापण्यांचा थरथरणारा प्रदेश; गंधलाटांच्या दिशाहीन वाटा; गहिवरलेली काया, तिला न्हाताना बघताना डोळ्यांत विसावलेली आणि पापण्यांत तुडुंब भरून राहिलेली कविता; चंद्राची ठिबक भावना, मेंदीओले पाय, नवथर श्वास, धूसर डोळ्यांतले भाव, आणि हातातून निसटून जाणारे आठवणींचे क्षण. . . एकान्तात हृदयी घुमणारे गाणे; देह आणि मन यांचा खेळ चालतो तो आभाळ आणि पावसासारखा; देहभर अस्वस्थ आठवणी. असा सगळा गुंताच गुंता.

पापण्यावंर कवीचे सारे लक्ष एकवटलेले दिसते; पापण्यांचा प्रदेश थरारतो, पापण्यांत तुडुंब पाणी साठून निजलेले दिसते; पापण्यांत प्राण ओले होतात; पापण्यांत नांदणारे कल्पनेचे रंग दिसतात; पापण्यांवर शब्द पाकळ्यांसारखे रेंगाळतात; पापण्यांतून कविता अवथर उतरलेली दिसते.

प्रेयसीशी जवळीक सांधायला, प्रेयसीचा दुरावा सहन करायला कविताच कामी येते. कवितेचा पदर ती अंगभर लपेटून घेते; कवितेशिवाय काया झाकायला दुसरे काही मिळत नाही, तिच्या पाऊलखुणांत वेड्या कविता विसावतात; कविता वाचता वाचता ती रडू लागते,



अनुक्रमणिका





कवितेची साय साचत जाते; तरंगणाऱ्या फुलांच्या कंठाशीही कविता रुतून बसते, कविता डोळ्यांत विसावते; कविता लाजते, कवितेच्या पाखरांचे पंख धरू नयेत असे वाटते; उमलत्या सकाळीही कविता मिटलेली भेटते. कवितेच्या रेघारेघांवर तिच्या मनातली गुंतवण तिच्या नकळत पापण्यांतून उतरते; डोळे भरून कथा वाचल्या तर शब्दांच्या कविता होतात. बेभान चांदण्यात देहभर अस्वस्थ आठवणी थैमान घालतात तेव्हा कवितेच्या चार ओळींची ओढ दाटून येते. पण तरीही कविता वाचताना तुझ्या लक्षात मी नसेनच अशा दाट शंका त्याच्या मनी चुकचुकतेच.

पावसाशी या युगुलाचे विशेष सख्य दिसते. झिरझिरत्या पावसातच तिची गाठ पडते. घनघोर पावसात तिच्या स्वप्नांची शहरं उभी राहतात; तुषारांच्या पंखांतून कोमल गाणे फुलते. ती आली की पाऊस येतो. पावसात भिजलेली तिची नवथर, अवथर काया बघताना काया गहिंवरते; वस्त्रे चिंब झालेली असली तरी पाऊस भुकेलाच राहतो; ढग मनापासून बरसून गेल्यावर डोळे पाकळ्यांसारखे मोकळे होतात; झिरझिरत्या पावसातून तिचा चेहरा उमलतो; दुःख खळखळ वाहून जातं.

निरोपाच्या वेळी खूप सांगायचं असतं; पण जमत नाही. पापण्यांत तुडुंब गुंतलेली कविता बाहेर पडत नाही. फांदी सोडता येत नाही; मुक्त उडता येत नाही. प्रियेचे आता पत्र येत नाही. त्याची अपेक्षा एवढीच :

*प्रिय लिहून सोडून दे*
*समजून घेईन काय ते. (प्रिय)*

'ते शहर' ह्या कवितेत विद्यापीठातले गुलमोहर, मोर्चे, मित्रमैत्रिणींचे घोळके, सिटी बसमधली चिल्लरवरूनची भांडणे, यांची स्मृती आळवतानाच, नवे नवे अनोळखी चेहरे वाढत गेल्याने मनातले शहरच बदलून गेल्याचे लक्षात येते. ते शहर आता माझे नाही असे वाटते. एके काळी त्या शहरावर निपटनिरंजनाच्या पायरीवर बसून लिहिलेल्या कविता आता दूर दूर गेल्यासारख्या वाटतात. 'चांदणे' कवितेत चांदण्यातून दौड करणाऱ्या बेभान दंगलग्रस्त ट्रेनच्या प्रवासात शब्दांचे दुःखावेग छेडणाऱ्या आठवणी येतात; आणि 'मी येणारच नाही ' हे तिचे शब्द आठवून 'असे कुठे होत असते का वेडे. . . आपल्या लक्षात आले नाही तरी रात्र फुलणारच ' असा दिलासा तो स्वतःलाच देऊ पाहतो.

अधूनमधून काही चांगल्या ओळी भेटतातः हळुवार. 'तुला कळत कसे नाही ? मन किती कोमल असते !'

पहिला संग्रह ह्या दृष्टीने कवीचे कौतुक करायला हरकत नाही. परंतु एकच मर्यादित अनुभव असा पिंजून पिंजून किती काढावा याचे भान हवेच. 'शब्दांच्या देशात पायऱ्या उतरताना कधी घाई करू नये, कवितेच्या पाखराचे पंख धरू नये' असा कवीने इशारा दिला आहे. (पृष्ठ ६). इतरांपेक्षा कवीनेच त्याकडे लक्ष देण्याची गरज आहे. झाडावरच्या जखमी पक्ष्यानं चिमुकल्या नख्यांनी फांदी घट्ट धरून उलटं लोंबकळत राहावं, फांदी सोडता येत



अनुक्रमणिका






नाही आणि उडताही येत नाही अशा अवस्थेत लटकत राहावं, (पृष्ठ ५) या क्रियेला काळाची काही मर्यादा असते. अनिश्चित काळापर्यंत असं लटकत राहून चालत नाही. झाडाच्या फांदीचा आधार सोडून स्वतःचं बळ एकवटून कधीतरी उड्डाणासाठी झेप घ्यावीच लागते. आठवणींच्या राशी हृदयाच्या दाराशी उभ्या करून किंवा केवळ ढगांची बरसात बघून झेप घेण्याचं बळ येतंच असं नाही. नवथर, अवथर, थरथर क्षणभर कौतुकासाठी ठीक असेल कदाचित; पण ती आणखी दीर्घकाळ लांबली तर चिंतेचीच बाब ठरेल !

(अवथर : रेणू पाचपोर, स्टेट बँक, परभणी. प्रकाशक— साहित्यसेवा प्रकाशन, औरंगपुरा, औरंगाबाद. पृष्ठे ५६. पंचवीस रुपये. मार्च १९९०)

(शंकर सारडा, प्राकृती प्रिंटर्स, ८५७ शनिवार पेठ, सातारा २)

---

## अंतरीचे दिवे : शोभना चांदूरकर

### वाट शोधता शोधता शिणले मनपाखरांचे थवे

**प्रा. डॉ. तारा सावंगीकर**

---

अंतरीचे दिवे हा चांदूरकरांच्या ४० कवितांचा संग्रह. गंभीर प्रकृती, चित्रकलेची आवड, वाडा संस्कृती, सनातनी वातावरण, व्रत-वैकल्ये, मंदिरातील उत्सव, ग्रंथाचे वाचन यातून संस्कारित झालेल्या भावार्त व संयमशील मनाचे हे बोल. पहिली 'अत्तर' व शेवटची 'अंतरीचे दिवे' या दोन कविता सलग वाचल्यानंतर मनातले भावसुंगधी दिवे आणि देवघरातले अत्तर दिवे यांतील जवळीक समीपतेतून सरूपता येते हे दाखवते.

*"स्वतःलाच माखून घेतलेल्या*
*चंदनाच्या अमोल अत्तराचे*
*त्या अनामिक दरवळाला—*
*होत असते वेळोवेळी शिंपण*
*नि मिळत असते त्याला संजीवन"*

जीवनप्रवासात वेगवेगळी वळणे येतात. काही वळणांवर थांबावे— थबकावे लागते.

*"विझू विझू आले माझ्या अंतरीचे दिवे*
*वाट शोधता शोधता शिणले मनपाखरांचे थवे."*

निसर्गाची कोवळी व रौद्र अशी दोन्ही रूपे या कवितेत भेटतात. धारानृत्य, कॅलिडोस्कोप, नजराणा इ. कवितांमध्ये पावसाळा नवरंगी करामत दाखवतो. विरहिणीची कथा सांगतो. वसंत कोवळ्या अंकुराचे विभ्रम दाखवतो.

सोनसळी उन्हाचे अंगण, खळाळत्या निर्झराचे स्फटिकशुभ्र हसू, अग्निगोलाचा

भरजरी झळाळता शेला, हिमशुभ्र चांदणे पिऊन धुंदावलेल्या नागिणीची नागमोडी चाल, नक्षत्रफुलांची नक्षी, केशर पाण्यातला सोनवर्खी साज, तांडवनृत्याला साथ देणारे पाचोळ्याचे पायरव संगीत, आकाशपाळण्यातले निरागस झंझावाती यौवन— असा सगळा कल्पनांचा भव्य खेळ या कवितेला वहारदार बनवतो.

लक्ष्मणरेषा, सागरशिल्प, तुझ्या अस्तित्वासाठी, अर्घ्य, मूक आक्रोश वगैरे कविता स्त्रीत्व, स्त्रीचा आत्मसन्मान, मातृत्व, पत्नीपद, स्त्रीशक्ती यांचा आविष्कार करतात. लक्ष्मणरेषेत स्त्रीवरील अत्याचारांचे चित्रण येते. कन्याकुमारीची व्रतस्थ वृत्ती, मोकळा श्वास, बोलके शब्द हरवून बसणारी स्त्रीची प्रतिमा, युगानुयुगे निमूटपणे दुःख सहन करणाऱ्या स्त्रीच्या स्वभावाचे एक विशिष्ट परिमाण प्रकट करते. सहप्रवासी म्हणून पतीला आपले काळीजकमळ अर्पण करणारी भारतीय स्त्री येथे प्रभावशाली आहेच.

बिल्वपत्र, अभंग या प्रासंगिक कविता. पंढरीच्या विठोबाच्या दर्शनाने मनात येणारे तरंग प्रकट करतात. कधी अध्यात्माची ओढ तर कधी सामाजिक जाणिवेचे आत्ममग्न उद्गार यांचा येथे आढळ होतो.

काव्यलेखनाची हौस आणि सांकेतिक प्रतिमा-भावनांना थोडाफार वेगळा साज चढवण्याची क्षमता यामुळे हा संग्रह अपेक्षा वाढवतो : वाट शोधता शोधता शिणलेल्या मनपाखरांच्या थव्यांना नवे काय गवसेल यावद्दलचे कुतुहल निर्माण करतो.

(अंतरीचे दिवे— शोभना चांदूरकर, ज्ञानेश प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ६४. तीस रुपये.)

(प्रा. डॉ. तारा सावंगीकर, ३८ क तात्या टोपे नगर, नागपूर १५.)

---

## सांजक्षितिज : व्यंकटेश वळसंगकर

### अल्पाक्षरी— लघुचित्रसदृश हौशी कविता

**शंकर सारडा**

---

गुलबर्ग्याचे हौशी कवी व्यंकटेश वळसंगकर यांच्या चाळीस छोटेखानी रचनांचा संग्रह 'सांजक्षितिज' या नावाने प्रसिद्ध झाला आहे. प्रा. कृ. ब. निकुंब यांनी प्रस्तावनेत मिनिएचर पेंटिंगसारख्या या कविता आहेत असे म्हटले आहे. अल्पाक्षरी; ठळक रेषांनी मोजकाच तपशील देणारी ही शब्दचित्रे आहेत.

आपल्या प्रेयसीशी एकरूपत्व पावावे; तिला वेगळे अस्तित्व उरू नये अशी भावना वळसंगकरांच्या अनेक कवितांमधून पुनःपुन्हा प्रकट होते. या एकरूपतेच्या वेगवेगळ्या शक्यता आणि वेगवेगळे संदर्भ दाखवण्यात त्यांना रस वाटतो. पाऊस तुझा म्हण; पाऊस तुला भिजवून लाजरा भाव जागवतो; पाऊस दोघांचा म्हण. दोघांत श्रावणाची शिंपण करून

तो जाईल असा आशावाद कवी बाळगतो. प्रत्येकाची स्वतःच्या वेगळ्या व्यक्तित्वाची जाणीव पुसून जावी आणि एकात्मता व्हावी यासाठी पावसाचे वा निसर्गाचे माध्यम कसे उपयुक्त आहे हे कवीला कळून चुकलेले आहे. ती चांदणे हातावर घेते तेव्हा त्याला वाटते की 'तूच चांदणे असतेस माझ्यासाठी.' या चांदण्यावरून दोघांमध्ये जो कल्पनाविलास चालतो तोही मजेशीर आहे. चांदणं तुलाही नको, मलाही नको, विखरून दिलं तर तू काय म्हणशील असा प्रश्न कवी मोठ्या चलाखीने विचारतो. माझी तरुवेल, तुझी प्रीतवेल, म्हणजे चांदणं बरसवणारी चैत्रपुनवच; प्रीतीतच दोघांनी रमून जावे आणि दोघांनी मिळून हसावे; असे त्याला वाटते. तुझा सूर माझ्यापासून दूर गेला तर त्याला वाटणारा परकेपणा असह्य होईल. तिच्यासाठी कविता लिहिल्या पण तिला त्या कळल्या नाहीत; विषण्ण मनःस्थितीत तिची आठवण ही सुखाची ऐट असते; माझी स्वप्नं ही तुझीच. माझ्या शब्दांचा अर्थ तुला लावता येवो न येवो; माझ्या शब्दांत तूच साठलेली असल्याने, तुला वेगळे काढताच येत नाही. 'तुझा माझा बंध तुटत नाही; म्हटलं तर तुला स्वतंत्र संपूर्ण व्यक्तिमत्त्व आहे. . . म्हटलं तर नाही इतकी तुझी माझी एकात्मता आहे. अंतरात अंतर ठेवूच नकोस; असा कवीचा भाव आहे.

कधी कधी मात्र दुराव्याची जाणीव होते आणि तू माझे चित्र रेखाटूच नकोस, तुझीच कविता वाचायचीय असे म्हणू नकोस, अंगणात येऊन चांदण्याला बोट लावू नको; अशाही काहीशा कृतक रोषाने कवी एकामागून एक मनाईचे फतवे काढून प्रेयसीवरची आपली हुकमत पक्की करतो. परंतु त्या रोषामधले लटकेपण तसे गुदगुल्या करणारेच वाटते. एकूण वळसंगकर आपल्या प्रेयसीशी कमालीचे एकनिष्ठ असल्याचे आणि एकरूप झाल्याचे दृश्य या कवितेतून दिसते.

वळसंगकरांच्या काही कवितांमध्ये जीवनाबद्दलचा शोध अजून पुरता न लागल्याबद्दलचा त्रागा वा तक्रारीचा सूर जाणवतो. कुठे जायचे ते कळत नाही; प्रकाशाच्या वाटेने निघालो तरी अंधारात कोलमडून पडलो. जीवनाचा अर्थ, जीवनाची वाट सापडली नाही. वाटेत काटेच दिसले; वाळवंटच तुडवावे लागले. काळाच्या काळ्या फत्तराशी टकरा देऊन घामाच्या धारा गाळाव्या लागल्या. खूप सोसल्यामुळे पापणीतले पाणीही खूप वाहून गेले, दुःखाला शब्दरूप देण्याचा प्रयत्न केला तर शब्दांनीही फसवणूक केली. शब्द दुःख व्यक्त करायला असमर्थच ठरले. माणसांमध्ये आधार शोधावा तर ती एकतर स्वतःची दर्दभरी कहाणी सांगण्यास उत्सुक दिसली किंवा माझं दुःख पाहून खिदळत राहिली. माणसांच्या जगात स्वतःच्या अस्तित्वाला आधार शोधणे एकूण व्यर्थच. आपलं दुःख इतर कोणाला कळणारच नाही; तेव्हा आपण तृप्तीचे नाटक वा न केलेल्या गोष्टींचे कौतुक करत राह्यचे यातच शहाणपण आहे. आपणच आपल्या विश्वासाचे बळी ठरतो. आपली जळलेली स्वप्नं बघत एकेक घरटं विस्कटायचं असतं. आनंदाचे क्षण नसतातच. गतस्मृतींनाही अर्थ नसतो. परंतु हा उद्वेग हा कवीचा आंतरिक वा अस्सल स्थायिभाव व स्वभाव मात्र नाही.

कारण नैराश्याचे हे गाणे आळवता आळवताच 'दिवा लावावा, अंधार लोटावा, मन रिझवावे, डोळ्यांतले आकाश हळूच फुलवावे' हा मंत्र लगेच येतो.

वळसंगकर आपल्या प्रीतीचे साफल्य प्रेयसीशी एकरूप होण्यात आणि जीवनाचे साफल्य भव्योदात्त गगनचुंबी सुखाने अंतर्बाह्य तृप्त होण्यात आहे असे मानतात. क्वचित् नैराश्याचे वा दुराव्याचे झटके आले तरी त्यांचा जन्मजात आनंदी स्वभाव त्यांच्या नैराश्यावर मात करतो आणि अंतःकरणातले तृप्तीचे, साफल्याचे अंगचेच असणारे झरे पुन्हा खळाळून वाहू लागतात. सांजक्षितिजापेक्षा प्रसन्न उषःकालच त्यांचा खरा दोस्त ठरतो. चांदणे, पाऊस, ढग, पान-फूल, आभाळ-सूर्य-चंद्र या परिचित प्रतीक-प्रतिमांमध्येच ते वेगवेगळे भावार्थ शोधतात आणि आपल्या अंतरीचे गूज प्रकट करतात. अधिक खोल दुःख, अधिक आर्त प्रेम, काव्याला आशयगर्भ उत्कट बनवते. वळसंगकरांचे लेखन नवी झेप घेईल अशी ग्वाही हा संग्रह देतो.

(सांजक्षितिज : व्यंकटेश वळसंगकर, रत्नदीप, १०/२७४ खालची आळी, ब्रह्मपूर, गुलबर्गा ५८५१०३ (कर्नाटक) पृष्ठे ४०. पंधरा रुपये)

---

## भ्रमणदिंडी : मो. ज्ञा. शहाणे

### रविकिरणमंडळाच्या प्रभावक्षेत्राचे दर्शन

शंकर सारडा

मोहनराव शहाणे (वय ८६) हे सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटीचे सदस्य, हितवाद या इंग्रजी मुखपत्राचे संपादक, म. सा. पत्रिकेचे संपादक, भारत सरकारचे जनता संपर्काधिकारी, पुणे विद्यापीठाच्या वृत्तविद्या विभागाचे पहिले संचालक म्हणून परिचित आहेत. रविकिरणमंडळाच्या काव्याच्या बहराच्या काळात मोहनरावही काव्यरचना करीत. माधव ज्युलियनांची बहीण यमू ही मोहनरावांची वहिनी, तर मोहनरावांची बहीण शांता ही राजकवी यशवंतांची वहिनी.

१९२७ ते १९८१ या कालावधीत लिहिलेल्या ४८ कवितांचा संग्रह भ्रमणदिंडी हा नुकताच प्रसिद्ध झाला आहे.

मोहनरावांची वृत्ती रोमँटिसिझमला जवळची. स्त्रीपूजन, स्त्रीविषयक आकर्षण, निसर्ग चित्रण, दिव्य सौंदर्याची ओढ वगैरे रोमँटिसिझमचे विशेष त्यांच्या काव्य विषयांना खाद्य पुरवतात. या साठ वर्षांच्या काळात काव्यरचनातंत्रात झालेले बदलही लक्षणीय ठरतात. १९२७ मधील 'काढा भांग जरा सुरेख' हे सुनीत घ्या. त्यातील या ओळी पहा—










*काढा भांग जरा सुरेख, टिकली लावा जरा कोरून*
*अंबाड्यावरती सुशोभ गजरा, माळून घ्या हौशिने*
*नेसा पातळ स्वच्छ सुंदर, खुले बोला जरा हासुन*
*घ्या विद्याव्यसनी रती, अभिरुची दावा विदग्धोचिता...*
*गाणे वाजविणे कलाबतु शिका, व्हा शारदा सेविका...*
*घ्या स्त्रीशिक्षण, उद्धरोत अबला, गर्जू सभामंडपी...*

– आणि अशा सुशिक्षित, निर्भय, व्यक्तित्वसंपन्न स्त्रियांना बघून जे लोक नावे ठेवतात त्यांची निर्भर्त्सना करताना ते म्हणतात,

*'झाल्या पोरि चटोर या किती पहा' रस्त्यातही ओरडू*
*देऊ सर्व मनातला उकिरडा आम्ही तिला आंदण,*
*धिक्‌धिक् संस्कृतिहीन मानवपशू आम्ही, तुम्ही देवता*
*प्रेमौदार्य अगाध थोर म्हणुनी आम्हांस सांभाळिता.*

डोक्यावर भाजीची पाटी घेऊन जाणाऱ्या भाजीवालीला बघून कवीला 'कुणा ग सुभगाची राणी– जाशि जशी चंचल हरिणी' असे वाटते; आणि भल्या पहाटे जाणाऱ्या तिच्या फळांना आज 'मोत्यावाणी' भाव येईल अशी त्याला खात्री वाटते.

रोम, टोरांटो, हिरोशिमा, मोंबासा, व्हिएतनाम येथे लिहिलेल्या कवितांमधून त्या त्या स्थळांची वर्णने येतात. रोमानगरीची रसोत्कट कहाणी डोळ्यांसमोर आल्यावर त्यांना वाटते, 'काळाचे शर बोथटून पडती पायी तुझ्या लाजुनी.' टोरांटोच्या उंच उंच हवेलीतल्या मऊ परांच्या बिछान्यावरही त्यांना शांत झोप येत नाही; सात समुद्रापलीकडच्या घराची आठवण सतावत राहते. तेथील गारठलेल्या झाडांवर हिमाची शाल शिशिर घालतो आणि असंख्य हिमकणांनी भर दिवसा अंधारून येते; शांघायमध्ये फिरंगी, जपानी खलाशी मस्त मजेत फिरताना दिसतात तर विटांच्या ढिगाऱ्यात बिचारा चिनी कसाबसा जगतो हा विरोधाभास त्यांना त्रस्त करतो. हिरोशिमाच्या अणुबाँबचे वर्णन 'लाख सूर्य गगनी लखलखले शास्त्रज्ञांचे सार्थक झाले' असे करून विज्ञानाच्या बकासुराची भूक भागवणारा कोणी भीम येईल का असा प्रश्न विचारतात. भारतीय स्वातंत्र्यप्राप्तीच्या क्षणी वाटलेला हर्ष पुढच्या वर्षभरातील घटनांनी कोमेजतो हे सांगतात, तसेच केनियाच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या वेळी 'बंधु ये खुल्या मने सांग तुझी व्यथा मला' असे आवाहन ते करतात. व्हिएतनामच्या सेगाव नदीच्या तीरावर 'प्रणय विकाया दलाल फिरती. . नृत्यसंगीता येई भरती ।', 'नीति आणि अनीतीमधल्या रेषा नकळत पुसल्या जाती' असा अनुभव त्यांना येतो. १९८१ मध्ये लिहिलेली असेच कोणी ही कविता त्यांच्या सद्यःकालीन भाववृत्तीचीच जणू कल्पना देते.



अनुक्रमणिका








*असेच कोणी अवचित येते । संध्याकाळी पहाट होते ।*
*वैराणावर दंव शिंपडते । आठवणींची बाग फुलविते...'*

काव्य म्हणून या रचनांना विशेष मोल आहे असे नाही; परंतु बहुत देशी संचार झालेल्या विदग्ध मनाचे भावसंपन्न उद्गार म्हणून या संग्रहाचे वाचन हा उद्‌बोधक अनुभव ठरतो; आणि कवितेतील बदलत्या प्रवाहांचेही एकाच व्यक्तीत कसे वेगवेगळे ठसे उमटतात त्याचाही पडताळा घेता येतो.

(भ्रमण दिंडी : मो. ज्ञा. शहाणे, ममिता, ४१/१५ एरंडवणे, डॉ. केतकर पथ, पुणे ४. पृष्ठे ६२. तीस रुपये.)

---

## जय जननी जय भारत माता : पूर्णानंद मांगूळकर

### राष्ट्रीय भावना जागवणारी शालेय गाणी

**वा. ब. खापर्डे**

---

डॉ. शिवाजीराव पटवर्धनांच्या तपोवन संचालित एका शाळेतील शिक्षक पूर्णानंद मांगूळकर ह्यांच्या राष्ट्रीय कवितांचा हा संग्रह. डॉ. पटवर्धन, सानेगुरुजी ही त्यांची आराध्य दैवते. 'देह पडो सेवा करता' ही त्यांची भावना. वंदे मातरम्, जय महाराष्ट्र देशा, जय स्वतंत्रते, जय भारत सुजला सुफला, स्फूर्तिदायी अमर कथा ही वगैरे कवितांच्या शीर्षकांवरूनही त्यांतील आशयाची कल्पना येऊ शकेल. 'मृत्युस भीत मी नाही...' ह्या कवितेत एका बालवीराचे मनोगत आले आहे. 'अश्रूंची महती कळाया अश्रूंशी नाते जुळावे' असेही सानेगुरुजींच्या शैलीत ते म्हणतात. मुलांच्या मनात राष्ट्रीय भावना जागृत करण्यासाठी अशा पद्यांची गरज असते. स्वतः मांगूळकर आपल्या काव्याबद्दल विनम्र आहेत. 'तुम्ही समजता तेवढा मी मोठा नाही, पण मोठा आहे असं घटकाभर मानलं तर त्यात कुणाचाच काही तोटा नाही. देऊ नका मोठेपण' असे ते म्हणतात. हौसेने केलेल्या या लेखनातील ऱ्हस्व-दीर्घ दोष, प्रयोगशैथिल्य, अप्रयुक्तता, वचनदोष, अपसंधी वगैरे दोष शोधण्यात काय हशील ?

(जय जननी जय भारत माता— पूर्णानंद मांगूळकर, तपोवन, अमरावती. ४४० ६०२. पृष्ठे ५६. वीस रुपये)

(वा. ब. खापर्डे, खापर्डे वाडा, राजकमल चौक, अमरावती २.)



अनुक्रमणिका






# चिमणगाणी : हेमा लेले
## बालमनाला भावलेले अवतीभवतीचे जग

**शंकर सारडा**

'चिमणगाणी' हा हेमा लेले यांनी लिहिलेल्या चौदा बालगीतांचा संग्रह. विषय बरेचसे नेहमीचेच आहेत. आई-बाबा, सर्कस, आजोबा, बाहुली, ट्रिप, पाऊस, दोस्त, अभ्यास, मी कोण होणार इ. पण तरीही ही गाणी मोठी गमतीदार आहेत; अभिनय करून म्हणण्याला सोयीस्कर आहेत. त्यांचा मुलांनीच केलेला प्रयोगही चांगला रंगतो.

अभ्यास केल्याशिवाय काही येत नाही हे आईचे वा शिक्षकांचे नेहमीचे पालुपद. परंतु छोट्या मुलांना मात्र आपल्या अनुभवाच्या संदर्भात हे मत बरोबर वाटत नाही. मनी उंदीर पकडते, मोत्या चोर पकडतो, कोकिळ गाणे म्हणते, खारूताई भरभर धावते, बेडूक डरांव डरांव म्हणत उड्या मारतो, ह्या सर्वांनी अभ्यास वा सराव केलाय असे दिसत नाही, साहजिकच हेमा लेले यांच्या कवितेतली चिमुरडी म्हणते :

*'अभ्यास केल्याशिवाय म्हणे काही येत नाही*
*मला मात्र हे अगदी मुळीच पटत नाही.*
*- पण शाळा टळत नाही, अभ्यास संपत नाही*
*वरती ऐकून घ्यावे लागते शिकवूनही येत नाही.*

चाफ्याच्या झाडावरचा पोपटांचा थवा, खारींची धावपळ; चिमण्यांचा दंगा, मोत्याचं भुंकणं, मांजरीच्या पिल्लांचं ओरडणं, साळुंक्यांचा खेळ, कावळेदादांची कावकाव अशा उनाडपणाबद्दल आपल्या दोस्तांना कोणी बोल लावत नाही; आणि अभ्यास करायलाही सांगत नाही. याबद्दलही मग तक्रार नोंदवली जाते.

मोठ्या लोकांच्या बोलण्यातील भाषेच्या लकबींमुळेही बालमनाचा गोंधळ उडतो. पोर किती वाळला असे आजी म्हणते. छोट्याला प्रश्न पडतो– आपण का धुण्याचा पिळा आहोत ? बाबा रागवून माणसासारखे वागा म्हणतात. काका हवा खाऊन येतो म्हणतात; बुक्का लगावतात आणि डोक्यावरही लावतात. शाळा सुटते आणि चड्डीही सुटते. मोठ्या लोकांच्या बोलण्याचे कोडे पडते.

आई बाबांना तिरसट म्हणते, तर बाबा आईला हट्टी म्हणतात. मुलांची मध्येच पंचाईत होते. मग भावंडे नाटक करतात. लटकेच भांडतात. आई-बाबा वैतागतात. बाबा तिरसट, आई हट्टी, पोरंही तेच शिकली अशी मुलांची मग कॉमेंट. आणि दोघांचं हसणं. वर मुले सर्टिफिकेट देतात : आई-बाबा आम्हाला आवडतात कारण ते दुसऱ्यांकडे गेल्यावर अगदी शहाण्यासारखे वागतात !



अनुक्रमणिका

मुलांच्या रूपदर्शी प्रतिभेची धावही विलक्षण. पांढरी साडी– जाड भिंग नेसणाऱ्या त्यांच्या बाईंना मग नाव मिळते सनमायका. सदा हसणाऱ्या बाई– सोडावॉटर. घट्ट पदर– मोठं कुंकू– हरताळका. तोंडावरची माशीही न हलणाऱ्या बाई बनतात टीव्ही; इकडे बघून तिकडे बोलणाऱ्या बाई आकाशवाणी. एकसारखं आत्मपुराण गाणाऱ्या बाईंना नाव– . आयस्पेशालिस्ट. भरभर बोलणाऱ्या खडू तोडणाऱ्या बाई सुपरफास्ट. कडक मॅचिंग व डोकं भरून फुलं– श्रीदेवी. मुलांची या बाईंबद्दलची प्रतिक्रिया– घरी करमत नाही म्हणून आमच्या बोकांडी बसतात. आम्ही शिकणार तरी कसे ?

आपण एकटेच सर्कस करायला समर्थ आहोत असं म्हणणारा बहादूरही आपल्या ट्रिक्स खुल्या करतो. आईची पावडर लिपस्टिक लावली की जोकर; बाबांचा लेंगा– रेघांचा शर्ट घातला की हात लांब; फळीवरचा डबा काढण्याची कसरत; झोपाळ्याचा खेळ, एकोणिसचा पाढा म्हणजे तारेवरची कसरत. मात्र या सर्कशीत रिंग मास्टर बाबांना स्थान नाही. त्यांच्यासमोर सर्कस रंगणार नाही अशी या एकपात्री सर्कसवीराची खात्रीच आहे.

आजोबांच्या सहवासातले सुखद क्षण आठवता आठवता 'ते आपल्याला न सांगता कसे गेले' असा प्रश्न राजा बेटाला पडतो.

शाळेच्या ट्रिपची गंमत तर विचारूच नका. मस्त गाडी, खिडकीजवळची जागा मिळवण्यासाठी धक्काबुक्की, खाऊचे डबे, च्युइंगगमच्या फुग्याची शर्यत, वाटेतले ओढे, झाड झुडपे, हिरवे-निळे दगड, फुलपाखरांचे थवे, जेवताना आलेली गंमत, नकला-गोष्टी-गाणी विनोदाची चंगळ, लपाछपीचा खेळ– असा भरभर गेलेला दिवस, 'ट्रिप ट्रिप ट्रिप निघाली' मध्ये भेटतो.

पावसात भिजायलाही मोठी गंमत येते. रिमझिम रिमझिम, टपटप धडाडधुम, सुर सुर सुर सुर झुम झुमाक्क असे त्याचे बदलते ढंग. पाऊस छान दिसतो, छान गातो, छान नाचतो, छान हसतो, छान चालतो !

इंजिन ड्रायव्हर, डॉक्टर, लता मंगेशकर, स्टेफी ग्राफ, गावसकर, अमिताभ बच्चन, राजीव गांधी, बाबा आमटे अशा वेगवेगळ्या हीरोंचे बालांना आकर्षण वाटते. ते मी कोण होणार मध्ये आपल्याला साग्रसंगीत बघायला मिळते.

अवतीभवतीचा परिसर आणि अवतीभवतीची माणसे आणि त्यांचे वागणे याचा आजच्या बालमनावर उमटणारा जो ठसा आहे, त्याची झलक या गाण्यांमधून बघायला मिळते. आई-बाबा आणि शिक्षक यांच्या वर्तनातल्या विसंगतीवरही ही चलाख पिढी नेमके बोट ठेवते आणि त्यावर खुसखुशीत भाष्य करते हे विशेष ! त्याचमुळे प्रत्यक्ष रंगमंचावर मुलेच जेव्हा ही गाणी सादर करतात तेव्हा लहान-मोठ्या प्रेक्षकांच्या भरभरून टाळ्या मिळतात. चंद्रमोहन कुलकर्णीची चित्रे गमतीदार आहेत, परंतु कवितांच्या ओळी फार दाटीने बसवल्या आहेत; मांडणी जरा सुटी सुटी हवी होती.

(चिमणगाणी : सौ. हेमा लेले, उन्मेष प्रकाशन, २६ पर्वती, पुणे ३०. दहा रुपये.)



अनुक्रमणिका






# आहे मनोहर तरी : सुनीता देशपांडे

## उत्कट संवेदनशील मनाची आंतरिक स्पंदने

डॉ. नीलिमा गुंडी

सुनीता देशपांडे यांच्या 'आहे मनोहर तरी'चे पहिलेच वाक्य 'हे आत्मचरित्र नाही. आठवणींच्या प्रदेशातली ही स्वैर भटकंती.' (पृष्ठ नऊ) असे आहे. आयुष्याच्या संदर्भात स्वतःला पडलेले काही प्रश्न आणि स्वतःच्या बदलत्या भावस्थितीची स्पंदने लेखिका नऊ ते बारा पृष्ठांवरील प्रास्ताविकात प्रकट करते. गतजीवनाचा आकार आणि अर्थ शोधण्याचे सूत्र, या लेखनात अनुस्युत आहे. आत्मचरित्रात आयुष्यातील सर्वच घटना आणि त्याही कालानुक्रमे सांगाव्यात, अशी अपेक्षा नसते; तर स्वतःच्या जीवनाचा दुरून शोध घेण्याची भूमिका असते. या अर्थाने हे आत्मचरित्रच ठरते. 'आठवणींची स्वैर भटकंती' करताना काहीशा संज्ञाप्रवाही पद्धतीने घरंगळत्या आठवणींना सूत्रबद्ध केलेले दिसते. उदा.

(१) पृ. ३५ वरील अळंब्याच्या छत्र्या असलेल्या भिंतीनंतर आजाराला कारण झालेल्या छत्रीची आठवण (२) पृ. ४९ वरील व्यवहार सांभाळण्याच्या बौद्धिक खेळानंतर ब्रिज खेळण्याच्या प्रसंगाची आठवण (३) पृ. ६९ वरील आकार बदलणाऱ्या आठवणींच्या माशांच्या संदर्भानंतर धामापूरच्या तलावातील माशांचे आलेले चित्रण.

अशा जागा आणखीही सापडतात. परंतु निवेदनशैलीच्या ह्या वेगळेपणामुळे वाङ्मयप्रकार म्हणून या लेखनाला वेगळेपणा प्राप्त होतो; असे मात्र नाही.

आत्मचरित्रात्मक लेखनातील अंतःसूत्र म्हणजे लेखकाला स्वतःच्या जगण्याचे एका कलात्मक अलिप्ततेतून येणारे भान. लेखिकेने सुरुवातीला एका प्रश्नातून ही जाणीव शब्दबद्ध केली आहे. ती अशी : "... प्रौढ वयात आपल्यातले ते नार्सिससचे फूल दरवळायला लागले की कालप्रवाहाच्या सतत हलणाऱ्या पाण्यात दिसणारे स्वतःचे प्रत्यक्ष प्रतिबिंब आणि ते वहीतले चित्र यांचे काहीतरी नाते जाणवते का ?" (पृ. नऊ)

लेखिकेचे आत्मभान प्रकट होण्याचा एक बिंदू आहे आत्मसन्मान व्यक्त करणाऱ्या जाणिवेचा आणि दुसरा बिंदू आहे आत्मचिकित्सा करणाऱ्या जाणिवेचा ! "ही पोरगी म्हणजे एक रत्न आहे !" हे नाना जोगांचे उद्‌गार (पृ. २१०) तसेच "संकोच थोडा दूर सारून खरे सांगायचे, तर मीही काही अगदीच सामान्य नव्हते."(पृ. २२३) हे लेखिकेचे उद्‌गार. त्यांतून बाईंमधील आत्मसन्मानाची जाणीव व्यक्त होते. आत्मसन्मान वाटावा अशा, लेखिकेजवळ ज्या गोष्टी आहेत त्यांत स्वातंत्र्य, अर्थशुचिता इ. जीवनमूल्यांविषयी प्रेम, तत्त्वांबाबत आग्रही वृत्ती, संवेदनाशील रसिक मन, असे काही स्वभावविशेष आहेत. तसेच शिस्त, व्यवस्थितपणा, स्पष्टोक्ती, कामसू वृत्ती, स्वच्छतेची आवड अशा दैनंदिन जगण्याशी



अनुक्रमणिका






संबंधित काही चांगल्या सवयीही आहेत. त्यांच्या या स्वभावविशेषांचे दर्शन यातील अनेक आठवणींतून घडते. विशेषतः कर्मवीर भाऊराव पाटील यांच्या संदर्भातील आठवणीतून लेखिकेचा मनस्वीपणा आणि सहृदयता यांचे एकात्म दर्शन घडते. ते वाचकाला स्तिमित करते.(पृ.१३५)

स्वातंत्र्य चळवळीत बाँब बनवण्याच्या कामातील सहभाग, लग्नानंतर मालेगावला आदिवासी शैक्षणिक प्रकल्पातील सहभाग आणि नाटकांतून केलेल्या भूमिका, हे जीवनानुभव त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची वाचकांना ओळख करून देतात. त्यांचे सृजनशील व्यक्तिमत्त्व अशा अनुभवांतून जाताना आंतरिक समृद्धीचा अनुभव घेत आहे; हे लक्षात येते. आदिवासी मुलांशी त्यांनी जुळविलेले भावनिक नाते वाचकांच्या मनाची तार छेडते. तसेच 'सुंदर मी होणार' नाटकातील भूमिकेशी होणारी समरसता मनाला भिडते.

या व्यक्तिमत्त्वाचा आणखी विशेष म्हणजे 'कविताप्रेम'. हे पुस्तक अर्पण केले आहे 'कवितांना; ज्यांनी आयुष्यभर साथ दिली.' शीर्षकापासून ते निवेदनाच्या अनुषंगाने येणारी तुकारामांच्या अभंगापासून दलित काव्यापर्यंतची अवतरणे बाईंच्या कविताप्रेमाची साक्ष पटवतात. पण त्याहीपेक्षा त्यांच्या काव्यप्रेमाचा ठसा उमटतो तो यात अधूनमधून येणाऱ्या काव्यात्म चिंतनांतून ! येथे एक मात्र खटकते, ते म्हणजे बाईंनी पु.ल. देशपांडे यांच्याबरोबर नामवंत कवींच्या कवितावाचनाचे कार्यक्रम केले होते, त्या कार्यक्रमातील अनुभवांविषयी त्या काहीच लिहीत नाहीत.

लेखिकेत आत्मचिकित्सेची दृष्टीही आहे. लहानशा चुकीबद्दल स्वतःला छळण्याचा स्वभाव, परफेक्शनिस्ट वृत्तीमुळे येणारी असमाधानी वृत्ती (इतरांना 'चिंतातुर जंतू' वाटणारी), या स्वभावातील खाचाखोचा सांगून आपल्यातील काही सद्‌गुणही दुर्गुणांच्या सीमेवर येणारे ठरतात असे लेखिका म्हणते. आत्मचिकित्सेत स्वतःच्या गुणावगुणांच्या उल्लेखापेक्षा महत्त्व येते ते एखाद्या प्रसंगी घडलेल्या आपल्या वर्तनामागच्या हेतूंची वस्तुनिष्ठपणे चिकित्सा करण्याला ! या संदर्भात भय्याविषयी निर्माण झालेल्या मोहाच्या क्षणाचे वर्णन लेखिकेने खोलात जाऊन चितारले आहे.(पृ.५० ते ५२)

फाळणीपूर्वीच्या दंग्याच्या वेळी प्रो. अश्रफ यांच्या घरी असताना आपण भीतीने कशा थरथरत होतो, या आठवणीने लेखिकेला लाज वाटते. "त्या क्षणी त्या मुसलमानातला माणूस जागा झाला होता आणि माझ्यातला हिंदू डोकं वर काढू पाहत होता." अशी त्या कबुली देतात आणि म्हणतात, "आपल्यालाच अद्याप आपण ओळखलेले नाही." (पृ.२७)

आत्मचरित्रात काळाच्या अंतरावरून पूर्वी घडलेल्या प्रसंगाकडे पाहताना नव्या दृष्टिकोनामुळे दुपेडी चिंतन येऊ शकते. उदा. वडिलांचे लांबचे भाऊ अण्णा सुनीताबाईंना त्या लहान असूनही साष्टांग नमस्कार करीत. त्या वागणुकीचा त्यांना त्या वयात वाटणारा ताप त्या सांगतात आणि आज नवे भाष्य करतात : "आता मात्र त्या आठवणींनी डोळे भरून येतात.. .ते तसा नमस्कार करीत तेव्हा संकोचून आखडून न जाता आपण त्यांच्या पाठीवरून











हात फिरवून आशीर्वाद द्यायला हवे होते असे वाटू लागते. आपण ज्यांना 'आपली' म्हणतो त्यांच्या आयुष्यातले असले छोटे छोटे समाधानाचे क्षणदेखील आपल्या अहंकारामुळे आपण हिरावून घेतो, या विचाराने अस्वस्थ व्हायला होते." (पृ.३९)

तसेच आजारपणात आपण डाळिंबाचे दाणे खाण्यापूर्वी सासरच्या मंडळींनी दाणे संपवून टाकले; या घटनेचा आपण 'राईचा पर्वत' केला. (पृ. १९७); हे त्यांचे आताचे भाष्य असते.

परंतु लेखिकेचे हे चिंतन प्रासंगिक ठशाचे उरते. आजपर्यंतच्या आयुष्याकडे पाहताना स्वतःविषयीची नवी जाणीव भेदकपणे झाली आहे आणि त्या प्रकाशात पुढचे जगणेच बदलून गेले आहे; असे मात्र दिसत नाही.

मानवी नातेसंबंधांकडे पाहतानाही लेखिकेची दृष्टी निर्मम आहे. त्यामुळेच परंपरेने गौरविलेल्या आई-मुलगी नात्यातील वर्ख खरवडून पाहायला त्या कचरत नाहीत. आजवर मराठी साहित्यात पिता-पुत्र संघर्षाचे प्रसंग फार चांगले टिपले गेले आहेत. पण आई आणि ्लगी या नात्यातील टोचणारे कंगोरे दाखविणारे यातील आईचे व्यक्तिचित्रण खास लेखनीय ठरावे. आईशी असलेले विरोधी नाते व्यक्त करतानाही तिला समजून घेण्यात खेका कमी पडत नाही. त्यामुळे या चित्रणात सहजता आढळते. आईचे औदार्य आणि ठपणा यांचे एकात्म दर्शन घडते. (पृ. १०-११) विशिष्ट परिस्थितीच्या साच्यात घडलेले ईचे बंदिस्त व्यक्तिमत्त्व त्या जाणून घेतात आणि त्याच वेळी केवळ 'आई' म्हणून तिच्या वारांशी नाते जोडण्याचे ठामपणे नाकारतात. शेवटी त्या म्हणतात, "आई आणि मुलगी हे तड्याचे नाते आम्हा दोघींत निश्चितच होते. पण दैवाने आम्हा दोघींची स्थाने ही अशी न ध्रुवांवर रोवून ते आतडे तुटेपर्यंत ताणले होते खरे." (पृ. २३)

आईशी तुलना करीत त्या सासूबाईंचे चित्रही थोडक्यात रंग भरत रेखाटतात. जे. पी. ईक, शंकरराव देव, कर्मवीर भाऊराव पाटील, यांची यातील स्थूल रेखाचित्रे देखील वकांच्या मनांत रेंगाळत राहावीत, अशी उतरली आहेत.

लेखिकेच्या सुट्या आयुष्याची ज्यांच्यामुळे 'घट्ट तीनपदरी वेणी' गुंफली गेली त्या न व्यक्ती म्हणजे भय्या (मीर असगर अली) आणि धामापूरची आजी. रक्ताचे नाते तानाही या दोन व्यक्तींशी जुळलेले आपले भावबंध लेखिका समरसतेने रंगविते. ांचा आणि दागिन्यांचा षौक असलेली पण स्वतः बालविधवा आणि विकेशा असलेली ची आजी तिच्या घरासकट जिवंत होते. स्त्रीजातीचा कैवार घेण्याच्या भरात, अपरिपक्व ात आपण तिला एकदा कसे दुःख दिले; या प्रसंगाचे चित्रण (पृ. ४०) तन्मयतेने केले हे.

या पुस्तकात भाईंचे– पु.ल. देशपांडे यांचे चित्रण येते. सुनीताबाई त्यांच्याविषयी हितात तेव्हा त्यांच्या खाजगी जीवनापेक्षा कलावंतजीवनाविषयी वाचकांना अधिक ुकता असणार. पु.लं. मधील कलावंतमनाचा वेध त्या कसा घेतात? पु.लं. च्या

लेखनविषयक सवयी, त्या वेळची त्यांची मनःस्थिती यांविषयी तपशील देऊन कलाकार म्हणून जगताना आलेला आत्मकेंद्रीपणा, सामाजिक जीवनात विशेषतः पती म्हणून कसा काचतो; हेही त्या सांगतात. या आत्मकेंद्री वृत्तीचे समर्थन कलावंत म्हणून करणे त्यांना योग्य वाटत नाही. हा शेवटी व्यक्तीचा स्वभावच ठरतो. पु.ल. ना लेखक म्हणून आपण अप्रत्यक्षपणे घडविले, त्यांना चित्रपटसृष्टीतून बाहेर काढले; याबाबत 'त्याला त्याच्या नैसर्गिक वृत्तीने जगू न देता आपण त्याचा गिनिपिग तर केला नाही ना?' (पृ. १०४) असाही प्रश्न त्या उपस्थित करतात.

पु. लं.च्या कलावंत व्यक्तिमत्त्वाचा त्या उभा-आडवा छेद घेतात. साहित्यबाह्य गोष्टीतल्या मोठेपणाला घट्ट पकडून राहणारे पु.ल., महत्त्वाच्या प्रश्नांना सोपी उत्तरे देऊन बगल देणारे पु.ल., नाठाळानेही आपल्याला वाईट म्हणू नये म्हणून त्याच्याशीही भलेपणाने वागणारे पु.ल.- अशा त्यांच्यातील अनेक कंगोऱ्यांचे त्या दर्शन घडवितात. पु.लं.मधला सोवळेपणा, त्यांची मध्यमवर्गीय घडण, आणि त्यांच्या पात्रांशी असलेले त्यांचे वृत्तीचे आंतरिक नाते सांगताना बाई पु.लं.च्या लेखनाच्या मर्यादाही सूचित करतात.

काही ठिकाणी मात्र पु.लं. मधील कलावंत समजून घेण्यात सुनीताबाई कमी पडतात. त्या जेव्हा पु.लं.ची निर्मितिक्षम, कृतिशील आणि पूर्णपणे कृतिशून्य (पॅसिव्ह आणि ॲक्टिव्ह) अशी दोन रूपे विरोधी रंगांत समोर ठेवतात, तेव्हा बाह्यतः कृतिशून्य वाटणारा कलावंत निरीक्षण, चिंतन अशा पद्धतीने कृतिमग्न असू शकेल; अशी शंकाही त्यांना येत नाही. सुनीताबाईंच्या ठोस व्यवहारी दृष्टीला कल्पक निर्मितिशील मनाचे व्यापार वाचणे जमत नसावे असे वाटते. पु.लं. मधील माणसे जोडण्याचे हे हपापलेपण कोणत्यातरी अदृश्य अशा परंपरागत भीतीपोटी असेल का? (पृ. ९२)- असा प्रश्न त्या विचारतात तेव्हा एक नट आणि विनोदी लेखक या नात्याने तऱ्हेतऱ्हेची माणसे न्याहाळणे त्यांच्या कलावंत मनाची गरज असू शकेल; असे बाईंच्या मनातही येत नाही. तसेच अनेक व्यक्तींच्या वर्तणुकीमुळे बाईंना होणारा मनस्ताप पु.लं.ना होत नाही, याचीही त्यांना खंत वाटते. पु.लं. मधील विनोदी लेखकाची जीवनदृष्टी- विनोदाने विसंगती तोलून धरण्याचे सामर्थ्य- त्या समजू शकत नाहीत; असे वाटत राहते.

आपल्या सहजीवनाचे चित्रण करताना त्या पु.लं.मधील समजूतदारपणाला संसार टिकविण्याचे श्रेय देऊन त्यांच्या इतर स्वभावविशेषांविषयी काहीशा तक्रारीच्या सुरात लिहितात. या तक्रारींना महत्त्व देण्यापेक्षा त्यातील पति-पत्नीनातेसंबंधाचे पैलू उलगडून पाहिल्यास काय दिसते? या नात्यात आई-मूल नात्याचा पदर सुनीताबाई गुंफतात. पु.लं. चे परावलंबित्व, निरागस आत्मकेंद्री वृत्ती इ. स्वभावविशेष त्यांच्या 'मूल'पणात समाविष्ट करून स्वतःकडे आईपण निभावण्याचे कर्तव्य आल्याचे त्या सांगतात.

स्त्रीविषयक प्रश्नांबाबत बंडखोरपणे विचार करणारी ही लेखिका असल्याने ह्या आई-मूल नात्याकडे थोडे चिकित्सेने पाहायला हवे.



अनुक्रमणिका






आधुनिक दृष्टीने विचार करता लहानपणी मुलाची काळजी घेणे हे जसे आईचे कर्तव्य, तसेच त्याला वयपरत्वे स्वतंत्र, स्वावलंबी करणे; हेही आईचे कर्तव्यच असते. मुलाला आपल्या प्रेमात जखडून परावलंबी ठेवणारी आई (याच आईचे रूपांतर प्रजाहितचिंतक राजात होत असते) खऱ्या अर्थाने कर्तव्यदक्ष आई आहे असे म्हणणे कठीण जाते. येथे तर आपल्या पतीचे शरीर-मनाचे मूलपण लेखिका सतत सांगत आहे आणि आपण आईपणाचे कर्तव्य निभावताना कसे गुंतून पडलो, याविषयी अधूनमधून (कौतुकाने) तक्रारही करीत आहे; तेव्हा यातून व्यक्त होणारी आईपणाची प्रतिमा पारंपरिक ठशाची वाटते.

घरातील लहानसहान कामांपासून ड्रायव्हिंगपर्यंत अनेक कामे आपण अंगावर घेऊन जीव ओतून केली. त्यात पूर्णपणे बुडत गेलो; असे लेखिकेचे संसारचित्रण आहे. यामागेही पारंपरिक ठशाची स्त्री मनोवृत्ती दिसते. लहानसहान कामे स्वतः करीत एकप्रकारे त्यातून आपल्या जगण्याचे प्रयोजन शोधत राहायचे आणि वरवर मात्र त्या कामांविषयी तक्रार करायची, ही ती मनोवृत्ती ! याहून खोलात जाऊन विचार करायचा तर पतीने आपल्याला शाबासकी द्यावी, कोणीतरी 'कैवारी बंधुरायाने' आपल्यासाठी काही तरी करावे– ही अपेक्षा तरी कोणत्या मनोवृत्तीतून येते ? एखाद्या स्वयंपूर्ण व्यक्तिमत्त्वाच्या स्त्रीला पतीकडून शाबासकीची अपेक्षाच का असते ? यामागे स्त्रीची उपजत वृत्ती (इन्स्टिंक्ट) असते की परंपरेने जोपासलेला सूक्ष्मसा न्यूनगंड असतो ? मला वाटते, स्त्रियांच्या आत्मचरित्रांचे समाजशास्त्रीयदृष्ट्या आणि मानसशास्त्रीयदृष्ट्या विश्लेषण होण्याची गरज आहे.

सुनीताबाईंमधील निर्मितिशील व्यक्तिमत्त्वाची, गृहिणी म्हणून जगताना होणारी घुसमट आपण समजू शकतो. पण त्या आपल्या गृहिणीपणाचे चित्रण वेगळ्याच रूपात समोर ठेवतात, तेव्हा त्यातील विसंगती खटकते. आपण संडास स्वच्छ धुतो याचा अभिमान (!), आपण पुड्याच्या दोरीचा गुंडा करतो, अनेक बरण्या भरून तूप साठवतो, गडीमाणसांवर सोपविलेल्या इतरांच्या घरांपेक्षा आपल्या घरातील मोरी स्वच्छ असते– हे सर्व वाचताना यामागे आधुनिक जाणिवेचे स्त्रीमन अभावानेच भेटते. सुनीताबाईंना पु.लं.च्यात लपलेला परंपरावादी 'राम' मार्मिकपणे ओळखता येतो, पण त्याच वेळी स्वतःत लपलेल्या या पारंपरिक स्त्रीमनाचे रूप त्यांना का ओळखू येऊ नये ? येथे त्यांची आत्मचिकित्सा अपुरी ठरते.

अनेक आत्मचरित्रांत आत्मसमर्थनाचा सूर लपलेला असतो. हेही पुस्तक त्याला अपवाद राहत नाही. 'विनोदी लेखकाची बायको' ही स्वतःची हास्यास्पद झालेली प्रतिमा, तसेच पु. लं. चे आर्थिक हित जपताना पैशाच्या मागे लागलेली व्यक्ती म्हणून झालेली आपली प्रतिमा लेखिकेच्या मनाला टोचत आहे आणि आपली बाजू मांडावी त्या पद्धतीने अनेक घटना सांगितल्या जात आहेत, असे वाटते. त्या एके ठिकाणी लिहितातः 'भांडावे तें किती, बहु सोसली फजिती', पण हे भांडण आयुष्यभर मुकेच राहिले. (पृ.१४६) प्रस्तुत लेखनात ही भूमिका शब्दबद्ध होत आहे, हे जाणवते. अशा आत्मसमर्थनामुळे आत्मचरित्र

लेखनातील कलात्मक अलिप्ततेला छेद जातो.

स्वतःच्या चरित्रकथनापेक्षा अधूनमधून डोकावलेल्या यातील चिंतनात, व्यक्तिस्वभाव, मानवी नातेसंबंध, जीवनचक्र इ. विषयांना स्थान मिळालेले दिसते. आयुष्याच्या विशिष्ट टप्प्यावर जाणवणारा एकटेपणा (रेशीमधागे क्षीण झाल्याची यातील जाणीव), नि अंतर्मुख वृत्ती असल्याने आठवणींवर टाकलेल्या कवडशांचे रूप यातील चिंतनाला येते. उदा. मानवी नातेसंबंधात समजूतदारपणा ही चीज इतकी दुर्मिळ का असावी– (पृ.८५) एकाच माणसात अनेक माणसे असू शकतात का ?– (पृ.१८७)

विचारांशी खेळ खेळण्याच्या स्वभावामुळे काही ठिकाणी प्रश्नांचे भोवरे निर्माण करण्यातच यातील चिंतन रमते. त्यात विचारांचा शोध ही अवस्था येत नाही. उदा. पृष्ठ अकरावरील चिंतन.

जेव्हा खोलवर शोधाची भावस्थिती त्यात प्रतिबिंबित होते, तेव्हा ते चिंतन मात्र एका उत्कट संवेदनाशील मनाच्या आंतरिक शक्तीचे दर्शन निश्चितच घडवते. उदा. १९९ ते २०० पृष्ठांवरील एकटेपणाविषयीचे चिंतन. तसेच पुस्तकाच्या शेवटी आलेले चिंतन.

अनुभव आणि चिंतन शब्दबद्ध करण्यासाठी योग्य अशी भाषाशैली, प्रवाही निवेदन यामुळे प्रसंग साक्षात उभे राहतात. धामापूरच्या आजीच्या घरातील विहिरीलाही व्यक्तिमत्त्व येते. (पृ.२९). आपल्या सहजीवनातील सुंदर क्षणांच्या आठवणी तरलपणे टिपतात. उदा. पारिजातकाच्या फुलांचा अंगावर सडा पडल्याची आठवण तसेच पुणेरी पावसात 'गगनि उगवला सायंतारा' हे पु.लं. चे गीत ऐकताना होणारी न सोसणाऱ्या सुखाची जाणीव अशा जागा कितीतरी येतात.

मनस्वी आणि संवेदनाशील स्त्रीचे हे पुस्तक वाचकांच्या मनाची पकड घेते, अनेक अपेक्षा निर्माण करीत जाते पण पुढे पुढे मात्र आत्मकेंद्री वृत्तीची ('मी तशी रेशमाच्या किड्याच्या जातीची' पृ.१४) पकड घट्ट होऊ लागते. व्यक्ती, परिस्थिती यांना समजून घेण्यासाठी आवश्यत ती लवचिक वृत्ती कमी पडते आणि वाचकाचा अपेक्षाभंग करते.

(आहे मनोहर तरी : सुनीता देशपांडे, मौज प्रकाशन, मुंबई ४. पृष्ठे २३२, शंभर रुपये.)

(डॉ.नीलिमा गुंडी, ६/७० लोकमान्य नगर, नवी पेठ, पुणे ३०)

---

**इतर**

**१. वेध–** सौ. उषा गडकरी, ज्ञानेश प्रकाशन, नागपूर-२२, पृष्ठे— ९६, पस्तीस रुपये.

**२. अभिजात–** गोविंद तळवलकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे— १२१, चाळीस रुपये.

**३. ओळख ज्ञानेश्वरीची–** शैलजा काळे, ज्ञानेश प्रकाशन, नागपूर-२२, पृष्ठे— ६४, पंधरा रुपये.

**४. सार्थ चांगदेव पासष्टी–** सं. इंदू लिमये, प्रसाद प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे— १०८, वीस रुपये.

**५. डॉ. जिबलो गावकर–** सं. सं. शं. देसाई, फोंडा, गोवा, पृष्ठे— १४६, तीस रुपये.

**६. इंद्रावतीच्या परिसरातील माडिया जमात–** म. रा. बडवे, चंद्रपूर, पृष्ठे— १३२, साठ रुपये.












# आहे मनोहर तरी : सुनीता देशपांडे
## कविमनाचे परखड पारदर्शी चिंतन

**वसंत केशव पाटील**

अनेकविध प्रदेश आपल्या एका अभिजात मस्तीत सहजपणे आक्रमीत पु.ल. देशपांडे यांच्यासारख्या हरहुन्नरी माणसाबरोबर मांडलेल्या घर-संसारातील अनुभवांचा नि बहुपदरी आंदोलनांचा आविष्कार म्हणजे सुनीताबाई देशपांडे यांचे 'आहे मनोहर तरी' हे आत्मकथन. कुणाही लोकशरण आणि सतत वाजत-गाजत राहणाऱ्या कलावंत लेखकाच्या छायेमध्ये जवळची नि नात्यागोत्याची मंडळी लौकिकार्थाने बरीचशी झाकोळून जातात. रंगहीन व दुय्यम ठरतात. सुनीताबाईंचे तसे झाले नाही, ही या आत्मकथनाची एक जमेची बाजू आहे.

मुळामध्ये जी सामान्य माणसे असतात, त्यांना मनापासून कुणाच्या ना कुणाच्या सावलीत राहणे आवडते. ती त्यांची जीवनपद्धतीही असू शकते नि त्याविषयी त्यांची काही तक्रार नसते. सुनीताबाईंचा स्वभाव अभिमानी, बंडखोर नि बाणेदार. हे दोघेही कलासक्त, स्वतंत्र स्वभावाचे आणि परस्परविरोधी व्यक्तिमत्त्व असलेले, तरीही त्यांचा सहवास व सहप्रवास विशेष वाऱ्यावादळाशिवाय सुखाचा सोहळा व्हावा, याचे मर्म कशात असावे असा प्रश्न पडतो. या प्रश्नाला जे सनातन उत्तर आहे, तेच इथेही लागू पडते. संसारात दोघांपैकी कुणी एकाने विस्तव झाले की दुसऱ्याने आपसुक पाणी व्हायचे असते. आता हे खरे आहे की पुलंनाच पुष्कळदा पाण्याची भूमिका करावी लागली आहे. यातही पुन्हा गंमत अशी की याविषयीची सखोल जाणीव सुनीताबाई मनोमन जपत आहेत. जीवनामध्ये एखाद्या नाटकातल्याप्रमाणे आपापल्या भूमिका कुणीही कायमस्वरूपी आखून किंवा बांधून घेतलेल्या नसतात. कुणा एकाची बाजू घेऊन पूर्वग्रहाने या लेखनाची बांधणी, अनुभवप्रसूत तत्त्वचिंतन ह्यांसारखी वैशिष्ट्ये दुर्लक्षिली जाण्याची शक्यता वाटते. केवळ पुलंच्या पत्नी म्हणून सुनीताबाई वेगळ्या किंवा वैशिष्ट्यपूर्ण ठरत नाहीत. अर्थात पुलंचं पत्नीपद हा आपल्या व्यक्तिमत्त्वाचा झगमगता पदर बाईंनी कवचकुंडलाच्या मायेने जपला आहे. असो. सुनीताबाईंमधील 'बायकोपण' बाजूला ठेवले तरी तत्त्वनिष्ठ, मूल्यप्रेमी नि माणूसपणाचे रूपरंग ल्यालेले त्यांचे म्हणून एक व्यक्तिमत्त्व आहे. त्या सोशिक, समजूतदार, शिस्तप्रिय, टापटिपीच्या नि रोखठोक वाटतात; तशाच मोहरीगत तडकणाऱ्या; दांभिकता, लबाडी यांची चीड बाळगणाऱ्या; बोटचेपेपणा, आळस वगैरेबद्दल तिटकारा असणाऱ्याही. एकीकडे कठोर, करारी, विवेकी, सतत सावध नि दक्ष असे आदर्शवत सुसंस्कृत नि निर्भय असे दुर्मिळ आणि दुसरीकडे एक बायको म्हणून नवऱ्याविषयीच्या आत्यंतिक प्रेमापोटी हळवे होऊन











कुरकुरणारे, सामान्य माणसाप्रमाणे मातीचागंध भरला पदर लपेटून आत्मतृप्त अप्रूपाईने गदगदणारे, फुलासारखे सहिष्णू असे व्यक्तिमत्व लाभलेल्या. वर वर हे सगळे धागे अंतर्विरोधी वाटावेत नि कोड्यात पडायला व्हावे.

एका कविमनाचे हे परखड, पारदर्शक चिंतन आहे. पानापानावर गद्यकाव्याची शब्दकळा आहे.

या लेखनात विविध नात्यांनी पुलंचा मनःपूत गौरव करणारी हार्दिक विधाने जशी ठायी ठायी आली आहेत; तशीच पुलंमधील आळस, थंडपणा वगैरे व्यंगांवर नेमकेपणाने बोट ठेवणारी विधानेही आहेत. दोहोंचे प्रमाण सारखेच आहे. तराजूचा काटा समतोल असे हे चित्र. आता, यातले काय खरे नि काय खोटे ? तसा हा प्रश्न काही कठीण नाही.

सुनीताबाईंनी पुलंबद्दल जो नाराजीचा वा तक्रारीचा सूर काढला आहे, असे जे वाटते, त्याचेही उत्तर हेच आहे. अत्यंत लोभातून व पूर्णत्वाच्या अपेक्षेतून स्त्रीस्वभाव-सुलभ पराक्रमपूजक प्रवृत्तीतून हे आले आहे. इथे मौज अशी की या संदर्भात आपल्याकडून पुलंवर एक प्रकारे अन्याय होत आहे, याची त्यांना जाणीव आहे. त्यांनी म्हटले आहे, "स्वतः परफेक्शनिस्ट असणे ठीक आहे. पण इतरांकडूनही तीच अपेक्षा ठेवणे आणि मुख्य म्हणजे या बाबतीत घडीघडी होणाऱ्या अपेक्षाभंगांबद्दल तक्रार करणे, वैतागणे आणि वातावरणात त्यामुळे ताण निर्माण करणे हे काही बरोबर नव्हे." (पृ. २२८)

आपल्यापुरती अशी भूमिका बांधून घेतल्यावर विशेष विस्ताराने न सांगताही नुसत्या संक्षिप्त नोंदीवरूनसुद्धा या आत्मकथनाची कित्येक संपन्न शक्तिस्थळे लक्षात येतील.

(१) प्रस्तुतच्या आत्मकथनामध्ये सुनीताबाईंची स्वतःची अशी एक वेगळी प्रतिमा पुरेशा ताकदीने व ठसठशीतपणे समोर येते. त्यांच्या 'स्व'शी सुसंवादी वा विसंवादी म्हणून जिथे नि जसा पुलंचा संबंध आला आहे, तेवढाच त्यांनी चित्रित केला आहे.

खरे तर, सुरुवातीलाच सुनीताबाईंनी '. . .आठवणींच्या प्रदेशातील ही स्वैर भटकंती, पाखरासारखी. . .' असे म्हणून पुढील एक गुंता टाळला आहे. पुल व सुनीताबाई या उभयतांशी संबंधित असे अनेक लेखक, कलावंत, कवी, विविध क्षेत्रांतील कार्यकर्ते इ. होते व आहेत. त्यांच्यापैकी अगदी मोजके उल्लेखच येथे येतात. एरवी, एखाद्या अन्य लेखिकेने पुरवणीसह मतदारयादीप्रमाणे एकूणएक नामावली सहर्ष सादर केली असती.

सुनीताबाईंनी मात्र आपले भले भले आत्मीयदेखील तटस्थपणे शब्दांकित केले आहेत. नि आपला 'स्व' व त्याशी संबंधित घटिते सर्वोपरि ठेवली आहेत. इथे कुणावर अन्याय वगैरे होण्याचा प्रश्न नाही. आपल्या आरशात आपण नि आपणच असायला हवे. बाईंच्या समोरील आरशामध्येही प्रामुख्याने त्या स्वतः आणि अधूनमधून डोकावणारे पुल, बस्स.

(२) 'जसे घेतले तिज देई' या चालीवर ज्या कवितांच्या प्राणशक्तीवर आपले आयुष्य वेचले; सुनीताबाईंनी त्यांनाच या स्वैर आठवणी अर्पण केल्या आहेत. ही अर्पणपत्रिका



अनुक्रमणिका

ी की, वाचकही पुढच्या पानापासून भेटणारी प्रदीर्घ 'कविता' वाचण्यासाठी सज्ज

३) जगण्याचे ज्याचे त्याचे एक तत्त्वज्ञान असते. जो तो त्याप्रमाणे वागला-जगला तर विशेष नाही. पण इतरांसाठीही त्याने आपल्याच या 'तत्त्वज्ञानाचा, कसोट्यांचा' वगैरे सुरू केला की उभयपक्षी सगळा शेंदूर खरवडून निघतो. माणसे नाराज होतात. ली जातात, डूख धरतात. . . हे माहीत असूनही सुनीताबाईंनी ढोंग, फसवणूक, ार, चारित्र्याचा अभाव, लाचारी इ. चा बुरखा फाडून आपला संताप व्यक्त केला आहे. कथित व्यवहारीपण नव्हे. यामुळे सुनीताबाईंना काही पारितोषिकेही मिळाली आहेत. मास्तरीण, कुत्रं' इ. या संदर्भात बाईंनी आपल्या स्वभावाचे जे कठोर विश्लेषण केले ा मर्मस्पर्शी आहे.

४) विविध विषयांचे चौफेर वाचन, कमालीचे काव्यप्रेम, माणसांची उत्तम पारख, ीलता, अनेक सामाजिक, सांस्कृतिक व कलाविषयक प्रश्नांचे (विवाहसंस्था, ा संबंध, घटस्फोट, मृत्यू, स्त्री-स्वातंत्र्य इ) आकलन, नात्यागोत्यातील संबंधांचे सूक्ष्म ुद्धिप्रामाण्यावर निष्ठा, कठोर कसोट्यांवर स्वतःसह सर्वांना पारखून घेण्याचा आग्रह, ोबर वाहात नि विकसित होत गेलेल्या जाणिवांशी आपल्या पदराची मारलेली गाठ नाविषयीचे प्रेम इ. अनेक स्वभाववैशिष्ट्ये अधोरेखित होतात.

५) रत्नागिरी, धामापूर, दिल्ली, मुंबई, मालेगाव इ. ठिकाणे; बेचाळीसचा स्वातंत्र्यलढा; संस्था नि तदंतर्गत व्यवहार, नाटकाच्या तालमी, दौरे, प्रयोग, चित्रपटांची दुनिया, वंत कलावंताचे निर्मितिशरण सोनेरी क्षण, पुलंच्या लेखनातील अनेक पात्र-प्रसंगांचे ादक विश्लेषण, कलात्रंतपणाच्या मऊ मखमली पडद्याआडचे पुलं एक माणूस इ. ; जे.पी. नाईक, कर्मवीर भाऊराव पाटील, नाना जोग, जी.ए. कुलकर्णी, भय्या, आप्पा, धामापूरची आजी, भाऊसाहेब हिरे प्रभृती प्रसिद्ध व्यक्ती आणि दुःख, कारुण्य, मातृत्व, , स्वातंत्र्य, स्त्रीत्व, औदार्य, एकलेपण इ. विविध भाव-भावनांचे अत्यंत हृदयस्पर्शी व ते आलेख सुनीताबाईंनी रेखाटले आहेत.

(६) या आत्मकथात एक सनातन मातृत्व कधी तृप्त; तर कधी अतृप्त, हळवे, क्षमाशील, उदार, प्रसंगी आक्रमक नि मंगलप्रार्थी अशा अनेक रूपांत सतत झिरमिरत राहिले आहे. पुलंवरील प्रसंगोपात राग-लोभ हाही या विराट मातृत्वाचाच आविष्कार आहे.

(७) 'आहे मनोहर तरी' ची भाषाशैली हा एक स्वतंत्र विषय व्हावा. समासशैलीत बांधलेली घट्ट विणीची भाषा; तटस्थ व अर्थवाही आहे. कुठे कातर हळवी, कुठे काव्यात्म, तर कुठे खानदानी अदबीने हसविणारी, प्रसन्न व प्रासादिक.

आता, हे एवढे जमेचे झाले. थोडेसे उणिवांविषयी. सृजनशील कलावंत हा जेव्हा दिसायला मोकळा, नि सुस्त बसलेला असतो, त्या वेळीच तो खरा कामात असतो. त्याचे ते नऊ मणाच्या साखळ्या पायांत बांधल्यासारखे 'भरलेपण' म्हणजे एका अर्थी गर्भारपण

असते. म्हणून वाटते की, सुनीताबाईंनी पुलंमधील आळस, थंडपणा किंवा निष्क्रियता इ. कडे या दृष्टीने आणखी सहदयतेने पाहावयास हवे होते. बेचाळीसच्या आंदोलनातील दिवसांचे चित्रणही निवल्यासारखे वाटते. त्यामध्ये खास धग जाणवत नाही.

(आहे मनोहर तरी : सुनीता देशपांडे, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४. पृष्ठे २५६. शंभर रुपये)

(वसंत केशव पाटील. ४/९ भूपेश अपार्टमेंटस, विद्यानगर, कऱ्हाड-४१५११०.)

## नांगरणी : आनंद यादव

### एम.ए. पर्यंतच्या वाटचालीचे आत्मकथन

सौ. मीना पटवर्धन

'झोंबी' या आत्मकथनाचा दुसरा भाग 'नांगरणी'. दलित नाही तरीही कुणबी जातीसारख्या मागास जातीतं जन्म घेऊनही माणूस म्हणून जगण्याची दुर्दम्य इच्छा असलेल्या आनंद यादवांचे हे आत्मचरित्र शिक्षणविषयक वाटचालीचे आहे.

मुलगा १०-१२ वर्षांचा झाला की तो आपल्या वडिलांच्या हाताखाली काम करून मिळवू लागतो, त्यांच्या संसाराला तो हातभार लावू लागतो. पण इथे यादव शिकण्याच्या मनस्वी उर्मीमुळे मिळवत नसल्याने वडिलांच्या लेखी ते नगण्य ठरले. तरीही धडपडत, चाचपडत एस .एस. सी. पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. हा भाग 'झोंबी' मधे आला आहे. परंतु पुढे एम. ए. पर्यंतचे शिक्षण घेताना यादवांना प्रतिकूल परिस्थितीशी झगडावे लागले, आपल्या व सुशिक्षित समाजाची हेटाळणी सहन करावी लागली, आणि शेवटी घरातून निघून जाऊन शिक्षण पूर्ण करावे लागले, त्याचे चित्रण त्यांनी 'नांगरणी' मधे केले आहे.

या काळात अनेक प्रकारची, स्वभावाची माणसे त्यांच्या जीवनात डोकावून गेली. ज्यानी त्यांना जीवन सुसह्य करायला मदत केली, शिक्षणाला प्रेरित केले त्या सर्वांचे ते जन्मभर ऋणी आहेतच; पण ज्यांनी त्यांची अवहेलना केली, दुराव्याने वागवले त्यांनाही ते आदरानेच संबोधतात. कौटुंबिक संघर्षाला तोंड देऊनही त्यांचे आपल्या कुटुंबावरील, आपल्या घरावरील प्रेम कमी झाले नाही. एस .एस. सी नंतर वडिलांनी लावलेला नोकरीचा तगादा, आई-वडिलांची रोजची भांडणे, आजारी बहीण, रोडकी भावंडे, आणि त्यातच दरवर्षी हालणारा आईचा पाळणा या सर्व गोष्टींनी ते त्रासलेलेच असत. हेडमास्तर काही वेगळा मार्ग दाखवतील ही आशा. पण तेथे निराशाच पदरी आली. नोकरी करून पुढील शिक्षण घ्यायची इच्छा होती. त्या दृष्टीने ते कोल्हापूरला गेले, पण कोणीच नोकरीसाठी मदत केली नाही. भूदान चळवळीत यादव शिरले ते केवळ आपले घरचे दारिद्र्य नाहीसे होईल या आशेने. पण त्यातील अनुभवांनी त्यांना या चळवळीतील उथळपणा जाणवला.



अनुक्रमणिका






रत्नागिरीच्या छात्रालयात विद्यार्थी त्यांची व त्यांच्या बोलण्याची थट्टा उडवत. शिक्षणाबरोबर आपण भोगलेल्या हालअपेष्टांचे वर्णन शब्दांकित करणाऱ्या कविता लिहू लागले. या कवितेतील आईची विलक्षण ओढ आणि भाषेचा गोडवा सुनीता-पु. ल. देशपांडे यांना फार आवडला, आणि तेव्हापासूनच ह्या दोघांनी यादवांना सर्व प्रकारे मदत केली. 'हिरवे जग' हे काव्याचे पुस्तकही पुढे प्रसिद्ध झाले. पु.लं.च्या शिफारसीने यादवांच्या काही ग्रामीण श्रुतिकाही आकाशवाणीवरून प्रसिद्ध झाल्या.

कॉलेजचे पहिले वर्ष झाल्यावर शिक्षणासाठी ते कोल्हापूरला आले. आणि पु.ल. व जे.पी. नाईक यांच्या मदतीने ते इंटर झाले. अडचणींशी टक्कर देत बी. ए. पण झाले. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ जोरात होती. दलित विद्यार्थ्यांत धर्मांतरांची चर्चा सुरू असे. यादवांचा मनातही राजकीय आंदोलने सुरू झाली. त्यातच प्राचार्य खर्डेकर निवडणुकीत पराभूत झाले. उच्च विचारांचा कर्मयोग समाजाने जाणला नाही हे पाहून यादव म्हणतात, "समाजाच्या मनात जेव्हा काही ज्वलंत समस्या नसते, तेव्हा तो बाळासाहेबांसारख्या आदर्श व्यक्तिमत्त्वाला आणि उदात्त नीतिमत्तेला मानतो. पण जेव्हा एखादी निकडीची समस्या धगधगत असते, तेव्हा तो तिच्या तात्कालिक सोडवणुकीला अधिक मानतो." (पृष्ठ १५५)

'शिक्षण कशासाठी घ्यायचं? ते चरितार्थाचं साधन मानायचं की जीवनाचं साध्य मानायचं? शिक्षण घेऊन मोठं व्हायचं म्हणजे नेमकं काय करायचं? शिक्षण घेऊन स्वतःला मोठं करायचं की देशाला मोठं करायचं? खरंखुरं मोठं होण्यासाठी अशा पदव्यांची गरज असते काय?' असे अनेक प्रश्न त्यांना अस्वस्थ करू लागले. (पृष्ठ १८१).

कॉलेज शिक्षण हे पोट भरण्याचेच फक्त साधन नसून ते व्यक्तिमत्त्व विकासाचे माध्यम आहे, याची जाणीव झाली. शिकवण्या, वाचनालयाची जबाबदारी, लेखनिक वगैरेद्वारे अर्थार्जन करून यादव बी.ए. झाले.

याच काळात यादवांना घरातील समस्यांनी व्यग्र केलं होतं. दरवर्षी येणारे आईचे बाळंतपण, वडिलांचं अल्सरचं दुखणं, बहिणींची आबाळ व त्यांची झालेली मर्जीविरुद्धची लग्नं, भावांची आबाळ, यांनी ते अस्वस्थ झाले. पण ते काही करू शकत नव्हते. कारण ते मिळवत नव्हते. आई-वडिलांच्या मर्जीविरुद्ध ते शिकत होते.

एम.ए. च्या वेळी परत आर्थिक विवंचना होतीच. नोकरीच्या शोधात असताना व्यंकटेश माडगूळकरांनी त्यांना पुणे आकाशवाणीवर ग्रामीण विभागातील नोकरीसाठी बोलावले. ते रुजूही झाले. एम.ए. चा अभ्यासही सुरू होताच. त्यांच्या 'हिरवे जग' या काव्यसंग्रहाला राज्य सरकारचे बक्षीस मिळाले. माडगूळकर ग्रामीण कार्यक्रमांच्या अभ्यासासाठी आकाशवाणीतर्फे ऑस्ट्रेलियाला गेल्यावर यादवांविरुद्ध आकाशवाणीवर हेवेदावे सुरू झाले. याचा त्यांना विलक्षण त्रास झाला. त्यांनी राजीनामा दिला. पण जिद्दीने ते एम.ए. द्वितीय श्रेणीत उत्तीर्ण झाले, आणि पंढरपूरच्या महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून रुजू झाले.



अनुक्रमणिका







नांगरणी पूर्ण वाचल्यावरही ते कुठेतरी अपूर्ण वाटतं. ज्या यादवांना आई-वडिलांच्या काळजीने, बहीण-भावांच्या आठवणीने, अहोरात्र बेचैन केले होते, त्यांच्यासाठी त्यांनी काय केले? आई-वडील सुखी झाले का? भाऊ पदवीधर झाले का? 'झोंबी' पाल्हाळिक वाटलं. 'नांगरणी' मात्र गतिमान वाटते. मनाची पकड घेते. यादवांनी ज्या कष्टानं, ज्या ज़िद्दीनं आपलं ध्येय साध्य केलं ते निश्चितच कौतुकास्पद आहे.

(नांगरणी— डॉ. आनंद यादव, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे ३६०. शंभर रुपये)

(सौ. मीना विजयकुमार पटवर्धन, कागवाड ५९१२२३ ता. अथणी, बेळगाव)

## माझी कॅन्सर यात्रा : सौ.संगीता वझे

### दुर्दम्य इच्छाशक्ती, वैद्यकीय उपचार आणि असीम श्रद्धा

**सौ. शुभा शशांक साठे**

'माझी कॅन्सरयात्रा' हे सौ.संगीता वझे यांचे आत्मकथन. खरे तर आपल्या २३/२४ वर्षांच्या आयुष्यात कथन करण्यासारखे विशेष काही नसतेच. परंतु नेमक्या याच कालावधीत लेखिकेला कॅन्सर झाला, आणि आयुष्य एका वेगळ्याच वाटेवरून मार्गक्रमण करू लागले. प्रथम श्रेणीत एम.ए, प्राध्यापक म्हणून नेमणूक, आणि प्रेमविवाह. आनंदाच्या अशा शिखरावर असतानाच कर्क रोगाने आपली लक्षणे दाखवायला सुरुवात केली.

१५ ऑक्टोबर १९८७ ला टाटा हॉस्पिटलच्या पायऱ्या चढण्यापासून ते ९ डिसेंबर १९८८ ला पूर्णपणे मुक्त अवस्थेत पायऱ्या उतरेपर्यंतच्या काळातील आपल्या शारीरिक व मानसिक अवस्थेचे या पुस्तकात लेखिकेने वर्णन केले आहे. दुर्दम्य इच्छाशक्ती, वैद्यकीय उपचार, आणि अविचल श्रद्धा यामुळेच कर्करोगाच्या तावडीतून सुटका झाली. या आत्मकथनात भोगलेल्या हालअपेष्टा, दु:ख, वेदना यांचे तपशील सांगण्याचा उद्देश नाही, तर कॅन्सर झालेला पेशंट देखील पूर्ण बरा होतो हे लोकांना कळावे म्हणून हा लेखन प्रपंच आहे.

पुस्तक वाचताना सतत डोळे पाणावत राहतात, असह्य होऊन आपण अधूनमधून पुस्तक बाजूला ठेवतो. वाचताना आपली ही गत, तर प्रत्यक्ष लेखिकेची या सर्व औषधोपचाराच्या चक्रातून जाताना काय गत झाली असेल? हे अनुभव वाचताना आपले अंग शहारून येते. घरातील मंडळी, जीवापाड प्रेम करणारा नवरा, सासू-सासरे आणि इतर स्नेहीमंडळी— सर्वांच्याच मनोवस्थेचे प्रभावी चित्रण यात आले आहे. या कथनाला पार्श्वभूमी लाभली आहे ती लेखिकेच्या श्रीरामावरील भक्तीची!

एकीकडे लेखिकेचा आत्मविश्वास कणाकणांनी कमी होत होता, दुसरीकडे पतीच्या,



अनुक्रमणिका








डॉ.पानसे यांच्या आणि घरातील सर्व मंडळींच्या आधाराने आणि श्रीरामावरील श्रद्धेने हा कोमेजू पाहणारा आत्मविश्वास पुन्हा कसा मूळ धरत होता- याचा आलेख मन हेलावून टाकतो. काही प्रसंगी परमेश्वराची कठोरता, निष्ठुरता आणि काही प्रसंगी त्यानेच योजलेले योगायोग यांच्यात हेलकावे घेणारे लेखिकेचे मन शेवटी परमेश्वरचरणीच लीन होत राहते. आशा-निराशेचा, ऊन-सावल्यांचा खेळ सतत चालू असला तरी लेखिकेची विवेकशक्ती किंचितही ढासळल्याचे दिसत नाही. प्रत्येक प्रसंगातून, घटनांतून तिचे मन काही संगती शोधत होते, स्वतःच मनाला उभारी देऊ पाहत होते. मनाच्या या विलक्षण अवस्थेचे चित्रण कसलाही आडपडदा न ठेवता केले आहे.

आजारपण संपल्यावर खरे तर आपल्याला कॅन्सर झाला होता हे लेखिकेला पूर्णपणे विसरून जायचे होते. त्याची आठवण सुद्धा नको वाटत होती. पण 'सामाजिक ऋणाच्या जाणिवेने' इतर रुग्णांना, त्यांच्या नातेवाईकांना आधार मिळावा, आणि कॅन्सर या रोगाला कुणीही घाबरू नये; केमोथेरपी, रेडिएशन, ऑपरेशन यांसारख्या अत्याधुनिक सोयींमुळे कॅन्सरचे निदान वेळीच झाले तर कुणीही बरा होऊ शकतो, हे दाखवण्यासाठी हे लेखन झाले. निराश जीवांना आशेचा किरण दिसावा; आपण नव्या उमेदीने आयुष्य जगू शकू हा आत्मविश्वास जागावा, हाच या कथनाचा उद्देश ! तो नक्कीच सफल होईल.

(माझी कॅन्सरयात्रा, सौ. संगीता वझे, आरती प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे १३६, चाळीस रुपये.)

(सौ. शुभा शशांक साठे, के. टी. पी. एस्. वसाहत, ६/१९/११३, कोराडी (नागपूर), ४४१ १११.)

---

## अनुदिनी अनुतापे : श्रीरंग विष्णू जोशी

### वयात येतानाच्या कोवळया लुसलुशीत आठवणी

नीना मेस्त्री

'अनुदिनी अनुतापे' ही स्मरणसाखळी कुटुंबातल्या आणि भोवतालच्या माणसांच्या नातेसंबंधाची ओळख पटवून देते. थोरली आई हे लेखकाचे अपूर्व श्रद्धास्थान. थोरल्या आईच्या नसतेपणातले व्यापून उरणारे असतेपण आणि त्यामागची व्याकुळता 'रसील्या नजरेने पापणीत उदंड कुतुहल घेऊन स्वप्ने खेळविण्याच्या तरुण वयातच मरणवाटेवरचे अटळ सरण तिच्या नशिबी आले. आपल्या आठवणींची आणि आसक्तीची कोणतीच खूण मागे न ठेवता ती अंतर्धान पावली' अशा काळीज चिणवून टाकणाऱ्या शब्दात प्रकट होते. तिचे अस्तित्व वस्तूवस्तूतून साकारले आहे तर जन्माला आलेल्या छोट्या पुतणीला थोरली आई मानून हा आदर अधिकच दुणावला आहे. 'अंतरंगात बदलत राहणाऱ्या उतरणीवरच्या ऋतूंना तू साक्षीदार आहेस, याचा केवढा धीर वाटतो बघ.' अशी कृतज्ञ साथ लेखकाने










सदैव संगती ठेवली आहे. अशीच हृदयस्थ श्रद्धा वडील, ताई, भाऊ, वहीण, आजोबा, आजी, मास्तर, वहिनी यांच्यावरच्या प्रेमाने व्यक्त झाली आहे. कुटुंबाचा सारा भार सोशिकपणाने पेलताना हळूहळू मोठ्या होत असलेल्या लेखकाच्या व्यक्तित्वविकासात जातीने लक्ष घालणारी ताईः लेखकाला त्याच्या दुबळेपणात तिने सदैव पाठीशी घातले आहे. हे अनेक प्रसंगांतून जाणवते. असे ताईवरचे अपार प्रेम, करुणाष्टकांच्या आवाजातून थरारणारी आत्याबाईची उत्कट आठवण, शाळा, कवितेची आस, शास्त्रीबुवा यांच्या निर्लेप आधारावर पोसलेले आयुष्य पुढे सरकत जाते. आजोळचे प्रेम जितक्या मुकेपणाने प्रकट होते, तितकीच मेलेल्या नवजात अर्भकाबद्दलची निष्पाप जाणीव अबोलपणाने व्यक्त होते.

लेखकाचे बालपण ते प्रौढावस्थेपर्यंतचा काळ यातल्या लेखांत प्रकट झाला आहे. वडील गांधीवादी. त्यामुळे गांधीवादी विचारसरणीचा पगडा असलेल्या कुटुंबात वाढलेल्या लेखकाचे संस्कारही तितकेच शिस्तीचे, धार्मिकतेचे, शुद्ध आचरणाचे ! हे संस्कार लेखकाने पुढे आयुष्यभर जतन करून ठेवले. मध्यमवर्गीय ब्राह्मणी संस्कृतीने घडविलेले लेखकाचे मन बालपणच्या त्या काळात भिरभिरत राहते तेव्हा अनेक घटनांना नव्याने पालवी फुटते. यातूनच गांधीहत्येच्या वणव्यात कातरभयाने होरपळून गेलेले कुटुंब समोर येते. 'मातृभूमी नावाची कुणी परवशतेते जखडलेली हतभागी स्त्री आहे– तिच्यासाठी आपण काहीतरी केलं पाहिजे ही भावना पेटत्या निखाऱ्यासारखी मनात फुलत राही' अशी जाणही रुजते. दारिद्र्याची उपसणी, शिक्षणाची आस आणि त्यासाठीची अनवाणी वणवण यातून आलेली घटितेही संयमाने प्रकट झाली आहेत. विहिरीचा कोरडा उत्सव, व्यापारातली मंदी, पडीक जमिनीचे दुःख, गमावलेली म्हैस अशा भोगवट्यातून वाट्याला आलेले अनुभव. हा ताणही कुठे आक्रस्ताळेपणाने प्रकट झालेला नाही. यातच शाळेचे बागडते दिवस गुरुजनांच्या आदरासह आणि कवितेवरच्या हळव्या प्रेमासह पुढे येतात.

या प्रवासात कधी शाळेत, कधी घरात, कधी आईच्या करुणाष्टकांत तर कधी वाटेवर भेटलेल्या अवलियाच्या मुखातून जीवनविषयक विचारांचे अंकुर लेखकाच्या मनात मूळ धरतात.

या लेखनातील लेखकाची शारीरिक आणि मानसिक हुरहुर कोवळ्या प्रणयरंगात न्हाऊन निघाली आहे. आकर्षणाच्या थरथरत्या दिवसांच्या साक्षीदार म्हणून उभ्या राहतात त्या तांबडगुल्ली, माणकी, तंगाक्का, जनी.

एका ब्राम्हणाच्या कुटुंबाची ही कहाणी सामाजिकतेचे दर्शन घडवते. दारिद्र्य हे केवळ दलितांनाच भोगावे लागते असे नाही, तर तथाकथित उच्चवर्णीयांनाही त्याची झळ लागते. हालअपेष्टा आणि कष्ट, अभाव आणि ओढगस्त याबरोबर अनेक कटू अनुभवांना तोंड द्यावे लागते. हातची गेलेली जमीन; उभारीने सुरू केलेल्या कापड धंद्यात आलेले अपयश; दागिन्यांच्यावर चाललेला उदरनिर्वाह; फसवणुकीत गेलेली म्हैस या घटना ब्राम्हणांच्याही वाट्याला आलेल्या भोगवट्याचे दर्शन घडवतात. गांधीवधाच्या खाईत सापडलेले











भयचकित अबोल कुटुंब संपूर्ण गावाच्या पडद्यावर गडद होऊन साकारते. एक सामाजिक खंत अगतिकपणे प्रकट करते.

या लेखनातून अंतरंगातली स्पंदने निसर्गाच्या सोबतीने थरारताना दिसतात. दाटून येणाऱ्या तर कधी उन्मादून शहारणाऱ्या गहिऱ्या निळ्या क्षणांना निसर्गाची उत्फुल्ल साक्ष मिळते. 'माळरानावरील कडोसवारा, गवताचा प्रसन्न वास, डोलणारी पिके व ज्वारीच्या कणसांवरून ओघळणारे चांदणे यांच्या सोबतीने झपझप पावले टाकीत मी निघालो...' अशी काव्यात्म भाषा ही या पुस्तकाची एक जमेची बाजू.

'आईच्या कविता'नंतरचे हे आत्मकथन क्षितिजाला नव्याने गवसणी घालणारे आहे. कोवळ्या लुसलुशीत आठवणींना इथे एक समंजस दिठी मिळाली आहे. गतकालाचे साजरेगोजरे लाघव पानापानांवर रांगोळीच्या गडद ठिपक्यांसारखे साकारले आहे.

(अनुदिनी अनुतापे : श्रीरंग विष्णू जोशी, सांगली, पृष्ठे १७६, साठ रुपये)
(नीना मेस्त्री, प्लॉट ९, सांगली-कोल्हापूर रस्ता, सांगली ४१६४१६)

---

७. **आज्ञार्थी गीता**– डॉ. व. दि. कुलकर्णी, प्रबोधन रिसर्च, १७ केजीवी निवास, मुंबई-४, पृष्ठ– ७२, पंधरा रुपये.

८. **मुसाफिरनामा (प्रवास)** – यदुनाथ थत्ते, प्रतिमा प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे– १६४, साठ रुपये.

९. **जेथे जातो तेथे (विनोदी)** – सुभाष भेंडे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे– १८२, साठ रुपये.

### समीक्षा

१. **साहित्यसौरभ**– मधुकर जावडेकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे– १७६, साठ रुपये.

२. **चैत्य**– गंगाधर पानतावणे, प्रतिमा प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे–१३४, पंचेचाळीस रुपये.

३. **साहित्य : देय आणि श्रेय**– प्रा. केशव सद्रे, राजहंस वितरण, पणजी, पृष्ठे १७९, सतर रुपये.

४. **गो. म. कुलकर्णी यांची समीक्षा**– डॉ. रत्नाकर मंचरकर, प्रा. टापरे, स्नेहबंध, प्राध्यापक कॉलनी, वाई, पृष्ठे– १४३, बेचाळीस रुपये.

५. **काही नाटके काही नाटककार**– शुभदा शेळके, शलाका प्रकाशन, मुंबई-५१, पृष्ठे– ७२, अठरा रुपये.

### काव्य

१. **ज्ञानेश्वरांचा पोवाडा**– सुलभा रामचंद्र उपाध्ये. जोशी, ४१२, शुक्रवार पेठ, पुणे-२, पृष्ठे– २६, साडेतीन रुपये.

२. **सावरकर गौरव गान**– मंगला पेठे, १३, आनंदाश्रम, नौपाडा, ठाणे, पृष्ठे– ६४, वीस रुपये.

३. **शिवांगी**– नागनाथ हेगे, चेतश्री प्रकाशन, अमळनेर, पृष्ठे– ६४, तीस रुपये.

४. **अंतरीचे दिवे**– शोभना चांदूरकर, ज्ञानेश प्रकाशन, नागपूर-२२, पृष्ठे– ६०, वीस रुपये.



अनुक्रमणिका

# पं. जवाहरलाल नेहरू : अरविंद ताटके

## ४५० उताऱ्यांतून घडवलेले नेहरू दर्शन

म. श्री. दीक्षित

अरविंद ताटके यांनी लिहिलेल्या पं. जवाहरलाल नेहरू या पुस्तकाच्या डेमी ५१२ पृष्ठांची विभागणी अशी आहे:- पृ.१ ते २२ मध्ये अर्पणपत्रिका, अनुक्रमणिका भूमिका आणि 'युगान्त' नामक नेहरू निधनावरील चरित्रकथेची पार्श्वभूमी सांगितली आहे. प्रत्यक्ष चरित्र ३४ लहान-मोठ्या प्रकरणांचे आणि ४६० पृष्ठांचे असून ते तीन पर्वांत विभागले आहे. (१९८९-१९१७, १८-४७ आणि ४७-६४) इंग्रजी-मराठी संदर्भ साहित्य, नेहरूकृत ग्रंथसंपदा, नेहरूंचा जीवनपट आणि सूची यांनी २६ पृष्ठे व्यापलेली आहेत. नेहरू चित्रावली हे ग्रथांचे एक आकर्षण आहे. तथापि चित्रे देताना कालानुक्रमाकडे झालेले दुर्लक्ष खटकल्यावाचून राहत नाही.

'शिवधनुष्य'या प्रास्ताविकात ताटके यांनी या पुस्तकाची वैशिष्ट्ये आणि मर्यादा प्रांजळपणे नमूद केल्या आहेत. मोठे चरित्र हा त्यांचा पहिला हेतू. हे चरित्र इतर चरित्रांसारखे राजकीय नसून 'विशाल व्यक्तिदर्शनात्मक' आहे. नेहरू माणूस म्हणून कसे आहेत हे दाखवणे हा दुसरा- पण मुख्य हेतू आहे असे म्हटले आहे.

पंतप्रधान नेहरू म्हणून सतरा वर्षांच्या कारकीर्दीसंबंधी सविस्तर लिहिण्याचा मोह आपण टाळला असून नेहरूंचे प्रमाद दाखवण्यावर भर आहे असेही म्हटले आहे. पण हे म्हणणे बरोबर नाही. पंतप्रधान नेहरूंवर केंद्रित झालेलं पर्व (१९४७-६४) हे ११० पृष्ठांचे प्रकरण पुस्तकात आहे. तसे ते लिहिले हे योग्य झाले असून त्यामुळे या चरित्राला पूर्णता आलेली आहे. नेहरूंसारख्या असामान्य नेत्याची योग्यता कोणत्या दृष्टीतून व कशी पारखायची याबाबत भिन्न भूमिका असू शकते. ताटके यांचा भर मुख्यतः नेहरूंमधील कौटुंबिक गृहस्थ, रसिक, विद्याव्यासंगी थोर मनाचा माणूस रंगवण्यावर आहे. ते सर्वसामान्य वाचकाला आकर्षून घेईल, यात शंका नाही.

आईवडिलांविषयी भक्ती बाळगणारा पुत्र, पत्नीवर अथांग प्रेम करणारा पती, दोघा भगिनींवर पित्यासमान प्रेम करणारा बंधू, एकुलत्या एक कन्येची उदार हृदयाने जडणघडण करणारा पिता, गांधीजींच्या प्रशंसेला सदैव पात्र ठरलेला शिष्योतम, नोकर-चाकरांपासून ते सामान्य जनतेपर्यंत सर्वांची काळजी वाहणारा लोकनेता, ग्रंथप्रेमी, लेखक आणि पत्रलेखनाची उदंड हौस असणारा प्रेमळ-रसिक चिंतनशील गृहस्थाश्रमी- अशा विविध रूपांत नेहरू उभे केले आहेत.

लेखकाने चरित्रलेखनाचं एक आगळं-वेगळं तंत्र वापरलं आहे. नानासाहेब गोरे यांनी



अनुक्रमणिका






अनुवादित केलेले नेहरूंचे आत्मचरित्र, नेहरूकृत ग्रंथ, आचार्य जावडेकर यांचे 'आधुनिक भारत', कृष्णा हाथीसिंगची आत्मपर पुस्तके, गांधीजींची पत्रे, खुद्द पंडितजींची निवदने, भाषणे आणि पत्रे, गोविंद तळवलकर, माधव गडकरी यांच्यासारख्यांची मतं इ. साधनांमधील शेकडो-लहान-मोठ्या उताऱ्यांचा वापर करून ह्या चरित्र-कहाणीचा प्रवाह खळखळत ठेवला गेला आहे. चरित्र साधार व्हावे नि त्याला उठाव यावा यासाठी उतारे देण्याचा शिरस्ता असतो. ताटके यांनी नेहरू चरित्रात साडेचारशेच्या वर उतारे देऊन, उताऱ्यांमधून चरित्रलेखन असे एक नवेच तंत्र वापरले आहे. पंडितजींचे विविधरंगी विशाल व्यक्तिमत्त्व वाचकांच्या मनी ठसावे, म्हणून या उताऱ्यांचा कौशल्याने उपयोग केला आहे. त्यामुळे ही चरित्रकहाणी ओघवती उतरली आहे. चरित्रलेखनाच्या मूळ भूमिकेला पूरक ठरतील असे उतारे निवडणे, आणि त्यांचा योग्य त्या प्रसंगी वापर करून चरित्रनायकांच्या मोठेपणाचा ठसा उमटवणे हे कार्य त्यामुळे निश्चित साधणार आहे. संदर्भ म्हणूनही या उताऱ्यांचा उपयोग होण्यासारखा आहे.

आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे या चरित्रात भेटणारी नेहरूंच्या निकट सहवासातील व्यक्तींची शब्दचित्रे जशी कौटुंबिक, तशीच राजकीय. उदा. वडील मोतीलाल, आई स्वरूपराणी, कृष्णा हाथीसिंग आणि विजयालक्ष्मी या भगिनी, पत्नी कमला, कन्या इंदिरा इ. घरची माणसे; तर गांधीजी, डॉ. महमूद, लाला लजपतराय, चित्तरंजन दास, मौ. आझाद, रवींद्रनाथ, सुभाषचंद्र, चर्चिल माऊंटबॅटन पति-पत्नी इ. राजकीय क्षेत्रातली माणसे. कमला नेहरू आणि लेडी माऊंटबॅटन या दोघींविषयी ताटके यांनी विशेष जिव्हाळ्याने लिहिलेले आहे. पत्नीचा जीवघेणा आजार, रणजित पंडित आणि फिरोज गांधी यांचे मृत्यू, राजीवचा जन्म, मावशी बिबिअम्माचं अकल्पित जाणं इ. प्रसंग करुणोदात्त उतरले आहेत. नेहरू आणि स्त्रिया नामक (पृ.४३६-३७) मजकूर वादग्रस्त असला तरी वाचनीय आहे.

देशाची फाळणी, काश्मीर प्रश्न यूनोत नेणं, चिनी आक्रमण या तीन प्रश्नांत्राबत लेखकाने नेहरूंवर कडक टीका केली आहे. पण ती शेरेमारीवजा वाटते किंवा नेहरूविरोधी वाचकांनाही संतुष्ट ठेवण्याची ती क्लृप्ती वाटते. टिळक, गांधी, सावरकर या महापुरुषांच्या संदर्भात नेहरूंचे अधूनमधून तुलनात्मक मोजमाप करणेही उचित वाटत नाही. काँग्रेसप्रेमी आणि हिंदुत्ववादी अशा सर्व वाचकांना पुस्तक आवडावे अशी चतुराई उपयोजिण्याचं वास्तविक कारण नव्हते. कारण लेखकाला अभिप्रेत होते, नेहरूंमधील 'माणूस' किंवहुना महामानव शोधणे. आगळंवेगळं तंत्र वापरून लिहिलेल्या या चरित्रामुळे हे काम यशस्वी झाले आहे.

**(पं. जवाहरलाल नेहरू : अरविंद ताटके, सरिता प्रकाशन, पुणे १६ पृष्ठे ५१२. दीडशे रुपये.)**

**(म. श्री. दीक्षित, सदाशिव पेठ, पुणे ३०)**



अनुक्रमणिका







# सालिम अली : वीणा गवाणकर

## एका ऋषितुल्य विहगमित्राची जीवनकथा

डॉ. हे. वि. इनामदार

'आपले सारे आयुष्य पक्ष्यांच्या रंगभऱ्या, सुंदर विश्वावर उधळून देणाऱ्या ऋषितुल्य पक्षी-तज्ज्ञाची' ही जीवन-कथा आहे. इ.स. १८९६ ते १९८७ असे एक्क्याण्णव वर्षांचे दीर्घायुष्य सालिम अली यांना लाभले.

'दि फॉल ऑफ अ स्पॅरो' हे अलींचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे. तरीपण नवीन असे काही लिहावे, या इराद्याने वीणा गवाणकर यांनी इतर साधनसामग्रीचा शोध घेतला. सालिम अलींच्या आठवणी, चित्रफिती, रोजनिशी, मुलाखती, पत्रव्यवहार, वृत्तपत्रीय लेखांची कात्रणे, जुनी जर्नल्स, फिल्म्स् व छायाचित्रे यांचा वापर केला.

डॉ. सालिम अली हे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे पक्षी-तज्ज्ञ होते, हे सर्वांना माहीत आहे. प्रकाश गोळे, प्रवीण काटवी, सलील घोष, एकनाथ पाटील, अमीर अली, मुकुंद डोळे, प्रभाकर सोमण, उल्हास राणे, विजयकुमार आंबेडकर असा पक्षीविज्ञान-क्षेत्रातला, अलींचा शिष्यपरिवार मोठा आहे, याचीही थोडीफार कल्पना आपल्याला आहे. पण अलींना पक्षी-जगताचे आकर्षण कशामुळे वाटू लागले, या छंदातून त्यांचा अभ्यास व अभ्यासातून व्यासंग कसा वाढत गेला, नानाविध अडचणींना त्यांनी कसे तोंड दिले; आणि विहगविलोकनाचे हे वेड त्यांच्या आयुष्यभराचे मिशन कसे होऊन गेले, याचा आलेख वीणाताईंनी या पुस्तकात रेखाटला आहे. सालिम अलींना त्यांच्या पत्नीने– तेहमिना लतीफने मोठी साथ दिली. तिच्या सहकार्याचा मार्मिक तपशील जरूर तेथे देऊन लेखिकेने तिला न्याय दिला आहे.

एका मुलाखतकाराला दिलेल्या उत्तरात अलींनी आपल्या या मुलखावेगळ्या ध्येयजीवनाचे मर्म सांगितले आहे: 'आपल्या जे मनात आहे, ते पूर्ण करून घेण्याची संधी लाभणं दुर्लभच! ऐहिक लाभाची शक्यता नसूनही काही अर्थपूर्ण कामगिरी पार पाडल्यामुळे जे निष्पन्न होतं, ते मोलाचं असतं. मला निसर्गाचं नि पक्ष्यांचं वेड आहे. या शास्त्रात मी अल्पशी का होईना, भर टाकू शकलो, त्यामुळे मी कृतार्थ आहे. आपल्या आवडत्या क्षेत्रात काम करायला मिळाल्यानं होणारा आनंद जीवनाला उभारी देणारा असतो,' अलींचे हे निवेदन त्यांच्या जीवनाच्या साफल्याचे रहस्यच स्पष्ट करते.

लोकमान्यता व राजमान्यता या दोन्ही माध्यमांतून सालिम अलींच्या संशोधनाचे चीज झाले. भारतीय पक्षी-विज्ञानातील कामगिरीसाठी त्यांना पद्मभूषण हा किताब मिळाला. विद्यापीठाची डॉक्टरेट लाभली. टागोर सुवर्णपदक, नॅशनल ॲवार्ड, राज्यसभेवर नियुक्ती



अनुक्रमणिका








असे अनेक सन्मान त्यांना लाभले.

लेखिकेने या छंदोमय आयुष्याचे सुरेख चित्रण केले आहे. उदाहरणार्थ– 'दोन वर्षे नोकरी झाल्यावर सालिममधला पक्षी टोचा मारू लागला; पिंजऱ्यातून बाहेर पडण्यासाठी फडफडू लागला,'

'पंखवाल्या पक्ष्यांचा मागोवा बिनपंखवाल्या माणसाने घ्यायचा म्हणजे सोपी गोष्ट नव्हे.'

वीणाताईंचे निवेदनकौशल्य अनेक ठिकाणी उठून दिसते. आरंभ आकर्षक आहे. दूरदर्शनसाठी अलींच्या जीवनाचे चित्रीकरण व्हायचे होते. त्याची जागा व तारीख ठरली, पण कोर्सर हा दुर्मिळ पक्षी खुष्कीच्या मार्गाने आल्याचे त्यांना समजले. तिकडे जाऊन तो पक्षी त्यांनी मिळवला; पण इकडे दूरदर्शनचे चित्रीकरण 'दूर' राहिले. एका व्यासंगी शास्त्रज्ञाची जीवनकथा आपण वाचणार आहोत, याची कल्पना पहिल्याच पानावर येते. 'चिमण-पारधी', 'वीण-वस्ती', 'पीतकंठी-चिमणा', किंवा 'आयुष्याची आनंदयात्रा' असे समर्पक व सुंदर शब्दप्रयोग सहजपणे येतात.

या पुस्तकातली ही बलस्थाने निश्चितच स्वागतार्ह आहेत. पण त्यातली काही शबलस्थानेही खटकण्याजोगी आहेत. हे पुस्तक तयार करण्यासाठी बरीच साधन-सामग्री गोळा केली. पस्तीस व्यक्तींशी त्यांनी चर्चा केली. पण डोंगर पोखरून उंदीर निघावा, तसा काहीसा प्रकार झाला आहे.

'मृत्यूनंतर तुम्हाला विस्मृत व्हायचं नसेल, तर वाचण्यासारखं काही लिहा; किंवा तुमच्यावर काही लिहावं, असं करून दाखवा,' हे बेंजामिन फ्रँकलिनचे वचन उद्‌धृत करून सालिम अलींनी दोन्ही केलं असे लेखिका सांगते. या पार्श्वभूमीवर पुस्तकात जे लिहिलेले आहे ते मात्र तसे फार थोडे आहे. पुस्तकाचा मधला म्हणजे गाभ्याचा भाग निवेदनवजा झाला आहे. आपल्या हाती आलेले संदर्भ-साहित्य पाहून एखादा अहवाल तयार करावा असा प्रकार घडला आहे.

धर्मिक (पृ.३), कथीत (पृ.१३), पसीशास्त्र (पृ.२१), सर्वेक्षेण (पृ.२२), मिमांसा (पृ.३५) असे विपुल मुद्रणदोष या शंभर पानी पुस्तकात झाले आहेत. अनेक ठिकाणी पुनरुक्तीही आहे.

–या त्रुटींची कसर चारुहास पंडितांच्या सुंदर चित्रसजावटीने भरून काढली आहे. पुस्तकाच्या विषयाला साजेल असे पक्ष्यांचे रेखाचित्र सादर करण्यात त्यांचा कुंचला कुशल आहे. अशा सुरेख चित्रांची पखरण झाडांवरच्या पक्ष्याप्रमाणे पुस्तकाच्या पानोपानी त्यांनी केली आहे.

झाडाखाली टेबल-खुर्ची मांडून सालिम अली बसले आहेत. अनेक जातीचे पक्षी रांगेने त्यांच्याकडे निघाले आहेत; व 'अलींकडे नोंदणी करताना ओळखपत्र लागत नाही' असा आनंद त्यांनी व्यक्त केला आहे. (पृ.१८)

दुसरे चित्र पृ॰ १२ वर आले आहे. सुगरण पक्ष्यांच्या घरट्यांजवळच्या फांदीवर सालिम अलींनी आपला मंच बांधला आहे. तिथून ते सुगरणींचे निरीक्षण करत आहेत. ते पाहून, 'आता गुपित म्हणून काही उरणार नाही' अशी खंत त्या पक्ष्याने व्यक्त केली आहे. पृ॰ २३ वर असेच एक सूचक चित्र काढलेले आहे. पक्ष्यांचा शोध घेण्याच्या मोहिमेवर सालिम अली आपला मोठा ताफा घेऊन निघाले आहेत. ते बघून, 'मनुष्यवस्तीचा माग काढण्यासाठी आपल्याला असा खटाटोप करावा लागत नाही, म्हणून बरं !', असे उद्‌गार डहाळीवरच्या एका पक्ष्याने आपल्या जोडीदाराजवळ काढले आहेत.

मुखपृष्ठाचे कौतुक करावे तितके थोडे होईल. हिरव्याकंच डहाळीवर पक्ष्याचे धड असलेले आणि मानवी मुख लाभलेले आणि दोन्ही पंखात दुर्बीण धरणारे सालिम अली प्रसन्न व स्नेहशील मुद्रेने निसर्ग न्याहाळत आहेत. ही कल्पना सुंदर आहे. एकूण ग्रंथ निका झाला असे.

(डॉ. सालिम अली : वीणा गवाणकर, राजहंस प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १००. तीस रुपये.)

(डॉ. हे. वि. इनामदार, संतोष, भारती निवास कॉलनी, ६०/१५ एरंडवणे, पुणे ४.)

---

## छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ : डॉ. जयसिंगराव पवार

### वादग्रस्त व्यक्तिमत्त्वाचा शोध

प्रा. नंदकुमार भगत

१९९० हे संभाजीच्या ३०० व्या पुण्यतिथीचे वर्ष. त्यामुळे संभाजीच्या कर्तृत्वाचा व व्यक्तित्वाचा सर्वांगीण मागोवा घेण्याचा प्रयत्न शिवाजी विद्यापीठातील इतिहासाचे प्राध्यापक डॉ. जयसिंग पवार यांनी संपादित ग्रंथाद्वारे केला आहे.

पराक्रमी, साम्राज्यसंस्थापक शिवाजीचा संभाजी हा पुत्र नादान, व्यसनी, बेमुर्वतखोर कसा बनला ? (का बनवला गेला ?). त्याचे अधःपतन खरोखरच झाले होते का ? या प्रश्नांचा विचार करून व संभाजीचे नेमके स्वरूप कसे होते, ते स्पष्ट करण्यासाठी ऐतिहासिक तसेच साहित्यिक अशा दोनही पातळीवरचे लेख या ग्रंथात घेतले आहेत.

या ग्रंथाला जोडलेली विवेचनात्मक प्रस्तावना महत्त्वाची मानावी लागेल. विचारवंतांचा संभाजीकडे पाहण्याचा दृष्टिकोन, संभाजीचे चरित्र दूषित होण्याची कारणे, आद्य इतिहासकारांनी रंगवलेला संभाजी, 'मराठी बखरीतील संभाजी दर्शन' हे या प्रस्तावनेतील महत्त्वाचे मुद्दे आहेत. संभाजीची व्यक्तिरेखा वादग्रस्त होण्यास कारणीभूत झालेल्या मतांचा परामर्श घेतला आहे. बखरीतील लेखनामुळे संभाजीचे व्यक्तिमत्त्व कलंकित होण्यास मदत झाली असे पवारांना वाटते.



अनुक्रमणिका

संभाजीच्या कर्तृत्वाची जाणीव करून देणारे मुस्लिम इतिहासकारांचे लेख लक्षवेधक आहेत. खाफीखान, साकी मुस्तैदखान, ईश्वरदास नागर यांच्या लेखातून संभाजीला कैद झाल्यापासून औरंगजेबाने केलेला त्याचा वध, त्या वेळची संभाजीची वागणूक याचे अत्यंत बारकाईने चित्रण आलेले आहे. या लेखांबरोबरच विजय देशमुख यांचा 'असा लढला शंभूराजाचा किल्ले रामसेन' हा लेख अनामिक किल्लेदाराच्या पराक्रमाचे स्वरूप आपणांपुढे स्पष्ट करून जातो. तर 'संभाजीची गोव्यावरील स्वारी' हा डॉ. पिसुर्लेकर यांचा लेखही संभाजीच्या लढाऊ वृत्तीचे स्वरूप आपणांपुढे स्पष्ट करतो. डॉ. मोरे यांचा, "कविकलशाच्या चारित्र्याच्या वास्तवाचा शोध' हा लेखही महत्त्वाचा. कारण संभाजीच्या जीवनात मित्र म्हणून कविकलशाला महत्वाचे स्थान आहे. आजपर्यंत त्याचे वेगळे व्यक्तित्त्व चित्रित झालेले नाही. ते डॉ. मोरे यांच्या लेखात आढळते. याबरोबरच 'छत्रपती संभाजी आणि बादशहा औरंगजेब' हा लेखही उपयुक्त आहे, कारण येथे दोनही व्यक्तिमत्त्वांची तुलना झालेली आहे. अशा अनेक ऐतिहासिक लेखांतून छत्रपती संभाजी महाराजांचे धैर्यशाली व्यक्तित्त्व स्पष्ट झालेले आहे.

ऐतिहासिक लेखांप्रमाणे या ग्रंथातून छत्रपती संभाजी महाराजांबद्दल ललित साहित्यातून जे लेखन झालेले आहे त्याचाही परामर्श घेण्यात आलेला आहे. पराक्रमी छत्रपती म्हणून संभाजी महाराजांवर अनेक कलाकृती निर्माण झाल्या आहेत. त्याबद्दल खुद्द डॉ. पवार म्हणतात, "गेल्या शंभर वर्षात 'संभाजी' हा विषय ज्वलंतपणे 'जिवंत' ठेवण्यात मराठी साहित्यिकांचा मोठा हातभार लागलेला आहे. संभाजी महाराजांवर ४०-४५ नाटके आजपर्यंत लिहिली गेली आहेत. त्यांचा आढावा डॉ. भीमराव कुलकर्णी यांनी घेतला आहे. 'राजसंन्यास' हे नाटक आत्यंतिक निष्ठा, आत्यंतिक प्रेम, आत्यंतिक द्वेष, यामुळे सारे भावरम्यतेने भरून गेले आहे. 'बेबंदशाही' व 'आग्र्याहून सुटका'ही नाटके परंपरेचे अनुकरण करणारी आहेत. प्रा. डॉ. सौ. शालिनी मोहोड यांनी 'मराठी साहित्यातील संभाजीराजे' मध्ये प्रारंभीच्या ललित-साहित्यातून प्रतिकूल आणि अलीकडच्या साहित्यातून अनुकूल असे चित्रण येते असे म्हटले आहे. 'जवानमर्द संभाजी' (वि. द. घाटे), राजमस्तकाचा आदेश (पु. भा. भावे), संभाजी: एका राजपुत्राचा आत्मयज्ञ (गो. नी. दांडेकर), संभाजी राजा व गोदावरीची कथा (द. ग. गोडसे) इत्यादी लेखही वाचनीय आहेत. यातच 'संभाजीराजा आणि गोदावरीची लोककथा' हा द.ग. गोडसे यांचा लेखही वाचनीय आहे. विशेषतः लोककथा कशा निर्माण होतात व त्यांना व्यक्तिगत व सामाजिक संदर्भ कसे प्राप्त होतात याचे स्पष्टीकरण प्रभावीपणे केलेले आहे. हिंदीतील मान्यवरांचे संभाजीबद्दलचे विचारही समाविष्ट केले आहेत.

(छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ, डॉ. जयसिंगराव पवार, मंजुश्री प्रकाशन— कोल्हापूर, अडीचशे रुपये.)

(प्रा. नंदकुमार भगत; प.भू. वसंतरावदादा पाटील महाविद्यालय, कवठेमहांकाळ जि. सांगली.)

# श्रीचक्रधर स्वरूपे श्रीकृष्णचि अवतरले : करकीकर

## चक्रधर स्वामी– श्रीकृष्णाचाच अवतार !

शंकर सारडा

महानुभाव पंथाचे प्रवर्तक श्री चक्रधरस्वामी यांच्या लीळांचा एक अभ्यासक प्रल्हाद करकीकर यांनी एका वेगळ्याच दृष्टीतून शोध घेऊन, प्रत्यक्ष श्रीकृष्णानेच चक्रधरांच्या रूपाने पुन्हा अवतार धारण केला असा अंदाज वा निष्कर्ष काढला आहे. हा निष्कर्ष संशोधनाची शिस्त पाळून व पुरावे-संदर्भ-पाठ वगैरे देऊन मांडण्यात आलेला नाही; तो अंतःस्फूर्तीने गवसलेला आहे. श्रद्धेचा भाग त्यात जास्त आहे. महदंबेने चक्रधरांना विचारले, "श्रीकृष्ण चक्रवर्तीसी सोळा सहस्त्रा अंतःपुरा सने आगळिया. आठ पाट मुखिया दाहादाहाकुमर : एकि एकी कुमारी : आणि श्रीकृष्ण बाळ ब्रह्मचारी हे साच जी ?" चक्रधरांनी ते खरे असल्याचे सांगून श्रीकृष्णाची कथा सांगितली. करकीकर यांना वाटतेय की रुक्मिणीदेवीचे 'हे मी आणि गोसावीची जाणो' हे एकान्तातले वचन चक्रधरांनी सांगितले त्याअर्थी पूर्वजन्मी ते कृष्णच असणार ! (पृष्ठे १२)

गोपाळमंत्रही चक्रधरांनी हरिदेव पंडितांना सांगितला इ. कथा त्यांचे श्रीकृष्णत्व साक्षीभूत करणाऱ्या आहेत असे करकीकर मानतात. गोकुळाष्टमीला मातीचे गोपाळ, नंद-यशोदा करण्याची कल्पना कामाइसा व तागाइसा यांच्या मनात आली. तेव्हा चक्रधरांनी म्हटले, "अहो बाई, श्रीकृष्ण काय मातीचे होते ?" आणि सुचवले की "तुम्ही व्हा देवकी अन आम्ही बनू श्रीकृष्ण." (पृष्ठ २०)

प्रतिष्ठान मुक्कामी बाईसाला त्यांनी प्रेमदान केले. बाइसाने स्वतःला चक्रधरांच्या चरणावर समर्पित केले. (पृष्ठ ३१) हरिदेवांनाही त्यांच्या श्रीकृष्णत्वाचा प्रत्यय आला तेव्हा ते म्हणाले, "आमुचे गोसावी साक्षात श्रीकृष्णचक्रवर्ती होती." एका ब्राह्मणाच्या गायी चरायला नेऊन, त्यांना मोकळे खडकावर सोडून केवळ दृष्टीने चक्रधर, तृप्त करीत व त्या रवंथ करीत (पृष्ठ ५८). सारंग पंडितांच्या तीन गाईंनी चक्रधरांची मूर्ती बघून तेथेच ठाण मांडले. चक्रधरांनी त्यावर म्हटले, "जी जी द्वापार युगात श्रीकृष्णमूर्ती बघून त्यांचं मन भरलं नाही, आता ती भूक त्या भागवून घेत आहेत." (पृष्ठे ५८)

आउसादेवींजवळ तर सर्वज्ञांनी आपले श्रीकृष्णत्वच प्रकट केले. (पृष्ठ ६०). 'आता चालता बोलता करचरपवंन असाही साक्षात श्रीकृष्णच तुम्हाला मार्गदर्शन करील. आता साचोकारा कृस्नेया तो तुम्हा वाट साधेल." (पृष्ठे ६२). त्यामुळे तिच्यातील स्त्रीत्वाची भावनाच नाहीशी झाली. तिचे लिंगपरिवर्तन झाले. ती निःसंकोचपणे नग्न नृत्य करू लागली. (पृष्ठे ६३-६४)



अनुक्रमणिका






कविडिभांना चक्रधरांनी त्रिभंग आसनातील श्रीकृष्णाचे दर्शन घडवले (पृष्ठ ७०). चक्रधरांनी घडवलेले श्रीकृष्णचरित्र कथन म्हणजे आत्मकथनच होय.(पृष्ठ ७६).

लीळाचरित्रातील अनेक स्त्रियांच्या कहाण्यांतून चक्रधरांचे हे श्रीकृष्णरूप साकार झाले आहे असे करकीकरांचे मत आहे.

विश्वधर्म प्रबोधिनी ही संस्था एका आडगावी काढून प्रल्हाद करकीकर ज्ञानसाधना करण्याची अवाढव्य योजना आखण्यात मग्न आहेत. ते कौतुकास पात्र आहेत.

(श्रीचक्रधर स्वरूपे साक्षात श्रीकृष्णचि अवतरले. लेखक प्रल्हाद करकीकर, विश्वधर्म प्रबोधिनी, करकी, जि. जळगाव. पृष्ठे ८०. साडेबारा रुपये.)

---

## मर्यादापुरुषोत्तम राम : डॉ. श्री. मा. कुलकर्णी

### श्रीरामाचे वाल्मीकीकृत 'अवतार' चित्रण

डॉ. राजेंद्र डोळके

---

दशरथाच्या अश्वमेध यज्ञापासून राज्याभिषेकापर्यंत २८ प्रसंगांत हे रामचरित्र वर्णिले आहे. रामाचे संपूर्ण चरित्र, चारित्र्य, गौरव, गुणविशेष प्रगट होईल असे महत्त्वाचे प्रसंग आले आहेत. अनावश्यक प्रसंग गाळलेले आहेत. संदर्भासाठी मूळ संस्कृत श्लोक कुठेकुठे दिले आहेत. प्रत्येक घटना देऊन स्वतःचे मत मांडले आहे. मूळ प्रतिपादनाहून वेगळा असा अभिप्रायही व्यक्त केला आहे. गीतेतील श्लोक, ज्ञानेश्वरीतील ओव्या मधे मधे पेरल्या आहेत. व्यक्तींच्या गुणांवर प्रकाश टाकला आहे.

गौतमाने इंद्राला व अहल्येला शाप दिल्यानंतर त्यांचे काय झाले (पृ. ५३ ते ५५) त्याचप्रमाणे विश्वामित्राला ब्रह्मर्षीचे पद कसे प्राप्त झाले (पृ. ५८) वगैरे रामकथेच्या दृष्टीने अनावश्यक असलेला भाग टाळला आहे. विस्तारही नेमक्या त्याच घटनांचा केला आहे. उदा. रावणाने सीतेला पळविल्यानंतर रामाचा विलाप (पृ. १८४, १८५), राम-रावण युद्ध (पृ. २७१ ते २७९), रावणवधानंतर रामाचे व सीतेचे भाषण (पृ. २८७ ते २९२) इ.

जनमानसात रूढ असलेल्या काही समजुतींनाही सौम्य धक्का बसेल असे काही तपशील येथे आहेत. उदा. अहल्योद्धाराची व सीतास्वयंवराची कथा. अहल्येला शाप दिल्यानंतर तिचे रूपांतर शिळेत झाले ह्याला वाल्मीकीरामायणात आधार नाही. त्याचप्रमाणे धनुर्भंगानंतर तात्काळ सीतेने रामाच्या गळयात माळ घातली नाही, हे स्वयंवरही नव्हते असे येथे दाखवून दिले आहे. ह्या पुस्तकात लक्ष्मणरेषेचा साधा उल्लेखही नाही (पृ. १७३) ह्या घटनेचा उल्लेख गाळला आहे की वाल्मीकीरामायणात याला आधार नाही हे स्पष्ट व्हायला हवे होते.









रामचरित्रातील काही वादस्थळे हाताळताना त्यांचा दृष्टिकोन भाविक आहे. परखड चिकित्सेचा नाही. त्यामुळे मतभेदाला वाव आहे.

प्रस्तावनेत 'उत्तरकांड' प्रक्षिप्त असल्याचे मत स्वीकारल्याचे नमूद केले आहे. पण बालकांड हे प्रक्षिप्त मानले जात असूनही स्वीकारले आहे. त्याची कारणे मात्र दिलेली नाहीत.

राम हा अवतार आहे. तसे उल्लेख वाल्मीकीरामायणात आहेत असेही प्रा. श्री. मा. समजतात. 'अनेक ठिकाणी अनेकांच्या मुखाने श्रीरामाचे अवतारित्व वाल्मीकींनी प्रगट केले आहे.' (प्रस्तावना पृष्ठ ६). त्याच्या पुष्ट्यर्थ घटनाही दिल्या आहेत. (पृ. २२, ३०, ५५, ६९, १८१, १९१, २०२, २२०, २३८, २८०, २९३ इ) परंतु वाल्मीकीने श्रीरामाला अवतार म्हटल्याचे केवळ दोनच संदर्भ आहेत. (पृ. २३ व पृ. ६९). यातील पृ. २३ वरचा उल्लेख बालकांडातील आहे. पृष्ठ ६९ वरील उल्लेखात वाल्मीकींनी श्रीरामाला अवतार म्हटले हे खरे आहे. तेव्हा अनेक ठिकाणी वाल्मीकींनी श्रीरामाला अवतार म्हटल्याचा दावा फोल ठरतो. वाल्मीकीरामायणात रामरूपाने एका महान् आणि असामान्य पुरुषाचे शब्दचित्र आले आहे, ईश्वरी अवताराचे नव्हे.

रामायणातही अनेक अद्‌भुत व चमत्कारपूर्ण घटना आहेत. उदा. रामाने अकरा हजार वर्षे राज्य केले. (पृ. २३ व ३११) रामायणाचाच काळ इतका जुना नाही. या श्लोकाचा दुसरा काही अर्थ असावा. सीतेचा अग्निप्रवेश, दशरथाचे स्वर्गातून येणे वगैरे घटनाही अद्‌भुतच मानायला हव्यात. सीतेने अग्निप्रवेश केला व त्यातून ती जिवंत निघाली असे रामायण म्हणते. पण महाभारतातील रामायणात सीतेने शपथ घेतल्यावर इंद्रादिदेवांनी सीता शुद्ध असल्याचे रामाला सांगितल्याने रामाने तिचा स्वीकार केला असे आलेले आहे. या सर्व घटनांतील अर्थ व्यंगार्थानेच समजून घ्यायला हवा. असे असताही 'वाल्मीकीरामायणातील वर्णनच वास्तवता, संभाव्यता आणि धार्मिकता यांना धरून आहे.' (पृ. ५५) असे श्री. मा. म्हणतात तेव्हा आश्चर्य वाटते. रामायणाला ते 'इतिहास' मानतात, (पृ. २७) वस्तुतः महाभारताला इतिहास म्हणतात. तर रामायण हे 'आदि काव्य' आहे.

असे काही मतभेदाचे मुद्दे सोडले तर हा ग्रंथ माहितीपूर्ण, रसाळ व रामाच्या चरित्राची यथातथ्य ओळख करून देणारा झाला आहे. श्री. मां.ची शैली शांत, मधुर व गंभीर अशी आहे. रामराज्याचे त्यांनी केलेले वर्णन मनोहर आहे. (पृष्ठ ३११), रामरावणयुद्ध, रामविलाप हे प्रसंगही चित्रमय आहेत. साहजिकच हे पुस्तक वाचनीय झाले आहे.

(मर्यादा पुरुषोत्तम राम : डॉ. श्री. मा. कुलकर्णी, मासश्री प्रकाशन, ४८९ हनुमाननगर, नागपूर ९, पृष्ठे ३१६. शंभर रुपये)

(डॉ. राजेंद्र डोळके, बँक ऑफ महाराष्ट्र, लोहारा शाखा, एम. ई. एल. चंद्रपूर ४४२ ४०१.)



अनुक्रमणिका







# सरदार बापू गोखले : सदाशिव आठवले
## मराठ्यांचा शेवटचा सेनापती

स.मा. गर्गे

मराठ्यांचा शेवटचा सेनापती बापू गोखले याचा जन्म १७७७ साली राजापूरजवळच्या पिरंदवणे गावी झाला. घरी शेतीचा व्यवसाय होता. वडील वारल्याने आपले चुलते धोंडोपंत यांच्याकडेच तो वाढला. धोंडोपंतांनी उत्तर कर्नाटकाच्या भागात अनेक लढाया केल्या आणि राज्याविरुद्ध उठलेल्या बंडखोरांना पराभूत केले. पण शेवटी धोंडजी वाघाशी झालेल्या मुकाबल्यात ते निधन पावले. त्या वेळी बापू त्यांच्या बरोबर होता. यानेही लढाईत चांगली चमक दाखवली. नाना फडणीसांनी त्याला पुण्याला बोलावून घेतले. (१७९८). बापूच्या जीवनात एक नवे पर्व निर्माण झाले. त्याला ५००० फौज ठेवण्याची आज्ञा झाली आणि इतर सरंजामही मिळाला. इ.स. १७९९ मध्ये मराठ्यांचे प्रमुख सेनाधिकारी परशुरामभाऊ पटवर्धन निधन पावले. २२/२३ वयाचा बापू गोखले नव्या मोहिमा स्ववळावर हाती घेऊ लागला. त्याच्या कर्तबगारीला वाव देण्याएवढा कर्तबगार पेशवा त्याला मिळाला नाही हे दुर्दैवच. अस्थिर वृत्तीचा, ख्यालीखुशालीत रमणारा; सामान्य बुद्धीचा, कारस्थानी लोकांच्या सल्ल्याने वागणारा दुसरा बाजीराव बापूच्या मोहिमांत वरचेवर अडथळे आणीत असे. त्यामुळे बापूला राज्यरक्षणाचे काम नीट करता आले नाहीच, पण बाजीरावालाही बापूच्या पराक्रमाचा उपयोग करून घेता आला नाही.

यशवंतराव होळकर १८०२ मध्ये पुण्यावर हल्ला करण्यासाठी निघाला. बाजीराव पळून मुंबईला इंग्रजांकडे गेला. इंग्रजांशी वसईचा तह करून पेशवाईचे स्वतंत्र अस्तित्व जवळजवळ संपवले. इंग्रजांच्याच संरक्षणाखाली तो पुण्यास येऊन मर्यादित अधिकार गाजवू लागला. या तहाने होळकर, भोसले, शिंदे हे सर्वच पेशव्यांपासून दूर गेले. त्यांनाही इंग्रजांशी तह करून दुय्यम स्थान पत्करावे लागले.

१८०३ मध्ये होळकर, शिंदे, अमृतराव, भोसले यांना बंडवाले समजून त्यांच्याशी बापूला पेशव्यांच्या हुकुमाप्रमाणे लढावे लागले. इंग्रजांशी तह केल्यावरही बाजीराव इंग्रजाविरुद्ध उठाव करण्याच्या प्रयत्नात होता. त्याचा मुख्य आधार बापू गोखले आहे याची कल्पना असल्यामुळे इंग्रजांनी बापूला पेशव्यांपासून फोडण्याचे प्रयत्न केले. पण बापू पेशव्यांशी एकनिष्ठ होता. त्याप्रमाणे तो पेशव्यांसाठी अखेरपर्यंत लढला आणि पेशव्यांसाठी त्याने आत्मसमर्पण केले.

पेशव्यांचा इंग्रजांबरोबरचा शेवटचा युद्धप्रसंग ऑक्टोबर १८१७ पासून सुरू झाला. ३० ऑक्टोबर रोजी इंग्रजांची फौज खडकीला येऊन पोचली. त्या फौजेवर अचानक हल्ला












करावा असा बापूचा बेत पण पेशव्यांचा निर्धार होत नव्हता. त्याला सल्ला देणारेही बापूचे पाय मागे ओढीत होते. काहीजण फितूर झाले. पेशव्यांच्या तैनातीत असलेला इंग्रज कॅप्टन फोर्ड ऐन वेळी पेशव्यांना सोडून इंग्रजांकडे गेला. यशवंतराव घोरपडे आणि बाळाजीपंत नातू यांनी घरभेदीपणा केला. घटना झटपट घडत होत्या. इंग्रज फौजा पुण्याला येऊन भिडल्या. शहरात गोंधळ उडाला. पेशवा घाईघाईने पर्वतीकडे निघाला. बापूने मात्र निर्धाराने गोऱ्यांच्या फौजेवर हल्ला चढविला. ६ नोव्हें. रोजी दापोडीजवळ झालेल्या चकमकीत दोन्हीकडील बरेच लोक मारले गेले. अशा आणीबाणीच्या वेळी बाजीरावाने लढाई स्थगित करण्याचे ठरवून पुरंदराकडे पळून जाण्याचा बेत केला. १६ नोव्हेंबरला बापूने आणखी एक निकराचा हल्ला चढविला. त्याच वेळी बाजीरावाने पुण्यातून पळ काढला. सैन्यात पळापळ सुरू झाली. येरवड्यानजीक झालेल्या त्या लढाईत पेशवा हरला. बापू निर्धाराने सैन्याची जमवाजमव करून स्मिथला हैराण करीत होता.

एवढे झाले तरी बाजीरावाला सैन्याबरोबर ठेवण्याची बापूची शिकस्त चालली होती. बाजीरावाचा धीर सुटला. तो सासवडला गेला. पुढे चार-पाच महिने फिरत राहिला. दोन्ही सैन्यांच्या लढाया चालूच होत्या. काही सैन्य बाजीरावाबरोबर तर काही सैन्य बापूबरोबर अशी सैन्याची शक्ती विभागली. २० फेब्रुवारी १८१८ रोजी पंढरपूरनजीक गोपाळअष्टीला झालेल्या चकमकीत बापू गोखले ठार झाला. छत्रपती आणि त्यांचा कुटुंबकबिला इंग्रजांच्या आश्रयास गेला. बाजीराव उत्तरेला पळाला. धुळकोट येथे इंग्रजांच्या हाती लागला. (मे १८१८).

बापूच्या कर्तबगारीचे योग्य ते चीज झाले नाही, ते त्याच्या नादान धन्यामुळे. अखेरचे युद्ध चालू असतानाच बापूचा मुलगा वारला, सून सती गेली. सती जाण्यापासून तिला परावृत्त करण्याचे बापूचे प्रयत्न व्यर्थ ठरले. अशी वैयक्तिक दुःखे असूनही बापू 'मराठ्यांचे राज्य राखले पाहिजे' या निर्धाराने लढत होता. इंग्रजांनी त्याचे शव उचलून नेले. छत्रपतींनी ते ओळखले आणि शेजारच्या गावी त्याचे दहन करविले. कर्तव्यनिष्ठ अशा मराठा सेनापतीची अशी शोकांतिका घडली. तो पडला आणि मराठी राज्याचाही शेवट झाला.

बापू गोखले शूर योद्धा होता तसाच कुशल प्रशासकही होता. समकालीन मराठ्यांनी आणि इंग्रजांनी एक पराक्रमी लढवय्या म्हणून त्याची प्रशंसा केली आहे. ब्लॅकर, डफ एल्फिन्स्टन, हेस्टिंग्ज यांनी त्याच्या शिपाईगिरीविषयी चांगले उद्गार काढले आहेत. रणांगणावर कच खाऊन मागे फिरणे हे त्याच्या स्वभावात नव्हते. आपल्या हाताखालच्या शिपायांची तो जिव्हाळ्याने काळजी घेत असे. लष्करी कारभाराप्रमाणेच तो मुलकी व्यवस्थेतही कुशल होता. दुर्दैवाने बाजीरावाला त्याच्या कोणत्याच गुणाची पारख झाली नाही. बापूचे शौर्य आणि कौशल्य दोन्हींचाही व्हावा तसा उपयोग झाला नाही. युद्ध हेच त्याचे जीवन होते आणि लढाईचे मैदान हीच त्याची कर्मभूमी. त्याच भूमीवर शेवटी तो राज्याच्या रक्षणासाठी पडला. प्रा. सदाशिव आठवले यांनी म्हटल्याप्रमाणे, तो सामान्यातील



अनुक्रमणिका

असामान्य होता आणि इमानीपणे त्याने शेवटपर्यंत तलवार चालविली. पुढच्या पिढ्यांनी आठवण ठेवावी, लक्षात घ्यावे असे काही महत्त्वाचे तो करून गेला !

साधार विवेचन, वस्तुनिष्ठ दृष्टिकोन, काल्पनिक घटना कटाक्षाने टाळणे वगैरे प्रा. आठवले यांची वैशिष्ट्ये या-पुस्तकातही दिसतात. 'रामशास्त्री प्रभुणे' प्रमाणे हे पुस्तकही संदर्भसमृद्ध आहे.

(सरदार बापू गोखले : सदाशिव आठवले, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे २१६. ऐंशी रुपये)

(स. मा. गर्गे ज्ञानेश, १२०५/४ शिवाजी नगर, पुणे ४)

---

# शाहीर हैबती : डॉ. शिवाजीराव चव्हाण

## भेदिक लावण्यांच्या परंपरेचा बुलंद आवाज

शंकर सारडा

'शाहीर हैवती' हा भेदिक लावण्यांसाठी प्रसिद्ध असून पुसेसावळी येथे त्याचा आखाडा आहे. आजही दरवर्षी तेथे महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या भागांतून भेदिक लावण्यांचे फड नित्यनेमाने येऊन आपली हजेरी लावतात.

वाईचे प्राध्यापक शिवाजीराव चव्हाण यांनी ह्या 'कलगी सम्राट हैवती'चा काळ, चरित्रविषयक तपशील, त्याचे गुरू, नाथपरंपरेशी त्याचे नाते, त्याचे उपलब्ध साहित्य, त्याची शिष्यपरंपरा, त्याच्या काव्याची वैशिष्ट्ये यांचा मागोवा घेणारे हे पुस्तक बरीच वर्षे परिश्रम घेऊन सिद्ध केले आहे. सारस्वतकार वि. ल. भावे यांच्या ग्रंथात हैबतीला फक्त दोन ओळी मिळालेल्या आहेत, हे लक्षात घेता डॉ. चव्हाणांचे काम किती कठीण असेल हे लक्षात यावे.

कलगी तुरा या आध्यात्मिक शाहिरीचा उगम 'नाथवाणी'तून झाला. (सन १४४१). असे चव्हाणांचे गृहीतकृत्य आहे. बिदरच्या धर्मसहिष्णू अल्लाउद्दीन बादशहाने नाथवाणीचा गायक नागेश-शिष्य त्रिमलदास पाठक याला 'कलगी' भूषण बक्षीस दिले. ते डफावर लावण्यासाठी त्रिशूळ व छापेदार निशाण दिले. त्यामुळे हे गायन 'कलगी' असे ओळखले जाऊ लागले. त्रिमलदासचा शिष्य लखाशिवदास याने आध्यात्मिक आशय प्रश्नोत्तररूपाने मांडण्याने रोचक व रंजक होतो म्हणून नवी प्रश्नोत्तरशैली स्वीकारली. रूढ केली. निजाम बुऱ्हानोद्दिनने या शैलीतील गायकांना 'तुरा' हे भूषण भेट दिले. (१५४५).

कलगी आणि तुरा या दोन्ही प्रतीकांचा रूढार्थ उपयोगी पडत नाही; लक्षणेनेच घ्यावा लागतो असे प्रा. चव्हाण स्पष्ट करतात. ही प्रतीके धर्मसहिष्णू मुस्लीम शासकांनी योजलेली आहेत. शिव-शक्तीच्या उपासनेची परंपरा त्यातून जाणवते. प्रा. चव्हाण यांनी शक्ती-काली-गीत-काली-गी-कालगी-कलगी आणि शिव-हर, हराचे गीत-हरागी–

तुरागी-तुरा अशी व्युत्पत्ती दिली आहे. ती फारच दूरान्वयाची आणि म्हणूनच शंकास्पद वाटते. चव्हाणांची ही सगळीच संगती तर्कशक्तीला फारच ताण देणारी आणि वेठीला धरणारी आहे. मधले दुवे नीट जुळवून अधिक विश्वासार्ह संगती लावण्यासाठी अजून संशोधनाची गरज आहे. कलगीतुरा याचे स्पष्टीकरण अन्य तऱ्हेने शोधायला हवे. अभ्यासकांना हे आव्हान आहे.

हैबती हा नेमका कोण? त्याचे गुरू कोण? या प्रश्नांची उत्तरे प्रा. चव्हाण यांनी निश्चित केली आहेत. या शाहीर हैबतीचे कुलनाम घाडगे; मूळचे गाव डिस्कळ ता. खटाव. त्रिपुटीचे परमहंस गोपालनाथ यांनी गुरे राखत हिंडणाऱ्या दहा वर्षांच्या हैबतीला जवळ बोलावून, त्याचे पूर्ववृत्त अंतर्ज्ञानाने जाणून, तू मोठा कवी होशील असा आशीर्वाद दिला. तेव्हा त्याच्या पालकांनी त्याला त्रिपुटीला आणून पोचवले. पुढे तेथे तो पूर्णज्ञानी बनला. पुढे पुसेसावळीत जाण्याचा दृष्टान्त झाल्याने, तेथे जाऊन नाथपंथीपरंपरेला नव्याने चालना दिली. तमाशाच्या लोकप्रिय माध्यमाचा वापर करून, त्याला आध्यात्मिक आशय दिला. त्यासाठी नवे गायक, शाहीर तयार केले. तो कलगी-पंथीय. प्रश्न विचारणारा. तुरा पक्षाच्या शाहिरांवर जबाबदारी उत्तर देण्याची. त्याचा प्रतिस्पर्धी संभू-राजू याने त्याची कवनांची बाडे चोरून नेली अशीही आख्यायिका आहे.

शृंगारिक व्यावसायिक तमाशावर हैबतीच्या पारमार्थिक तमाशाचा प्रतिकूल परिणाम होऊ लागल्याने पारंपरिक शाहीरांचा विरोध संघटित होऊ लागला. कार्वे येथे त्याला आव्हान दिले गेले. हैबतीने शृंगार आणि परमार्थ यांची मी सांगड घालून दाखवतो, नाहीतर तमाशाचा फड विसर्जित करतो असे जाहीर केले. तुरेवाल्यांना त्याने हरवले. आळंदीला त्याच्या तमाशाला तेथील पंडितांनी बंदी घातली. मी नाथमाऊलीच्या इच्छेनेच हे कार्य करीत आहे असे सांगून ज्ञानदेवांच्या समाधीजवळ हैबतीने रात्रजागर केला. लोक तर मुग्ध झालेच. समाधिस्थ ज्ञानेश्वरही डोलू लागले. हा हैबतीचा शेवटचा कार्यक्रम! त्यानंतर त्याने इतरांना मार्गदर्शन केले. स्वतः फडात उभे राहण्याचे टाळले.

इ.स. १७५६ ते १८५४ हा हैबतीचा काळ. ९८ वर्षांचे दीर्घ आयुष्य त्याला लाभले. एक लाख साठ हजार कवनांची रचना त्याने केली असे म्हणतात; पण आज त्याचे चारच ग्रंथ उपलब्ध आहेत. श्रीनाथलीला विलास, तूर्त बोध, श्री अर्जुन गीता, श्री आत्मानुभव ग्रंथसार. पैकी पहिले दोनच मुद्रित झालेले आहेत. शिवाय महाभारत, पंचीकरण, ज्ञानदेव अभंगावरली भाष्ये, सहदेव भाडळीतील रचना हैबतीच्या नावावर आढळतात. या सर्व साहित्याची परिचयवजा माहिती प्रा. चव्हाण यांनी या पुस्तकात दिली आहे. शेवटी ३० पृष्ठांमध्ये २३ रचनाही दिल्या आहेत.

शाहीर हैबती, कलगी तुरा संप्रदाय, विद्यमान परंपरा याबद्दलची बरीच माहिती या पुस्तकामुळे संकलित स्वरूपात उपलब्ध झाली आहे. त्यावर खूपच नव्या संशोधनाला वाव आहे याची कल्पना त्यामुळे येते. हैबती हा पहिला राष्ट्रीय कीर्तनकार; अध्यात्म-शृंगार यांची



अनुक्रमणिका







रंजक सांगड घालणारा प्रयोगशील चतुर शाहीर; साक्षात्कारी अभ्यासू संत. त्याच्या कार्याकडे लक्ष वेधण्यास हे पुस्तक महत्त्वपूर्ण ठरेल.

(शाहीर हैबती : डॉ. शिवाजीराव चव्हाण, प्राज्ञ प्रकाशन, वाई ४१२ ८०३. पृष्ठे १४०. चाळीस रुपये. प्रथमावृत्ती डिसें. ९०.)

# वेचक मधु मंगेश कर्णिक

## कथा– वास्तववादी तशाच वाचनीय

अनिल बळेल

वेचक मधु मंगेश कर्णिकमध्ये कर्णिकांच्या निवडक 'शहरी' कथा समाविष्ट आहेत. निवड त्यांचीच आहे. रत्नागिरीच्याच 'रत्नाकर' या नियतकालिकातून १९५१ साली कर्णिकांची पहिली 'कृष्णाची राधा' ही कथा प्रसिद्ध झाली. त्यानंतर गेल्या चाळीस वर्षांत त्यांच्या सहाशेहून अधिक कथा प्रसिद्ध झाल्या. 'कथा सुचणे, ती मनात रुजणे, मग ती कागदावर उतरणे आणि ती लिहून झाल्यावर स्वतःशी वाचताना तिची, नकळत मुळात जे सुचले होते त्याच्याशी तुलना करणे, ही सर्व प्रक्रिया शिणवणारी आहे.' असे कर्णिकांचे मत आहे. म्हणूनच त्यातील नेमक्याच कथा निवडणे हे काम बिकट आहे. पण तेही खुद्द कर्णिकांनीच केले आहे.

रसास्वादाच्या, पुनः प्रत्ययाच्या आनंदासाठी कर्णिकांनी केलेल्या या खटाटोपातून वीस निवडक कथा पुन्हा एकदा वाचकांसमोर आल्या आहेत. 'मोर' ही या संग्रहातील पहिली कथा. 'स्त्री-पुरुषांमधील हवी-नकोशी नाती आणि त्यांच्याशी खेळणारी नियती यांचा एक गुदमरवून टाकणारा विचित्र गुंता या कथेमध्ये आढळतो. 'ही कथा मी पंचवीस वर्षांपूर्वी लिहिली. आजही ती मला मांणूस आणि नियती यांच्यातील खेळाच्या प्रत्ययकारी चित्रणासाठी, हुरहुर लावणाऱ्या वातावरणनिर्मितीसाठी उल्लेखनीय वाटते,' असे तिच्याबद्दल कर्णिक सांगतात.

काही वर्षांपूर्वीची या देशातील राजकीय-सामाजिक परिस्थिती आणि त्या परिस्थितीतील राष्ट्रपातळीवरील नेत्यांचे वावरणे सर्वांनाच परिचित आहे. पण त्यालाच कथाविषय बनवणारा लेखक एखादाच. 'वरचेवर तुरुंगात जाणारे, हजारो लोकांसमोर पाल्हाळिक भाषणे करणारे, न बोलणाऱ्या, मेणबत्तीसारख्या वर्षानुवर्षे तेवणाऱ्या प्रेमाबाई आणि त्या वारल्या तेव्हा लहान मुलासारखे एकदाच ओक्साबोक्शी रडलेले, भूदानासाठी गावोगाव फिरणारे, सर्वोदयाच्या वेडाने भारलेले, कुठल्या दरोडेखोरांना माणसात आणण्यासाठी जीवाचे रान करणारे, बाईंच्या जुलमी कारकीर्दीविरुद्ध आणीबाणीच्या










जुलमाविरुद्ध कडव्या त्वेषाने गर्जत उभे राहिलेले व्ही.एस.जी. म्हणजे जयप्रकाश हे सांगायला हवे असे नाही. त्यांना व्ही.एस.जी. बनवून फारसे काही साधलेले नाही.

जिला अशी 'विनाशकाले विपरीत बुद्धी' झाली, त्याचे परिणाम जिला भोगावे लागले आणि त्यातूनही बाहेर पडण्याची जिद्द जिने ठेवली तिचेही मनोव्यापार कर्णिक यांनी 'अस्ताचल' आणि 'उदयाचल' या कथेत टिपले आहेत. प्रत्यक्षात हे विचार तिच्या मनात असे उमटले असतील की नाही सांगणे कठीण आहे पण ते तसेच असावेत, असे वाटते, असे वाटायला लावणाऱ्या या कथा आहेत.

कर्णिकांच्या कथेला वास्तवतेची बैठक आहे. त्यात कल्पनारंजन असले तरी त्या काल्पनिक वाटत नाहीत. आपल्या देशातील गरिबी, त्या पोटी काहीही करायला तयार होणारी येथील जनता आणि त्याचा फायदा घ्यायला टपलेले देशी-परदेशी लोक यांचे चित्रण वास्तववादी वाटते. पैशाच्या जोरावर आपल्या देशातील अरबांचा सुळसुळाट वाढला आहे आणि त्या जोरावर ते शारीरिक-मानसिक वासना येथे भागवून घेत आहेत, हे 'विदेश' कथेत वाचायला मिळते, तर 'पुतळा' या कथेतील गरिबीमुळे-बेकारीमुळे शरीर-मनाची होणारी अगतिकता, आलिशानतेत आपली वासना पूर्ण करून घेण्यासाठी धडपडणाऱ्यांची अधोगती मन विपण्ण करते. या कथेची शेवटची कलाटणी सुन्न करते.

वासना ही वासना आहे पण अपत्य हा तिचा अपरिहार्य परिणाम आहे. आणि एकदा अपत्य झाले की माणूस त्याच्यातच गुंतत जातो. मुलांचे भविष्य घडवण्याचा प्रयत्न करत राहतो. त्यासाठी त्याच्याकडून काही अपेक्षा ठेवत जातो, या अपेक्षा पूर्ण होतातच असे नाही. त्यामुळे तो ढेपाळतोही. हा अनुभव कर्णिकांच्या काही कथांतून आढळतो. सध्याच्या काळात नवरा-बायको दोघेही घराबाहेर पडतात; परंतु त्यापायीच मुलांकडे दुर्लक्ष होते आणि त्याचे 'वळण' कसे विघडते व त्याला पुन्हा मार्गावर आणण्याच्या धडपडीत आई-वडीलच व्याकुळ होतात हे 'वळण'मध्ये वाचायला मिळते. 'अद्वैत'मधील कीर्तनकार कवळेकर-बुवांची व्यथा अशीच. त्यांनी आपली वंशपरंपरा तुटू नये म्हणून अट्टाहासाने आपल्या एकुलत्या एका मुलाला आपल्या पंथात आणले खरे; त्यात तो पारंगतही झाला पण रमला नाही. त्याचे मन तिसरीकडेच भरकटले. या पंथाला न सोसावे, न शोभावे असे. कवळेकरबुवाही त्याने हवालदिल झाले पण त्यांनी अखेर ओळखले. 'अद्वैत' काही नाही. म्हणूनच त्यांनी मुलांच्या चुकांसह त्याला जवळ घेतले. चित्रपटक्षेत्र, त्यातील स्त्री-पुरुष संबंध, अलीकडे त्यांची प्रसिद्ध होऊ लागलेली 'उघड' आत्मचरित्रे, हे सर्व चविष्ट आहे पण या संबंधितातील आधीच अश्राप, निरपराध असलेल्या मुलांचे जीवन त्याने किती काळवंडून जाते याचा कधी विचार केला जातो का? हा विचार करायला लावणारी 'संध्याकाळ' ही एक वेगळी कथा.

'पासंग' ही कथा आजोबा-नातवाच्या नात्यातील श्रेयस आणि प्रेयस यांची अनोखी वाट दाखवणारी कथा आहे. इथे वृद्धपण बाळपणाला पुन्हा हाक मारीत आहे आणि



अनुक्रमणिका







बाळपणाचे दोन कोवळे हात म्हातारपणाला अमोघ मिठी घालत आहेत. जीवनाच्या किरणसावल्या एकमेकांना कशा चुकवतात याचे चित्रण म्हणजे ही कथा. 'गवळण' ही कथाही जगण्याचे प्रयोजन आकळलेल्या वृद्धाची कहाणी सांगणारी आहे. जायकवाडी धरणाने पैठणला नवी औद्योगिक सुबत्ता आली खरी पण तीत तिथली 'पैठणी' हरवली. हा बदल वेळीच ओळखलेले दुसरीकडे हालले आणि पैठणी बनवणारे हात लुंगी विणू लागले या खेद मानणाऱ्या वृद्धाची ही 'पैठणी'सारखी कथा कर्णिक यांना त्यांच्या पैठणभेटीतच सुचलेली आहे.

कर्णिक यांनी शासकीय वातावरण जवळून न्याहाळलेले आहे. कदाचित म्हणूनच 'पारणे' सारखी पंढरपूरच्या विठ्ठलाची पूजा करण्याची संधी मिळालेल्या मागासवर्गातील मंत्र्यांच्या अंतर्मनाचे चित्रण करणारी कथा ते लिहू शकले आहेत. एवढी सुवर्णसंधी लाभूनही हा मंत्री केवळ झगमगाटातच राहतो आणि खऱ्या विठ्ठलाला बघतही नाही. ही वास्तवता जशी बोचणारी आहे तशीच 'छावणी' कथेतील महात्मा गांधींच्याच जमान्यात वावरणाऱ्या मनाची हुरहुर चटका लावणारी आहे.

कर्णिक मूळचे कोकणचे आणि ते मुंबईत राहत असले तरी मनाने कोकणातच असतात. अशा कर्णिकांना कोकणातील सर्पांनी आकर्पून न घेतले तरच नवल. 'खेळ' ही कथा सर्पयुग्माभोवतीच गुंफलेली आहे. सर्प-सर्पिणीचा हा 'खेळ' स्तिमित करणारा आहे. 'संकेत'ही कथाही निसर्गाच्या पार्श्वभूमीवरील जीवन-मृत्यूचे चित्रण करणारी आहे. 'चोरी'या कथेत हिरवे रावे आणि लहानगा गोपू यांचे एक निराळेच विश्व उभे राहिल्याचे दिसते आणि 'बालमनाचे निर्व्याज व्यापार' टिपण्याचा कर्णिकांचा छंद अनुभवास येतो.

'स्त्री-पुरुष संबंध सांकेतिकता झुगारून जेव्हा वेगळ्या वाटांनी चालू लागतात तेव्हा पुरुषाने किंवा स्त्रीने परिपक्व समजूतदारपणा दाखवला, तर त्या संबंधांना अलौकिकत्व प्राप्त होणे कठीण नसते. स्त्री-पुरुष संबंधांना हीन पातळीवर आणण्याचे काम कुणा एकाकडूनही झाले तरी सारेच निराधार होतात. या अटळ संबंधाचा नैतिक आधार वाटावा, एवढी त्यांची महत्ता जोपासली जायला हवी' हा कर्णिक यांचा विचार पटावा आणि व्यक्त व्हावा अशी 'निरोप' ही कथा. 'जमाना' मध्येही स्त्री-पुरुष संबंध आले आहेत पण ते वेगळ्या पातळीवरचे आहेत आणि ती 'बाजीराव-मस्तानी'च्या कहाणीला समांतर जाणारी कहाणी आहे. 'गाणे' ही तर तरल प्रेमकथा, प्रतिभेचा साक्षात् साक्षात्कार घडविणारी !

'रुद्राक्ष' ही या संग्रहातील आणखी एक उल्लेखनीय कथा. स्वतः कर्णिक म्हणतात त्याप्रमाणे नाट्यमयता हा या सर्वच कथांचा एक अंगभूत विशेष आहे आणि कथेच्या या माध्यमातून कर्णिकांचा आत्माविष्कार आणि परात्माविष्कार सुद्धा नैसर्गिकपणे घडून आला आहे.

(वेचक मधु मंगेश कर्णिक ; सन पब्लिकेशन्स, पुणे ३०. पृष्ठे १८४, पंचावन्न रुपये)

(अनिल बळेल, १२४/१ ए प्रियदर्शनी, गणेश मळा, पुणे ३०)



अनुक्रमणिका






# आणखी पूर्वज : वि. ग. कानिटकर

## विख्यात व्यक्तींच्या अज्ञात पैलूंचे दर्शन

साधना सराफ

वि. ग. कानिटकरांचे 'आणखी पूर्वज' म्हणजे त्यांच्या 'पूर्वज'चाच पुढील भाग म्हणायला हरकत नाही. या दोन्ही भागांचे मिळून पुढे एकच पुस्तक निघावे अशी आशा कानिटकरांनी प्रास्ताविकात प्रकट केली आहे.

'नाही तुरा नाही गणती' यात दुसऱ्या बाजीरावाने आपल्या तोतयांचा कसा वापर केला याची कहाणी आली आहे. विनायक भटला गुहागर येथे योगायोगाने हुबेहूब बाजीरावासारखा दिसणारा निरुद्योगी कोंडभट भेटतो. तो त्याला पुण्यास आणतो. कोंडभटाचं पुण्यात आल्यावरचे गांगरलेपण दाखवताना दहा चौकी शनिवारवाडा, त्यातले चौक, कारंजी यांचे वैभव वर्णन केले आहे. कोंडभटाची व बाजीरावाची विनायक भटाने घडवून आणलेली भेट व क्लोझसाहेबाला बाजीरावांनी दिलेल्या मेजवानीच्या प्रसंगी कोंडभटाने बाजीराव म्हणून लावलेली हजेरी हे दोन्ही प्रसंग खुलवून सांगितले आहेत,

या प्रसंगानंतर बाजीराव त्याला कावेबाजपणाने एक प्यादे म्हणून खेळवू लागतो. शेवट यशवंतराव होळकरांच्या सैनिकांकडून कोंडभटाची (बाजीराव समजून) हत्या होण्यात होतो. पेशवाईतले एक क्रौर्य अनुभवून आपण सुन्न होऊन जातो.

अचानक एक दिवस विठूच्या बहिणीवर नवऱ्याच्या खुनाचा आळ येऊन तिच्यावर खटला चालून, इंग्रज न्यायाधीश स्टुअर्टकडून ती दोषी ठरवली जाते. तेव्हा विठू येऊन बापू वैद्यांचे पाय धरतो व कसंही करून बहिणीला वाचवा असे विनवतो.

तालुक्याचे मामलतदार कृष्णराव आपटे व बापू वैद्य यांचा चांगला परिचय असतो. कृष्णराव न्यायनिपुण म्हणून प्रसिद्ध असतात. त्याबद्दलचा एक किस्सा अगदी बिरबलच्या चातुर्यकथेतील वाटावा असा बापूंनी खुद्द कृष्णरावांच्या तोंडून ऐकलेला. तेव्हा बापू, विठू जाधवाची सारी कहाणी त्यांच्या कानावर घालतात. तेव्हा कृष्णराव सुचवतात की, उद्या न्यायालयात विठूच्या बहिणीने 'आपण अपराधी नसून आपली चौकशी मामलतदारासमोर व्हावी' असे सांगावे. ही तिची विनंती मान्य होऊन कृष्णराव मामलतदारांकडे तो खटला येतो. 'हकिगत'मध्ये निरपराध विठूच्या बहिणीला न्याय कसा मिळतो हे सांगण्यात आले आहे. 'कोण कुठली ही क्षुद्र बाई?' असे कृष्णराव आपटे किंवा बापू वैद्य यांच्या मनातदेखील येत नाही. ती निर्दोष आहे हे पटल्यामुळे तिच्यासाठी वाटेल ते कष्ट घेऊन ते तिला योग्य न्याय मिळवून देतात. तेव्हाचा इंग्रज कमिशनरही, इंग्रज न्यायाधीशाने दिलेला न्याय फिरवून कृष्णरावांनी दिलेला न्यायच योग्य आहे हे मान्य करून 'बाईंना वाटखर्च व



अनुक्रमणिका








५० रु. बक्षिसी द्यावी' असा हुकूम देतो.

'मशाल अब्दागीर नको' ही कथा व्याकरणकार दादोबा पांडुरंग यांच्या जीवनातील एका प्रसंगावर बेतलेली असून राजेमहाराजांच्या मोठेपणातील फोलपणा दाखवून जाते.

सयाजीराव महाराजांकडे रेसिडेंट म्हणून गेलेले रॉबर्ट कीथ यांचे दादोबांना पत्र येते की, 'तुम्ही बडोद्यास या. तुमच्याबद्दल मी महाराजांकडे बोलून ठेवले आहे.' त्या पत्रामुळे आनंदित झालेले दादोबा मोठ्या उमेदीने बडोद्याला जातात. परंतु तिथे राजदरबारी चालीरीतींचा व राजेसाहेबांचा वागण्याचा जो अनुभव येतो त्यानेच 'मशाल अब्दागीर नको' हे उद्‌गार काढण्याची वेळ येते.

'नवं घराणं' या कथेत बडोद्याच्या सरदार मान्यांच्या आश्रयानं राहणारी हिरा गाणारीण व तिची मुलगी तारा यांची कर्मकहाणी येते. हिरा मुंबई सोडून सरदार मान्यांबरोबर बडोद्याला येते पण संगीतकलेशी कुठलंही नातं नसलेला हा क्षुद्र मनाचा माणूस तिचा संशय घेऊन तिला छळत राहतो. शेवटी या छळाला कंटाळून हिरा, मागे आपल्या लेकीला एकटीला सोडून आत्महत्या करते. त्यानंतर ताराचाही सरदार माने त्याच प्रकारे छळ करू लागतात. हिराने लेकीसाठी ठेवलेले दागदागिने व पैसाअडकाही ते घेऊन जातात आणि ताराची गाण्याची शिकवणीही बंद करून टाकतात. संगीताशिवाय जगू न शकणारी तारा करीमगुरुजींबरोबर मुंबईला जाऊन नाव कमावते. 'तिच्या दृष्टीने हा प्रवास काहीसा अज्ञाताचा असला, तरी शाश्वताचा होता. संगीताच्या क्षेत्रात एक नवं घराणं जन्माला येणार होतं' या वाक्यावरून लक्षात येतं.

हा प्रसंग इतक्या 'रूढ' पद्धतीने आला आहे की हे 'नवं घराणं' मनाची अजिवात पकड घेत नाही.

'आग्या वेताळाचे हास्य' मात्र इतिहासतज्ज्ञ वि. का. राजवाड्यांच्या व्यक्तिमत्त्वाची वेगळीच झलक दाखवते.

विसुभाऊंच्या जन्मभर कष्टलेल्या आईची, मुलानं पुनः लग्न करून आपल्याला थोडाफार सुखात ठेवावं ही इच्छा आणि विसुभाऊंची भणंग फकिरी वृत्ती या दोन्हीतला संघर्ष छोट्या छोट्या पण खुमासदार संवादांनी छान उभा केला आहे.

'शारदा' कथेची नायिका म्हणजे जिच्यावरून पं.रमाबाईंनी आपल्या शाळेला 'शारदा सदन' असे नाव दिले ती त्या शाळेची पहिली विद्यार्थिनी– शारदा गद्रे. तिचे वडील गंगाधरपंत यांचे वर्तन, तत्कालीन संघर्ष यांचे दर्शन घडते.

ह. भ. प. लक्ष्मणबुवा आणि बापू दातार हे दोघे 'सुधारक' आगरकरांचे शिष्य. 'लोकांत अप्रिय परंतु पथ्यकारक असेच विचार लोकांपुढे आणणे' हे दोघांचे जीवितकार्य. दोघे आगरकरांसारखेच नास्तिक, परंतु पुढे भीमातीरावर लक्ष्मणबुवांना एक अलौकिक अनुभव येतो. ते भक्तिमार्गी बनून 'ह. भ. प.' होतात. तेव्हापासून दोन्ही मित्रांत जे वितुष्ट येते ते बापू दातारच्या मृत्युशय्येपाशीच संपते. शेवटच्या भेटीत लक्ष्मणबुवांना 'आपल्या दोघांच्या गाढ

मैत्रीत आलेल्या या वितुष्टाचे प्रयोजन काय होते' असा प्रश्न पडतो. पण आता फार उशीर झालेला असतो !

या कथेत या दोन मित्रांचे, प्रत्यक्ष संभाषण असे जवळजवळ नाहीच. कथा उलगडत जाते ती बापूंच्या लक्ष्मणरावांना आलेल्या जुन्या पत्रातून व त्यावरून लक्ष्मणरावांना येणाऱ्या आठवणींतून. ही कथाही संस्मरणीय झाली आहे.

असा हा सात कथांचा संग्रह चांगल्यापैकी पुस्तक वाचल्याचे समाधान देऊन जातो.

(आणखी पूर्वज— वि.ग. कानिटकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठे १२३. चाळीस रुपये)

(साधना सराफ ७२८ ब सदाशिव पोस्टासमोर, पुणे ३०.)

---

## भरती ओहोटी : श्री. ज. जोशी

### बदलत्या पुणेरी जीवनाचे रसाळ दर्शन

प्रा. डॉ. वसंत कुबेर

सुप्रसिद्ध लेखक श्री. ज. जोशी यांनी उत्तरायुष्यात लिहिलेल्या २९ लेखांचा हा संग्रह. 'सदाशिव पेठी संस्कृती' आणि पुणे शहर यांच्याबद्दल श्री.ज.ना. जाज्वल्य अभिमान होता. त्याबद्दल त्यांच्यावर टीका झाली, त्यांची चेष्टा केली गेली तरी आपला बाणा सोडला नाही. आपल्या मनाशी व अनुभवांशी प्रामाणिक राहून आयुष्याच्या अखेरपर्यंत त्यांनी आपले लेखन केले. त्यांचे अभिमानविषय हेच त्यांच्या साहित्याचे विषय ठरले. सदाशिव पेठी संस्कृतीने त्यांना शुचितेची पूजा करण्यास शिकविले आणि पुणेप्रेमाने त्यांना साहित्यिक म्हणून फुलविले. 'पुणेरी', 'जोशी पुराण' या संग्रहातील लेखनाप्रमाणेच पुणेप्रेम आणि रसाळ गप्पा हे श्री. जं च्या जीवनाचे व लेखनाचे सूत्र येथेही अनुस्यूत आहे.

यातील पहिला लेख म्हणजे त्यांची संक्षिप्त ओळख असून 'स्वप्ननगरी' हा लेख ही एक कथाच आहे. आजच्या महागाईच्या काळात मध्यमवर्गीयांच्या दृष्टीने स्वतःचे घर ही कल्पना स्वप्नवत ठरते आणि केवळ बोलण्यातूनच त्याची पूर्तता करणे भाग पडते, हे या कथेत दाखविले आहे. ध्येयवादाच्या खोट्या कल्पनांनी गांगरून गेलेल्या एका असहाय प्राध्यापकाची कथा 'प्राध्यापक' मध्ये आली आहे. 'पाकिस्तानी सवाई माधवराव' मध्ये बेनझीरच्या मुलांत आणि सवाई माधवरावातील परिस्थितीचे तुलनात्मक दर्शन घडविले आहे, तर एखाद्या व्यक्तीच्या दुष्कृत्यांचा त्रास तिच्या कुटुंबियांना कसा भोगावा लागतो किंवा मोठ्यांच्या मोठेपणामुळे त्यांच्या मुलाबाळांवर कशी बंधने पडतात व त्यांचे नुकसान होते याचे दर्शन 'ब्रेझनेव नातू' मधून घडते.

पुणे कालचे.. परवाचे, गाव आणि स्वभाव, हरिभाऊंचा 'आनंदाश्रम' ओझं नसलेलं



अनुक्रमणिका

गाव अशा लेखांतून पुणे शहर, तेथील निरनिराळ्या वास्तू, शहराचा बदलता तोंडवळा इत्यादींचे चित्रण आले आहे. भूतकाळातील घटना, प्रसंग व स्थळांबद्दल श्रीजंना वाटणारी खंत प्रकट होते, त्याचप्रमाणे नवीन येणाऱ्या काळाचे स्वागत अपरिहार्यपणे करावे लागणार ही भूमिकाही दिसून येते. पुण्याच्या चित्रणातून एक अस्सल पुणेकर म्हणून श्रीजंचे दर्शन वाचकांना घडते.

पुण्यातील काही व्यक्ती, संस्था यांनी श्री. ज. जोशी ही व्यक्ती घडविली. त्यांच्याबद्दल कृतज्ञतेची भावना आहे. 'आर्य गप्पा मंडळ' आणि 'पुणे नगर वाचन मंदिर' या लेखातून या संस्थेविषयी सांगताना श्री. ज. फुलून येतात. पुण्यातील वृत्तपत्रसृष्टी, बदलणारी संस्कृती, हवामान, पत्रकारिता, नगररचना याबद्दलचे आपले विचार ते प्रकट करतात.

'माझ्या लेखनात मी', 'मी एक– ख्यातनाम' अशा लेखातून स्वतःचे लेखनात पडलेले प्रतिबिंब आणि आपल्या लेखकत्वाचे वैयक्तिक आयुष्यात झालेले फायदे-तोटे याबद्दल ते माहिती सांगतात. राजकारणप्रेम आणि वाङ्मयप्रेम ही पुणेकरांची दोन वैशिष्ट्ये. त्याचे दर्शन 'तुरुंगवास घडलाच नाही', 'सामान्यांची शौर्यगाथा', 'लेखकांची घरे', इत्यादी लेखांतून घडते.

'शं. वा. किर्लोस्कर', 'कार्यकर्ता' हे या संग्रहातील व्यक्तिविषयक लेख. शं. वा. किर्लोस्करांनी सौंदर्य, सुधारणा, नवे जग याची मराठी समाजाला माहिती दिली तर पुण्याच्या ऐहिक वाटचालीत शंतनुराव किर्लोस्कर व गरवारे यांचा फार मोठा वाटा आहे, याबद्दल श्री. ज. कृतज्ञता व्यक्त करतात. कम्युनिस्ट चळवळीत स्वतःला झोकून देणाऱ्या एका कार्यकर्त्याची व्यथा 'कार्यकर्ता' मध्ये आली आहे.

या संग्रहाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यातून दिसून येणारे लेखकाचे बहुरंगी, रसाळ, गप्पिष्ट व्यक्तिमत्त्व होय. आपल्या मर्यादा व सामर्थ्य याची त्यांना पुरेपूर कल्पना आहे. त्याचप्रमाणे प्रतिपक्षाची खिल्ली उडविण्याचे खास पुणेरी कौशल्यही त्यांच्या लेखनात दिसते. गेल्या ५०-६० वर्षांतील पुण्याचे राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक दर्शन या लेखांतून वाचकांना घडते. जिव्हाळ्याचा विषय आणि गोष्टीवेल्हाळ लेखक यामुळे हे दर्शन मोठे वाचनीय झाले आहे.

(भरती ओहोटी : श्री. ज. जोशी, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे १६१. पन्नास रुपये.)

(प्रा. डॉ. वसंत कुबेर, ११५९, बुधवार, पुणे २)

---

**साभार-स्वीकार**

**५. तोच चंद्रमा–** शांता शेळके, सुरेश एजन्सी, पुणे-२, (दु. आवृत्ती) पृष्ठे– १२०, पन्नास रुपये.
**६. आई आणि इतर कविता–** फ. मुं. शिंदे, सुरेश एजन्सी, पुणे-२, पृष्ठे– ६८, पंचेचाळीस रुपये.
**७. स्मृतिसुगंध–** प. वि. पटवर्धन, ३८/४, एरंडवणा, पुणे-४, पृष्ठे–२०८,
**८. पाहुने यावे नव्या जगाला–** रजनीनाथ, ३८/४, एरंडवणा, पुणे-४, पृष्ठे– ५४
**९. रंग लावणीचा–** बबनराव बहिरट, कविराज प्रकाशन, उखलगाव (नगर), पृष्ठे– १६, पाच रुपये.










# सोनेरी नायगारा : वसुंधरा पटवर्धन

## अमेरिकेच्या प्रवासातील काही नवलविशेष

दामोदर कान्टिकर

कथा-लेखिका म्हणून मराठी वाचकांना परिचित असणाऱ्या वसुंधराबाई पटवर्धन यांचे हे अमेरिकेचे प्रवासवर्णन. त्या वास्तव्यातील टिपलेले क्षण, माणसे यांचे हे चित्रण म्हणजे मातृहृदयाचे स्पंदन आहे. त्यांचा मुलगा जयंत अमेरिकेत आहे. त्याच्याकडे त्या गेल्या. सामाजिक स्थिती, वृद्धांचे प्रश्न, लहान मुलांचे प्रश्न, भारतीय गृहिणीच्या समस्या, वगैरे गोष्टींनी त्यांचे लक्ष वेधून घेतले. त्याचा परिपाक म्हणजे 'सोनेरी नायगारा' हे पुस्तक.

न्यूयॉर्कपासून चार-पाच तासांच्या अंतरावर 'पिट फिल्ड' नावाचे एक खेडे आहे, तिथे त्या राहिल्या. तिथली सार्वजनिक स्वच्छता, शिस्त, दुकानांतील प्रामाणिकपणा हे पाहून त्या थक्क झाल्या.

पण त्याचवरोबर अमेरिकेत आजारी पडणे आणि डॉक्टरांचे उपचार घेणे किती कटकटीचे आणि महागडे आहे हेही त्यांना कळले. त्यांच्या मुलाने डॉक्टरांच्या फीचे सांगितलेले किस्से थक्क करतात. 'दात भरायला सात-आठशे रुपये खर्च येतो. त्यापेक्षा दहा डॉलर्स मध्ये दात उपटून टाकलेला बरा. म्हणून काही लोक दात सरळ उपटून घेतात.'

वसुंधराबाई नायगरा धबधब्याचे वर्णन करतात. यापूर्वी धबधबा असा त्यांनी पाहिलेलाच नव्हता. पाहिला तो एकदम नायगारा. त्याचे वर्णन हा या पुस्तकाचा गाभा आहे.

या लेखनातील काही मते वाचण्यासारखी (आणि विचार करण्यासारखी) आहेत.
– आपण हिंदुस्थानात आगगाडीतून किंवा बसने प्रवास करताना जसे एकमेकांशी मोकळ्या मनाने बोलतो, खेळीमेळीने व अगत्याने वागतो किंवा तुसडेपणा दाखवून कडकडून भांडतो, त्यातले विमानात काही नव्हते, आगगाडीतून प्रवास करणारे आपणच विमानात एकदम शिष्ट होऊन स्वतःच्या ठिकाणी ताठ होऊन बसतो. हा त्या विमानाचा की आणखी कसला गुण कोण जाणे !

हिंदुस्थानात कुठल्याही नात्याने स्त्री वाईट होऊ शकेल. पण 'आई'च्या नात्याने मात्र ती कधी कमी पडत नाही असा अनुभव आहे.

नुसते समृद्ध जीवनच केवळ माणसाला पुरे पडत नाही. त्याला आपली माणसे लागतात, प्रेम लागते, एकमेकांचा सहवास लागतो, येणे-जाणे, रीत-व्यवहार, देणे-घेणे, सणवार, आपले संस्कार सगळे लागते. अमेरिकेत गेलो तर पैसा मिळतो, सुसंपन्न समृद्ध जीवनक्रम लाभतो; पण आपले कोणी नसते. ध्येयवादी माणसांचा परदेश रहिवास लांबला तर समजता येते. परंतु बहुतेक परदेशी गेलेली मुले परत येत नाहीत त्याचे कारण प्रामुख्याने



अनुक्रमणिका







त्यांना तिथे नाना तऱ्हेच्या सुखसोयी मिळतात. पैसा खोऱ्याने ओढता येतो. चैनीत राहता येते. मनासारखे काम करता येते, हेच असते. पण- आपली माणसे, आपला देश, आपले माया-ममतेचे संस्कार, आपले संगीत, आपली भाषा, आपले वाङ्मय, आपले असे खास भारतीय वातावरण इत्यादी कुबेराच्या भांडारासारख्या अनमोल गोष्टी सोडून द्यायला ही एवढी कारणे खरेच पुरेशी आहेत का ? ही मुले पश्चिमेस राहून जे काही मिळवतात त्याच्या कितीपट उगवतीचे आपले जीवाभावाचे घालवून बसतात, त्याचे गणित त्यांनी कधी मांडले आहे का ?

अशा अनेक मौलिक विचारांनी हा 'सोनेरी नायगारा' समृद्ध आहे.

(सोनेरी नायगारा— वसुंधरा पटवर्धन. विमल प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठे २११. सत्तर रुपये.)

(दामोदर कानिटकर, तहसीलदार कचेरीसमोर, बारामती)

# मेघमाला : नारायण बोरुळकर

## काव्यात्म स्वगते

शंकर सारडा

प्रा. नरहर कुरुंदकर हे एक झंपाटून टाकणारे प्रभावी शिक्षक होते. आपल्या तरुण विद्यार्थ्यांना ते जणू भारून टाकत. त्यांच्या विद्यार्थ्यांमध्ये साहित्याची अभिरुची तर विकसित होईच; स्वतः लेखन करावे अशी प्रेरणाही जागृत होई. लेखनकलेतील पहिली वहिली पावले टाकताना कुरुंदकर त्यांना उत्तेजन देत, त्यांचे कौतुक करीत. शाबासकीचा हात पाठीवरून फिरवत. त्या शाबासकीने साहित्यविषयक आस्थेचा जगभर सावली देत राहील असा वृक्ष मूळ धरू लागे.

कुरुंदकरांच्या अशा शिष्यांपैकीच नारायण बोरुळकर हे एक. सध्या ते परभणीला एकत्रीकरण कार्यालयात काम करतात. परंतु कथा-ललित लेखनाचा वसा त्यांनी टाकला नाही. डॉ. प्रभाकर मांडे यांनी लोकसाहित्याच्या अभ्यासाची कवाडे त्यांच्यासाठी खुली केली. त्यामुळे या लेखनाला आणखी एक परिमाण लाभले.

मेघमाला हा बोरुळकरांच्या २९ ललित लेखांचा संग्रह. कवितेसारखे छोटे, कल्पनाप्रचुर असे हे लेख. काव्यमय भाषेचे आणि अलंकारांचे बोरुळकरांना आकर्षण आहे. रोमँटिक डोळ्यांनी निसर्गाची विविध रूपे ते बघतात; आणि प्रेयसीची प्रतीक्षा, मीलनाची ओढ, छकुल्याच्या इवल्याश्या पावलांची रुणझुण यातही ते रमतात. या प्रवासातली काही क्षणचित्रे काव्यात्म भाषेत ते स्वगतासारखी पेश करतात. जाता जाता जीवनविषयक भाष्ये करतात. आदिवासी गीते जमवण्यासाठी गेल्यावर एखाद्या गिरजाबाईच्या ओव्यांमधून

प्रकट होणारी सामान्य माणसाच्या जीवनातील असामान्य निष्ठा बघून ते विस्मयचकित होतात.

*जसं काळं ग वावर । हाय लिंबाची सावली*
*मस्त बाळाला पावली । तेथं लक्षीमी माऊली ॥*

बोरुळकरांमध्ये एक शांत, समंजस, सौंदर्यपूजक वास करतो. तो कलाकलांनी बदलणाऱ्या चंद्राकडे स्वतः बघत राहतो आणि आपल्या सखीलाही चंद्राकडे बघत राहण्याचा सल्ला देतो. मग सारं काही ठीक होईल असा विश्वास दाखवतो. तुझ्यामाझ्या दरम्यान येणारी कृष्णपक्षाची वांझोटी रात्र दूर होईल, तृप्तीच्या काठावरचं स्वप्नफूल फुलेल असा दिलासा प्रेयसीला देत स्वतःचा दुःखभारही हलका करीत राहतो.

ललितलेखनांच्या साधनेचं स्वप्नफूलही त्यांना एक दिवस नक्की गवसेल.

(मेघमाला : नारायण बोरुळकर, निर्मल प्रकाशन, कृष्णाई, कैलासनगर, नांदेड, पृष्ठे ५८. वीस रुपये.)

•

# दोन युरोप : अरुण खोरे

## युरोपात घडलेल्या राजकीय-सामाजिक घटनांचे वर्णन

डॉ. अंजली सोमण

या दशकात युरोपात घडलेल्या राजकीय-सामाजिक घटनांचे प्रभावी प्रतिबिंब टिपणारे प्रवासवर्णन म्हणून मला अरुण खोरे यांच्या 'दोन युरोप' या पुस्तकाचा उल्लेख करावासा वाटतो.

प्रवासवर्णन हा वाङ्मयप्रकार मराठीत अन्य वांङ्मयप्रकारांच्या तुलनेने उशिरा आला. पण रुजला. काही वाङ्मयप्रकार काळाच्या एका विशिष्ट टप्प्यावर बहरलेले दिसतात. पण कालान्तराने खुरटून जातात. मराठीत लघुनिबंधाचे असे झाले. १९२५ ते ४० हा लघुनिबंधाच्या बहराचा काळ. कलावादाच्या नावाखाली 'कारागिरी'चा पुरस्कार करणाऱ्या ना.सी. फडक्यांच्या बहराचा काळ हाच. वरवर हसत-खेळत लिहिल्यासारखा वाटला तरी लघुनिबंधाच्या रचनेत छुपेपणाने कारागिरी होती. जीवनविषयक चिंतनाला महत्त्व देण्यापेक्षा कलाटणी पद्धत वापरून छोट्या-मोठ्या निष्कर्षाकडे येण्यावर लघुनिबंधाचा भर होता. कृतक कलावादाच्या छायोत वाढल्यामुळे लघुनिबंधाची वाढ अशी खुरटली होती, हे आज लक्षात येते. पुढे लघुनिबंधाची जागा ललित गद्याने घेतली. १९६० नंतर साहित्यविषयक एकूणच जाण गंभीर आणि प्रगल्भ झाली. ६० नंतर विकसित झालेल्या ललितगद्यात जीवनविषयक चिंतनाला तुलनेने अधिक सखोलता आली आणि अभिव्यक्तीच्या वाटा वैविध्यपूर्ण झाल्या.











प्रवासवर्णनाचे लघुनिबंधासारखे झाले नाही. मराठीत प्रवासवर्णनांची संख्या कमी असली तरी आज हा वाङ्मयप्रकार वेगवेगळ्या दिशांनी विकसित होताना दिसतो आहे.

रोटीबंदी, बेटीबंदीबरोबर सिंधुबंदीचीही अट आपल्या समाजावर असल्यामुळे परदेशगमनाच्या सुरस आणि चमत्कारिक कथा मराठीत फार उशिरा आल्या. जो काही प्रवास व्हायचा तो तीर्थयात्रा करण्याच्या निमित्ताने. पवित्र स्थानांचे भक्तिभावाने वर्णन करायचे, सुंदर स्थळांचे रमणीयत्व पारंपरिक शब्दांतून सांगायचे आणि प्रवासातील अडचणींचा पाढा वाचायचा ही साधारणतः प्रवासवर्णनाची आपल्याकडे रूढ असलेली कल्पना होती. चित्तथरारक घटनांचे वर्णन करत असताना मनाची स्पंदने टिपत जाणारे गोडसे भटजींच्या 'माझा प्रवास' सारखे वैशिष्ट्यपूर्ण प्रवासवर्णन एखादेच.

प्रवासवर्णनाची ही रूढी १९४३ साली प्रसिद्ध झालेल्या अनंत काणेकरांच्या 'धुक्यातून लाल ताऱ्याकडे' या प्रवासवर्णनाने मोडली. त्यानंतर रा.भि. जोशी, पु.ल. देशपांडे, प्रभाकर पाध्ये, गंगाधर गाडगीळ इत्यादी लेखकांची दर्जेदार प्रवासवर्णने मराठीत प्रसिद्ध झाली. चांगले प्रवासवर्णन हे 'प्रवासवृत्त' असते, तसे 'आत्मवृत्त'ही असते. वरील सर्व लेखकांच्या प्रवासवृत्ताभोवती त्यांच्या व्यक्तित्वाचे वलय आहे. काणेकरांचे आत्मवृत्त याच्या एक पाऊल पुढे जाते. जागतिक राजकारणाचे काणेकरांचे आकलन त्यांच्या युरोप आणि रशियाच्या प्रवासवर्णनातून जाणवत राहते. 'दोन युरोप' हे अरुण खोरे यांचे प्रवासवर्णन काणेकरांची परंपरा पुढे नेणारे आहे. राजकीय विश्लेषण हेच खोऱ्यांच्या पुस्तकाचे मुख्य सूत्र आहे.

रशियाने अवलंबिलेल्या 'पेरिस्त्रोयका' आणि 'ग्लास्नस्त' या खुल्या धोरणांमुळे साम्यवादाच्या पठडीबंद आर्थिक व राजकीय चौकटीला हादरे बसले. नेल्सन मंडेलाच्या सुटकेमुळे आफ्रिकन वासाहतिक देशांत राष्ट्रवादाचे आणि स्वातंत्र्याचे वारे नव्या जोमाने वाहू लागले. सद्दाम हुसेन यांच्या आक्रमक (काहींच्या भाषेत उद्दाम) धोरणांमुळे खाडीप्रदेशाकडे जगाचे लक्ष वेधले गेले. प्रगत राष्ट्रांचे 'युनो'शी असलेले संबंध आणि प्रगत-भांडवली राष्ट्रांचे तिसऱ्या जगातील राष्ट्रांशी असलेले नाते यांचा पुनर्विचार करण्याची वेळ अरब-राष्ट्रातील संघर्षामुळे आली. राजकीय-सामाजिक परिस्थिती आमूलाग्र बदलणाऱ्या विलक्षण नाट्यपूर्ण घटना या दशकाच्या उत्तरार्धात घडल्या. या घटनांना अतिशय वेग असल्यामुळे राजकीय पडझड आज मोठ्या प्रमाणावर होते आहे.

ऑगस्ट ८७ मध्ये खोरे पोलंड, पूर्व जर्मनी आणि युरोपातील काही राष्ट्रांचा दौरा करून परत आले. ऑगस्ट आणि सप्टेंबर ८७ मध्ये त्यांची प्रवासवर्णने 'रविवार सकाळ' मधून प्रसिद्ध व्हायला लागली. त्या वेळी साम्यवादी पूर्व जर्मनी आणि भांडवलशाही उदारमतवादी पश्चिम जर्मनी यांच्यात भिंत होती. दोन्ही जर्मनीच्या मनोमीलनाच्या शक्यता दिसत होत्या. रशियामध्ये गोर्बाचेव यांनी पुरस्कारिलेल्या खुल्या धोरणामुळे या शक्यतांना खतपाणी मिळत होते. तरी भौगोलिक एकसंधता झालेली नव्हती. पूर्व जर्मनीवरील लेखात

शेवटी खोरे लिहितात. . .'भिंत नसलेल्या अखंड बर्लिनचा फोटो काढण्यासाठी मी खरंच उत्सुक आहे.' (पृष्ठ ७४)

१९९० मध्ये पुस्तक प्रसिद्ध झाले तेव्हा ही भिंत पडली होती आणि दोन्ही जर्मनी एक झाले होते. म्हणून पुस्तकात खोऱ्यांना 'ताजा कलम' लिहायला लागला.

दुसऱ्या महायुद्धात जर्मनीतील नाझी सैन्याने पोलंड बेचिराख केला. साम्यवादी रशियाचे नेतृत्व स्वीकारून पोलंड देश म्हणून पुन्हा उभा राहिला होता. खोरे पोलंडमध्ये गेले तेव्हा पोलंडमधील कम्युनिस्ट राजवटीविरुद्ध लेक वालेसा नावाचे वादळ सॉलिडॅरिटीच्या रूपाने अवतरले होते आणि सारे जग हादरवून संपले सुद्धा होते. आज पोलंडमध्ये झालेल्या खुल्या निवडणुकींच्या बळावर लेक वालेसा पोलंडच्या अध्यक्षपदी विराजमान झाले आहेत.

राजकीय-सामाजिक दृष्ट्या हे दशक अस्वस्थतेचे आहे. या वेगवान घटनांमागील अंतःसूत्रे पूर्व युरोप आणि पश्चिम युरोपच्या संदर्भात उलगडण्याचा प्रयत्न अरुण खोरे यांनी 'दोन युरोप' मध्ये केला आहे. हा प्रयत्न महत्त्वाचा आणि मुळातून वाचण्यासारखा आहे. फापटपसारा टाळणारी अभ्यासपूर्ण लेखनपद्धती आणि जीवनसन्मुख चिंतनशील वृत्ती या दोहोंच्या एकत्रीकरणामुळे खोरे हे यश मिळवू शकले आहेत.

आपला दौरा हा अभ्यास-दौरा होता, असे खोरे सुरुवातीलाच स्पष्ट करतात. पुस्तक वाचताना त्याची प्रचीतीही येते. 'हे पुस्तक रूढ अर्थाने प्रवासवर्णन वाटले तरी मला त्यात युरोपचे जीवनदर्शन दिसते. वाचकांनाही तसेच वाटेल' ही अपेक्षा खोरे व्यक्त करतात. (पृ.७). ती अपेक्षा या पुस्तकात पूर्ण होते. राजकीय सत्तास्पर्धेच्या खेळाला बिलगून बसलेल्या जीवनातील समृद्धता आणि ताण-तणाव खोरे समर्थपणे मांडतात. खोऱ्यांचा जीवनविषयक दृष्टिकोन विज्ञाननिष्ठ, परिवर्तनवादी आणि सामाजिक समतेचा आग्रह धरणारा आहे.

"जिथे पहिल्यांदा प्रबोधनाची पहाट अवतरली आणि जिथे औद्योगिक क्रांतीच्या चाकांनी पहिल्यांदा प्रवास केला त्या युरोप खंडाकडे आम्ही निघालो होतो. धर्मसत्तेला आव्हान देणाऱ्या विचारप्रणालींनी जिथे आपले वैचारिक पीठ उभे केले अशा भूमीकडे आम्ही निघालो होतो. आणि प्रयोगाशिवाय सत्य न स्वीकारणाऱ्या वैज्ञानिकांच्या खंडाकडे आमचा प्रवास सुरू झाला होता. . ." अशी खोरे आपल्या पुस्तकाची सुरुवात करतात. ज्या जीवननिष्ठांसाठी युरोपबद्दल ते प्रेमादर व्यक्त करतात त्याच निष्ठा त्यांनी वैयक्तिक पातळीवरही आदर्शवत मानलेल्या आहेत. हा दृष्टिकोन स्वीकारल्यामुळे जीवन दर्शनाचे जे तपशील या पुस्तकात येतात ते सुटेपणाने आणि विस्कळीतपणे येत नाहीत, तर एका सूत्रात बांधून येतात आणि साहित्यिक दृष्ट्या सुसंघटित आकार तयार करतात. सुरुवातीला आदर्श मानलेली ही जीवननिष्ठा पुढे वेगवेगळ्या तपशिलांतून उलगडत आणि ठसठशीत होत जाते.










युरोपमधील निसर्गसौंदर्य लेखकाला आकर्षित करते पण त्याच्या वर्णनात लेखक अडकून पडत नाही. उलट स्थळाच्या रमणीयतेबरोबर सहचारी-भावासारखे त्या स्थळाचे राजकीय-सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ खोऱ्यांच्या मनात जागे होतात.

"रस्ता अतिशय सुंदर (अर्थातच स्वच्छही !) होता. दोहो बाजूला सुंदर हिरवीगार झाडी होती. नुकताच पाऊस पडून गेला होता. प्रशस्त, उंची इमारती उभ्या-आडव्या कोनांतून उभ्या होत्या. अठ्ठेचाळीस वर्षांपूर्वी दुसऱ्या महायुद्धाची ठिणगी पडून याच शहराची राखरांगोळी झाली होती, हे मात्र विश्वास ठेवण्याजोगे वाटत नव्हते. कारण याच काळात पुन्हा एकदा फिनिक्स पक्ष्याने झेप घ्यावी तशा दुर्दम्य आकांक्षेने वॉर्सा आणि पोलंडही उभे राहिले आहे."– (पृ.९)

"सरोवरे, आल्पस् पर्वताच्या रांगा, माऊंट ब्लॅक यासाठी पर्यटकांना आकर्षून घेणारे' स्वित्झर्लंड बँकांसाठीही प्रसिद्ध आहे. स्विस बँकांच्या अनेक शाखा आम्हाला जिनिव्हात दिसत होत्या. 'तुम्हाला कोणालाही या बँकेत पैसे ठेवायचे असतील तर अवश्य ठेवा, तुमच्या मित्रांनाही समजणार नाही," असा सल्ला आमची गाईड देत होती– (पृ.५१) ही उदाहरणे वरील मुद्दा स्पष्ट करण्यासाठी पुरेशी आहेत.

युरोपमधील शहरे आणि महत्त्वाची ठिकाणे खोऱ्यांना राजकीय-सामाजिक संदर्भाची आठवण करून देतात. "कार्ल मार्क्स, एंजल्स, चर्चिल, हिटलर, नेपोलियन, दुसरा फ्रेडरिक, बिस्मार्क, महाकवी गटे, पंचम जॉर्ज अशा इतिहासप्रसिद्ध व्यक्तींच्या कर्तृत्वाने फुललेल्या खंडात आम्ही प्रवेश करत होतो" (पृ.८) असे वाटून युरोपमध्ये प्रवेश करताना त्यांचे मन भरून येते.

"दुसरे महायुद्ध संपल्यानंतर जगात शांतता प्रस्थापित करण्यासाठी इंग्लंड, अमेरिका आणि रशियाच्या प्रमुखांनी जिथे ऐतिहासिक करार केला, त्या शांतिनगरीत आम्ही प्रवेश करत होतो. पोट्सडॅममधील सिसिली राजवाड्यात हा ऐतिहासिक करार झाला. इंग्लंडचे युद्धकाळातील पंतप्रधान सर विन्स्टन चर्चिल, युद्धोत्तर काळातील पंतप्रधान ॲटली, अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष रुझवेल्ट आणि ट्रूमन, रशियाचे प्रमुख स्टालिन यांच्या चर्चा आणि बैठका ज्या राजवाड्यात झाल्या तो परिसर आम्ही पाहत होतो. विसाव्या शतकाच्या इतिहासात ज्यांची नावे अढळ आहेत, असे हे सारे कर्तबगार नेते जिथे बसत होते, तो हॉल आम्ही पाहत होतो"– (पृ.२५) पूर्व जर्मनीतील पोट्सडॅमविषयी त्यांना अशा आठवणी येतात.

कधी एखादी जागा हळुवार मानवी मनाचे आणि मानवतेच्या भावनेचे दर्शन घडवून जाते–"पूर्व बर्लिन शहरापासून पोट्सडॅमकडे जाताना वाटेत आम्ही 'सक्झन हौझन कॉन्सन्ट्रेशन कॅम्प' साठी थांबलो. एका माहितीनुसार या कॅम्पमध्ये दोन लाखांहूनही अधिक युद्धकैदी युद्धकाळात डांबून ठेवण्यात आले होते. त्यांतील एक लाखांहून अधिक कैदी नाझींच्या विविध प्रकारच्या अत्याचारांनी मेले. या कॅम्पने हजारो सर्वसामान्य कैद्यांची हत्या











पाहिली, तसेच समाजाच्या विविध क्षेत्रांत ज्यांनी वरचे स्थान मिळवले, अशांची भीषण अखेरही पाहिली. आम्ही शेवटी कॅम्पमधून बाहेर आलो तेव्हा अनेक युरोपियन मुले-मुली हातात पुष्पगुच्छ घेऊन कॅम्पमध्ये प्रवेश करत होती. त्यांच्या चेहऱ्यावरचे भाव जणू सांगत होते, आता पुन्हा कधीही सक्झन हौझन कॅम्प नको ! ही केवळ स्मृती राहावी, भविष्य नाही. (पृ. २४-२५).

अशा मांडणीमुळे स्थळवर्णन करणारे सांकेतिक प्रवासवर्णन या वर्गातून खोऱ्यांचे प्रवासवर्णन बाहेर पडते आणि त्याच्या आशयाला सामाजिक, सांस्कृतिक भरीवपणा येतो.

युरोपातील शिस्त आणि समृद्धी बघताना खोऱ्यांच्या मनात भारताच्या दुःख-दारिद्र्याची चित्रे जागी होतात. सुखी-समृद्ध कुटुंबवत्सल जर्मन लोक बघताना खोऱ्यांना त्यांचा हेवा वाटतो. कारण भारतातील सुखी-समृद्ध लोक बहुसंख्यांकांच्या दारिद्र्याने वेढले गेलेले आहेत. पोलंड आणि पूर्व जर्मनीतून बाहेर येताना राष्ट्र-उभारणीचा असा निर्धार आपण का करू शकत नाही, असा त्यांना प्रश्न पडतो. स्वतःच्या आत्मसामर्थ्याने, स्वतःच्या ठसठशीत अस्तित्वाने सर्व क्षेत्रांत अनिरुद्ध संचार करणारी विज्ञान युगातील युरोपिअन स्त्री त्यांना 'युरोपची युगंधरा' वाटते. या पार्श्वभूमीवर 'मुकी बिचारी कुणी हाका' अशी आपल्याकडच्या बहुसंख्य स्त्रीची अवस्था त्यांना अस्वस्थ करून जाते. 'युरोपची युगंधरा' हे प्रकरण खोऱ्यांच्या लेखन-सामर्थ्याची जाणीव करून देतेच. पण स्त्रीबद्दलचा त्यांचा आधुनिक, समताधिष्ठित आणि निकोप दृष्टिकोनही स्पष्ट करते.

युरोपातील देशांची तुलना करतानाही ही विरोधलय त्यांच्या मनात जागी असते आणि तिला समाजवादी विचारसरणीचे पाठबळ असते. नियंत्रित अर्थव्यवस्था असलेल्या पूर्व युरोपियन देशांत नखालाही न दिसलेली जाहिरातबाजी ॲमस्टरडॅमच्या विमानतळावर मोठ्या रंगेल स्वरूपात प्रवाशांचे स्वागत करीत होती, हा तपशील त्यांना खुपतो आणि पश्चिम युरोपच्या स्पर्धात्मक जगण्याची आठवण करून देतो.

जग-प्रवाशांना पॅरिस भुलवते ते तिथल्या नाईटक्लब्ज्‌साठी. खोरे मात्र पूर्व युरोपात न दिसलेले भिकारी आणि गंडवणारे गाईड आम्हाला पॅरिस, लंडनमध्ये दिसले, असा तपशील आवर्जून देतात. पूर्व युरोपचा दौरा संपवून पश्चिम युरोपमध्ये गेल्यानंतर त्यांना पश्चिम युरोप म्हणजे वाढलेल्या किमती, जाहिरातबाजी आणि रंगीली दुनिया यांचे दुसरे टोकच वाटते.

या पुस्तकाच्या मुखपृष्ठातून आतील घडामोडींवर सूचक प्रकाश पडतो. दोन युरोपांपैकी पहिली 'युरोप' ही अक्षरे पांढऱ्या रंगात निळ्या आकाशाच्या खुल्या पार्श्वभूमीवर छापली आहेत. दुसरी युरोप ही अक्षरे लाल रंगात आहेत आणि ती तळाशी उलटी पडलेली दाखवली आहेत. या दोहोंच्या मध्यभागी चर्चचा आकाशात जाणारा घुमट आहे.

कम्युनिझमच्या नावाखाली चालणारी हुकुमशाही आज पूर्व युरोपातील साम्यवादी देशांनी झुगारून दिली आहे. साम्यवादी विचाराची नवी मांडामांड आज जगात होते आहे



अनुक्रमणिका







आणि आर्थिक संकटांच्या काळात ती अपरिहार्य आहे. पण याचा अर्थ स्वातंत्र्याच्या घोषणेने सारे प्रश्न सुटले आहेत असा नाही. या बदलांचे उथळ स्वागत खोरे करत नाहीत. त्याविषयी गंभीर चिंतनही करतात.

"पूर्व जर्मनी, पोलंड, हंगेरी, झेकोस्लोव्हाकिया आणि आता रुमानिया या सर्व देशांतील लोक आपल्या आकांक्षा घेऊन पुढे आले आहेत. त्यांना नोकऱ्या हव्या आहेत. केवळ मोकळी हवा नाही. त्यांना घरे हवीत, चांगले आर्थिक जीवन हवे, केवळ लोकशाही स्थापनेची चर्चा नकोय. दुसरीकडे युरोप १९९२ साली एकसंध बाजारपेठ निर्माण करीत आहे. पूर्व युरोपच्या बाजारपेठेत आपला माल भरपूर खपेल, अशी आशा बाळगण्यात येत आहे. पूर्व आणि पश्चिम युरोप जवळ येताना ते आपले सांस्कृतिक संबंध म्हणून येणार की ग्राहक-विक्रेते म्हणून येणार, हा खरा प्रश्न आहे. कम्युनिझमच्या नावाखाली ज्या देशातील लोकांना व्यक्तिस्वातंत्र्याचा बळी द्यावा लागला त्याच लोकांना नव्या भांडवलशाही प्रधान अर्थव्यवस्थेत ग्राहक म्हणून शोषण होते आहे, असा अनुभव आला तर!" (पृ.७६-७७) खोऱ्यांना पडणारे हे प्रश्न आज विचारवंतांना आणि कार्यकर्त्यांनाही पडले आहेत.

पुस्तकाची भाषा अतिशय साधी आणि प्रवाही आहे. जाणून-बुजून भाषिक लालित्य आणण्याचा प्रयत्न कुठेही केलेला नाही. या पुस्तकात लालित्य येते ते लेखकाच्या मनात असलेल्या परिवर्तनाच्या सच्च्या आंतरिक प्रेरणेतून आणि विचारांच्या सुस्पष्ट रेखीवतेतून. खोऱ्यांमधील कार्यकर्ता कधी-कधी त्यांच्यातील लेखकावर मात करतो, ही पुस्तकातील किरकोळ असली तरी उणीव आहे. यामुळेच भारतीय स्त्रीच्या दुरवस्थेचे चित्र खोरे थोडे अधिक भडक आणि भावव्याकुळ रंगात रंगवतात. तथाकथित भारतीय मार्क्सवादी मंडळी जगात मन्वंतर घडवणाऱ्या या घटनांबद्दल चूप बसली, असे विधान ते छातीठोकपणे करतात. (पृष्ठ ८०) पण ही वस्तुस्थिती नाही.

वरील प्रश्नांची चर्चा भारतीय मार्क्सवाद्यांनी आपल्या मुखपत्रांतून केलेली आहे.

अलीकडे वृत्तपत्रांत प्रसिद्ध होणाऱ्या सदरांमुळे जशी ललित लेखनाला संख्यात्मक समृद्धी मिळाली, तशी ती प्रवासवर्णनांनाही मिळाली. देश-विदेशांतील रमणीय स्थळांची रंगीत छायाचित्रे असलेली प्रवासवर्णने वृत्तपत्रांना आपल्या रविवार-पुरवण्या भरण्यासाठी फार उपयुक्त ठरतात. यातील बरीचशी प्रवासवर्णने पारंपरिक पद्धतीने प्रवासाच्या हकिगती सांगणारी आणि स्थळवर्णनात अडकून पडणारी असतात. खोऱ्यांचे प्रवासवर्णन वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाले असले तरी त्याच्या संदर्भ-संपृक्ततेमुळे याच्या खूप पुढे जाते– आणि १९९० मधील एक महत्त्वाचे पुस्तक ठरते. यापुढील लेखनात खोरे थोडे अधिक 'आत्मरंगी' रंगले तर त्यांना राजकीय-सामाजिक संदर्भाबरोबर आत्मचिंतनातून येणारी जीवनाची तात्त्विक लयही सापडू शकेल.

साहित्याची तंत्रे वापरून केलेल्या वृत्तपत्रीय लेखनाला १९६० नंतर अमेरिकेत खूप महत्त्व मिळाले. कारण अशा साहित्याचे वास्तवाशी असलेले नाते फार जवळचे असते.



अनुक्रमणिका

शिवाय या पद्धतीचे चांगले साहित्य वर्णनपरतेच्यापलीकडे जाऊन वास्तवाचे विश्लेषण करण्यावर भर देते. खोऱ्यांचे पुस्तक मला या वर्गात टाकावेसे वाटते.

(दोन युरोप– अरुण खोरे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे ४. पृष्ठे ७२, वीस रुपये.)

(डॉ. सौ. अंजली सोमण, पुणे ४.)

## बोगी नं. ४६९२ : हरिहर आठलेकर

**प्रवासाच्या निमित्ताने रंगलेले आत्मकथन**

**पु. ल. देशपांडे**

*प्रिय आठलेकर,*

'बोगी नं. ४६९२ हे तुमचे पुस्तक हाती येताच वाचायला घेतले आणि सलग शेवटपर्यंत वाचतच गेलो. चांगल्या पुस्तकाबद्दल माझी एक माझ्यापुरती व्याख्या आहे. एकदा वाचायला सुरुवात केल्यावर जे पुस्तक 'शेवटच्या पानावर कधी आलो ते कळलंच नाही' अशी अवस्था करते ते माझ्यालेखी चांगले पुस्तक. वाचन अनायास झाले पाहिजे. पुस्तकाने वाचकाशी सलगीने बोलले पाहिजे. हे केवळ ललित वाङ्मयासंबंधीच आहे असे नव्हे. अलीकडच्या काळात प्रा. गं. बा. सरदार, माटेमास्तर, नरहर कुरुंदकर, डॉ.आंबेडकर ह्यांच्यासारख्या विचारवंतांचे लेखनही असेच सुरवातीपासून शेवटपर्यंत गुंगवून ठेवणारे आहे. अशा प्रकारची वाचनीयता हा मला कुठल्याही प्रकारच्या लेखनातला फार महत्त्वाचा गुण वाटतो. हे 'सहज बोलणे तुम्हाला लेखनात चांगले जमले आहे.'

तुमची 'साखर माणसे' वाचतानाही मला हाच अनुभव आला होता.

तुमच्या 'बोगी'त केव्हा बसलो आणि तुमच्या यात्रेतलाच एक होऊन कसा गेलो आणि यात्रेची सांगता केव्हा झाली हे ध्यानातच आले नाही. वास्तविक माझ्या प्रकृतीच्या असहकारामुळे हल्ली लेखन-वाचन बंद असल्यापैकीच आहे. काही वर्षांपूर्वी रस्त्यातून एक खिळखिळी झालेली रिक्षा चालली होती. मागे बोर्ड होता, 'हे असेच चालायचे'! सत्तरी ओलांडल्यावर आपणही पाठीवर 'हे असेच चालायचे' असं वाक्य लिहायला हवे. अशा वेळी बोगीसारखे पुस्तक हाती येणे हा एक भाग्ययोग म्हणायला हवा.

एखादी मित्रमंडळींची मैफिल जमावी आणि त्यातल्या आवडत्या– स्नेहशील मित्राकडून यात्रेची कथा ऐकताना रंग जमावा असे वाटले पुस्तक वाचताना! अति सहजपणाने एका सुसंस्कृत, रसिक आणि माणसांचा लोभ असणाऱ्या गुणवंत व्यक्तिमत्त्वाचे सुंदर दर्शन घडले. तुमचे प्रवासवर्णन हे केवळ स्थळवर्णन नाही. पुष्कळशी प्रवासवर्णने ही प्रवाशांच्या सोयीसाठी लिहिलेली 'गाइडे' असतात. तुम्ही प्रवासाच्या निमित्ताने केलेले हे

एक ऐकत राहावे असे वाटणारे आत्मकथन आहे. एका अर्थी विशिष्ट कारणाने घडलेल्या अनुभवांचे आत्मचरित्रातील एक प्रकरणच आहे. उदा. जीवनात तुमच्या गुरुजींच्या भूमिकेत असताना आलेल्या अनुभवांच्या यात्रेचेही काश्मीर यात्रेसारखेच तुम्ही प्रवासवर्णन लिहू शकाल. तुमच्या पुस्तकातून मला काश्मीरदर्शनाहूनही अधिक हृद्य दर्शन घडले ते तुमच्या व्यक्तिमत्त्वाचे. हा मला लाभलेला अनुभव मोलाचा वाटतो.

तुमच्या जगण्याची मुळे कोकणात रुजली आहेत. 'मी कुठेही असलो तरी माझ्यासोबत माझे इंग्लंड असते' अशा स्वरूपाची एका इंग्रज कवीची ओळ आहे. तसे 'कोकण' हे तुमच्या मनीमानसी रुजलेले आहे. ते तुमच्या सोबत काश्मीरातही येते. तिथल्या चिनारवृक्षांची पाने सळसळताना तुम्हाला माडांच्या झावळांची सळसळ ऐकू येते. दोन वाद्यांची जुगलबंदी सुरू व्हावी तशी कोकण आणि काश्मीर ह्यांची जोड स्वरलीला सुरू होते. आपल्या व्यक्तित्वाला घडवायला आणि सजवायला निसर्गाने आपल्या श्रीमंतीची बरसात केलेली कोकणासारखी भूमी तुम्हाला लाभावी हे तुमचे भाग्य आहे. मी शाळेत शिकत असताना वर्गातली मुले मुंबईहून सुट्टीत आपापल्या गावी जायची. माझी आजी मला कारवारला न्यायची. त्या काळात मनावर उमटलेला नारळी-पोफळीचा आणि समुद्राच्या पुळणीचा संस्कार आजही कधी कधी नारळीच्या बागांच्या आणि काजू-फणसांच्या सहवासासाठी तहानेला होतो. कोकणच्या भूमीचे मार्दव सांगणारी, तुमच्या जिव्हाळ्याने भरलेल्या लेखनातून प्रकटलेली लवलव मला खूप सुखावून गेली. कोकणातली निसर्गसंपदा आणि तिथे तुम्हाला भेटलेली साखर-माणसे यांनी तुम्हाला खूप श्रीमंत केले आहे. तुमच्या लेखनातून सतत दिसणारा धामापूर पाट परूळे, नळेरपार, वालावली हा प्रदेश मी पाहिला आहे.

वालावलीच्या नारायणाच्या देवळात गप्पांचा अड्डा जमवला आहे– आणि भटाला सांगू नये पण ताज्या फडफडित मासळीचा स्वाद चाखत, दुष्टा इतक्या लवकर येई न मरणा असेही म्हटले आहे. धामापूर हे माझ्या कारभारणीचे गाव. तिथल्या ठाकूर कुळात तिचा जन्म. त्या परिसराची श्रीमंती अंकगणिताने मोजता येणार नाही. ती मनाला जाणावी लागते. काश्मीरात जा नाहीतर युरोपात जा तिथे पाहण्यासारखा असतो मुख्यतः माणूस. त्या शोधात तुमची यात्रा ! तुमच्या सोबत चालण्याचा सुंदर अनुभव दिलात. धन्यवाद.

(बोगी नं. ४६९२ हरिहर आठलेकर, सावंतवाडी. पृष्ठे १४०. चाळीस रुपये.)

(पु. ल. देशपांडे, १ रुपाली, ७७७ शिवाजीनगर, पुणे ४.)

---

**साभार-स्वीकार**

**१०. काफला–** सं. सुरेश भट-अविनाश कांबळे, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे– १५५, तीस रुपये.

**११. आव्हान–** सं. शिरीष पै, विजया संगवई, कॉंटिनेटल, पुणे-३०, पृष्ठे– ७५, पंचवीस रुपये.

**१२. अर्वाचीन संत गाथा–** सं. ज. वा. जोशी, सुचीता जोशी, कॉंटिनेंटल, पुणे-३०, पृष्ठे– ५३४, एकशेवीस रुपये.

# आदिकाळोख : गुरुनाथ धुरी
## कवितेशी जवळीक साधणारे ललितलेखन

**भालचंद्र गुजर**

आपल्या वैशिष्ट्यपूर्ण कवितालेखनाने लक्ष वेधून घेणाऱ्या गुरुनाथ धुरी या चिंतनशील कवीचा 'आदिकाळोख' हा ललितलेखसंग्रह. यात सोळा लेख ग्रथित झालेले आहेत. गतकाळातील स्मृती आणि वर्तमानाशी त्यांचा लावलेला अन्वय, सहवासात आलेल्या व्यक्तींची शब्दचित्रे, साहित्य जगतातील घडामोडी, कवितानिर्मितीची प्रक्रिया असे काही विषय हाताळले गेलेले आहेत. त्यामुळे लेखन व्यामिश्र होते आणि लेखकाचा विस्तृत अनुभूतिपरिसर लक्षात येतो.

'आदिकाळोख' मधील बऱ्याच लेखांना व्यक्तिगत जीवनानुभूतींची पार्श्वभूमी लाभलेली आहे. या अनुभूती जशा दृश्य पातळीवरील तशाच वैचारिक पातळीवरीलही आहेत. कोकणातील गरीब लोकजीवन आणि श्रीमंत निसर्ग, कवितेचे आकर्षण, ज्ञानाच्या कक्षा रुंदावत असताना त्याला अडसर होऊ पाहणारे घरातील विसंवादी वातावरण, वडिलांचा दरारा आणि आईची अहायता हे व असेच काही तपशील या लेखांद्वारे व्यक्त होतात.

'आदिकाळोख' या लेखात, कॉलेजमध्ये तास घेताना महानुभाव साहित्यातील 'आदिमल' या संकल्पनेचे विश्लेषण करीत असता धुरींचे मन लहानपणातील कोकणातल्या घराकडे वळते. बालपणी त्यांनी अजाणतेपणी काड्यापेटीत फुलपाखरू कोंडून ठेवलेले असते. ते मरण पावते. त्याच्या आठवणीने, 'आज आपण ज्या भव्य अमर्याद पोकळीत जगत आहोत तीदेखील मृत्यूचीच पोकळी आहे. तिला मृत्यूचा गंध आहे. क्षणाक्षणाला मीच मला कुरतडतो आहे. माझे पाय बांधणारे, मला काड्यापेटीत कोंडणारे अहंचे, स्वार्थाचे, लोभाचे हात माझेच आहेत...' असा धुरींना साक्षात्कार होतो. ते म्हणतात : 'विनाशाची अपरिहार्यता कळणे हाच तर मुक्तीचा अर्थ नसेल !' साध्या घटनाप्रसंगाकडून तत्त्वज्ञानाच्या प्रदेशाकडे घेऊन जाणारा हा विचारप्रवास आहे. बांधला जाणारा : बद्ध आणि बांधणारा हे द्वैत मावळते आणि दोन्ही घटक एकरूप होतात.

**व्यक्तिमत्त्व साकारते–**

धुरींवर बालपणी जे संस्कार झाले : त्यांनी जे काही अनुभव घेतले, त्याद्वारे त्यांचे व्यक्तिमत्त्व सिद्ध झाले. त्यांच्या मनातील कोवळीक जळून गेली. भावविश्वाला तडे गेले आणि एकूणच जीवनाबद्दल अंधश्रद्धा हा स्थायिभाव झाला, त्याचे प्रत्यंतर 'आदिकाळोख'

मधील जवळपास सर्वच लेख देतात. 'लांडगे' हा रूपकात्मक लेख आहे. गावात लांडगे आल्याची अफवा पसरते. त्यामुळे माणसे घाबरतात पण त्याच वेळी त्यांच्या मनातील सभ्यतेच्या आणि संस्काराच्या थराखालील पाशवी वृत्ती उफाळून येतात आणि मग माणसेच लांडगे होऊन गावभर अत्याचार व बलात्कार करीत फिरू लागतात. लांडगे बाहेर नाहीत; ते आपल्या आतच आहेत. कोणत्याही क्षणी ते बाहेर येतील आणि विश्वाचा नाश करतील, असे धुरी सूचित करतात. 'कुजबूज' आणि 'महाप्रयाण' हे लेखही याच मनोवृत्तीतून निर्माण झालेले आहेत. 'कुजबूज' मध्ये अटळ आणि सतत होणारी कुजबूज, तर 'महाप्रयाण' मधील लेखकाच्या वाट्याला आलेले दिल्लीसारख्या महानगरातील एकाकीपण, अंगावर घाव घालायला टपून बसलेली माणसे, या साऱ्यांतून मनावर असुरक्षिततेचे गडद सावट पडते. त्यांना 'जनवासा'त चिता पेटवून बसलेला अस्तित्ववादी नायक देवदास आणि 'विजनवासात नंदवनवन' निर्माण करणारा रॉबिनहूड ही दोन्ही परस्परविरोधी व्यक्तिमत्त्वे आवडतात. त्यांच्या परस्परसंबंधाचा अन्वय धुरींनी मार्मिकपणे स्पष्ट केला आहे. 'एका लेखकाची संध्याकाळ' मध्ये एका दलित साहित्यिकाच्या स्मृतिदिनानिमित्ताने खुद्द दलित समाजापासून ते सरकारी अधिकाऱ्यांपर्यंत निर्माण झालेल्या भ्रष्टाचारी वृत्तीचा लेखकाने उपरोधपूर्ण समाचार घेतला आहे.

**सर्जनशीलतेचा मागोवा**

बालपणीच्या संस्कारांनी धुरींची 'माणूस' म्हणून जडणघडण जशी निश्चित केली, तशीच कवी या नात्यानेही केली. धुरींनी आपल्या सर्जनशीलतेचा मागोवा घेताना 'ओऽग्लोरिया' या कवितेची जन्मकथा निवेदन केली आहे. 'अनुभव दिसला पाहिजे आणि ऐकू आला पाहिजे' या संपादकाच्या सांगण्याने धुरी अस्वस्थ होतात. याच सुमारास प्रेमभंगामुळे मनाच्या उद्विग्न अवस्थेत एके रात्री ते लोकलमध्ये चढतात. तेथे तीन ख्रिस्ती तरुण त्यांना भेटतात. नाताळचे दिवस जवळ आलेले असतात. ते तरुण 'ओ ग्लोरिया' हे गाणे गाऊ लागतात. गाण्याची धुंदी चढते. ते तरुण नाचू लागतात. गाण्याची लय वाढते. त्यांच्या सावल्या एक होतात. त्यांचा आवाज एक होतो. त्या तिघांच्या गाण्यातील तीन ग्लोरियांही एकरूप होतात. – आणि मग ग्लोरिया ही समग्र विश्वव्यापाराच्या आदिशक्तीचे जणू सुंदर प्रतीकच होते. धुरींची प्रेयसीही ग्लोरिया होते. त्या अवस्थेत ते, 'ग्लोरिया' ही सुंदर कविता लिहितात. व्यक्तिगत अनुभूतीची समग्र मानवी अनुभूतिविश्वाशी जुळलेली एकतानता, निर्मितीच्या क्षणाची अनाकलनीयता, सृजनशक्तीची धुंदी आणि कलानिर्मितीच्या अंगी दुःखाचा निरास करण्याचे असलेले सामर्थ्य, हे सारे धुरी सांगतात तेव्हा 'ओऽ ग्लोरिया' या कवितेइतकीच तिची निर्मितीप्रक्रिया तरल असल्याचे जाणवते.

'गंधे कोंदाटले जग' आणि 'अनोळखी प्रदेशात' हे लेख सर्जनशीलतेच्या प्रेरणा स्पष्ट करतात : 'गंधे कोंदाटले जग'मध्ये गंधसंवेदनेचे सामर्थ्य स्पष्ट केलेले आहे. धुरी म्हणतात.

'जुनी माणसे, जुन्या स्मृती मनात जिवंत करणारे, चेतवणारे, उद्दीपित करणारे, निराश बनवणारे, कंटाळा आणणारे, आशा पल्लवीत करणारे, प्रियजनांच्या भेटीसाठी उत्सुक बनवणारे– कितीतरी वास वातावरणात कोंदाटून राहिले आहेत.' सुगंध हा सर्वव्यापी असला, तरी त्याची कलाकृती मात्र होऊ शकत नाही असे सांगून धुरी सुगंधाची मर्यादा स्पष्ट करतात.

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या नायगाव येथील संदर्भविभागाजवळच्या कट्ट्यावर धुरी आणि त्यांची मित्रमंडळी जमत असत. नवी कविता लिहिणारे, 'सत्यकथे'वर चिडणारे हे कवी तेथे एकत्र येत. कविता वाचून दाखवत. कालान्तराने हे कवी पांगले. काही संसारमार्गी लागले. काही कवी म्हणून संपले. काही वर्षांनी धुरी त्या स्थळाला भेट देतात, तेव्हा त्यांच्या पूर्वस्मृती जागृत होतात. 'कवीची कट्टा' नष्ट झाला असे त्यांना वाटते. ते खंतावतात. पण नंतर त्यांच्या लक्षात येते की, आजही तेथे नव्या जाणिवेचे कवी एकत्र येतात. कविता वाचतात. चर्चा करतात. 'कवीचा कट्टा' हे केवळ स्थळ नसते; तर ती एक प्रवृत्ती असते. जुने कवी जातात; नवे कवी येतात. कट्ट्याची परंपरा चालूच राहते !

'मर्ढेकर, तुम्ही कुठे आहात?' हा 'आदिकाळोख'मधील एक लक्षणीय लेख. मर्ढेकरांनी मराठी कवितेत नवे युग सुरू केले. उत्कट आत्मनिष्ठा, अस्तित्ववेदनेचा घेतलेला शोध, शब्दांशी इमान, सामाजिक मूल्यविचारांची प्रगल्भ जाण हे मर्ढेकरांचे लेखनविशेष ! पण त्यांच्या नंतरच्या कवींनी ही समृद्ध परंपरा जोपासली नाही. ते आत्मनिष्ठा विसरले, त्यांनी मूल्यपरंपरा मोडली, त्यांनी स्वतःला अनेक पातळ्यांवर विकून घेतले– आणि एकूणच मराठी कवितेला बकाल अवकळा आणली. याबद्दल धुरींनी खंत व्यक्त केली आहे. 'दुःखसम्राज्ञीची अम्लान कविता' या लेखात मीनाकुमारी या अभिनेत्रीच्या कवितांचे रसग्रहण केलेले आहे. एकाकीपणाचे दुःख तिच्या कवितांतून विविध प्रतिमांच्या द्वारे व्यक्त होते, त्याचा शोध घेतला आहे.

'आदिकाळोख'मध्ये आत्मचरित्राचा एक बळकट धागा आरपार गेला आहे. त्यामुळे धुरींच्या व्यक्तिमत्त्वाचे काही पैलू प्रकाशमान होतात. हे लेखन बऱ्याच वेळा कवितेशी जवळीक साधते– भाषेचा पोत गर्भरेशमी होतो. 'संवेदनांवर साचणारी व्यवहाराची धूळ', 'निखळ आदिम स्त्रीत्वासारखा मातीचा सुवास', 'अस्तित्वाच्या झाडाला येणारी काळोखाची पाने-फुले' – अशा प्रतिमा लेखनात येतात. काव्यसंग्रहासारखाच अर्थसंपृक्त असा हा संग्रह वाटतो.

(आदिकाळोख : गुरुनाथ धुरी, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई ४. पृष्ठे १३४ साठ रुपये.)

(भालचंद्र गुजर, २४/४ इंदिरा सदन, भिडे बाग, देवपूर, धुळे ४२४००२.)



अनुक्रमणिका







# कोरा कॅनव्हास : प्रभाकर बरवे
## कुंचल्यामागच्या मनाचे चिंतन

**संतोष शेणई**

मौज प्रकाशनाने यापूर्वी माधव आचवल या वास्तुकलावंताला 'किमया'मधून लिहिते केले होते. तर, कलाजगताविषयी रसाळ आठवणी सांगणाऱ्या प्र.अ. धोंड यांना 'रापण'मध्ये बोलते केले होते. मार्च १९९० मध्ये कुंचल्यामागचे मन 'कोरा कॅनव्हास' मधून व्यक्त झाले आहे. प्रथितयश चित्रकार प्रभाकर बरवे यांनी आपल्या सर्जनप्रक्रियेविषयीचे चिंतन येथे मांडले आहे.

प्रामुख्याने चित्रनिर्मितीच्या काळात आणि त्यापूर्वी सुरू असलेल्या कलावंताच्या मनोव्यापाराचा हा शोध आहे. या शोधामुळेच अनुभवसिद्ध निर्णय आणि मराठीतील चित्रकलेच्या रूढ चर्चेपेक्षा वेगळी व अधिक सौंदर्याधिष्ठित चर्चा येथे आढळते.

आकार, अवकाश व रंग या माध्यमांतून सौंदर्याचा उत्स्फूर्त आविष्कार करीत अमूर्ताचा शोध घेणे हे या लेखनाचे सूत्र आहे. चित्रकृती म्हणजे आकार, अवकाश व रंग यांची रूपरचनातत्त्वानुसार केलेली संघटना असते. चित्रकलेत आकार स्वयंभू असतो. आकारांतून प्रतिमांची निर्मिती होते. पूर्वी निर्माण केलेल्या आकारांच्या मोहात न पडता नवे आकार शोधले तरच नव्या प्रतिमांची निर्मिती होऊ शकेल. आकार व रंग ही अवकाशाची रूपे आहेत अशी लेखकाची भूमिका आहे.

सर्व ज्ञानेंद्रियांनी रंग समजून घ्यायचा असतो हे रंगाचे मर्म श्री. बरवे उलगडून दाखवतात. भरताने रंगाचे नाते विविध रसांशी जोडले होते. व्हॅन गॉफने रंगाचे नाते स्वरांशी जोडले होते. बरवे रंगाचे नाते भावभावनांशी जोडतात. अनपेक्षितपणा हा रंगाचा स्थायीभाव आहे. त्यामुळे संपूर्ण नवा अनुभव निर्माण करण्याची क्षमता रंगांमध्ये असते, असे लेखकाचे मत आहे.

या लेखनातील लालित्यही आपणाला तितकेच मोहवते. विषयाचे अगदी साधे-सोपे निरूपण चाललेले असते, पण त्यातूनच एक वेगळ्या प्रकारचा बिकट आकार हे लेखन धारण करते.

'गवतावरचे इवले' रंग टिपणाऱ्या या चित्रकाराला 'माझ्या प्रत्येक श्वासाबरोबरच चंद्र आकाश चढत होता' असे वाटते, तेव्हा त्यांच्यातील कवी आपल्याला दिसतो. तर, 'जीवन जरी या सर्वांनी व्यापून संमिश्र झालेले असले तरी निर्मितीक्षण हा त्यापासूनच्या मुक्ततेचा क्षण असू शकतो. आणि म्हणूनच माणसाच्या 'अहं'शी निर्मितीला कर्तव्य नसते. सर्वस्वी शरण गेल्याशिवाय सृजनक्रिया संभवत नाही' असे तत्त्वचिंतनही येथे आढळते.



अनुक्रमणिका








त्यांच्या चित्रात स्त्री येते तीही निर्मितीची प्रतिमा म्हणून. खरे तर, त्यांच्या चित्रात स्त्री येतच नाही, येते ते तिचे स्त्रीत्व. वास्तवता त्यांना मान्य आहे. पण वास्तवतेच्या मर्यादा ओलांडल्या पाहिजेत हा त्यांचा आग्रह आहे. त्यांचे चित्र केवळ दृश्य परिणाम दाखविणारे नसते; तर समग्र दृश्य अनुभवांचे नवे भान देणारे असते. 'निःस्वन' या त्यांच्या चित्रात अपुरे पान, इमारतीचा अंश, भिंतीचा तुकडा या घटकांची मांडणी त्या वातावरणातील नीरवता व्यक्त करते. त्यांचे चित्रकार म्हणून वेगळेपण येथे जाणवते.

पण काटेकोर सैद्धांतिक शिस्तीत विचार करणे हा त्यांचा स्वभाव नाही. त्यामुळे काही वेळा त्यांच्या सैद्धांतिक विधानात विसंगती येते. पण त्यांनी स्वीकारलेल्या लेखनाच्या रीतीमुळे ती चटकन नजरेस येत नाही. ते प्रथम दृश्य जगाच्या निरीक्षणांतून त्यांना भावलेली संवेदना सुट्या सुट्या वाक्यांतून व्यक्त करतात. त्यातून अगदी सहजतेने आपल्या सर्जन प्रक्रियेकडे वळतात. वरवर पाहता, विस्कळित दिसणाऱ्या या संवेदनाची मांडणी त्यांचे या विश्वाच्या पसाऱ्याबद्दलचे प्रश्नांकित कुतुहल वाचकांपर्यंत विनासायास पोहोचवते. भावस्थितीला आकार देणे हा इथला मुख्य उद्देश असतो, तो सफल होतो. त्यामुळेच सैद्धांतिक विधानातील विसंगतीकडे दुर्लक्ष होते.

हे चिंतन सर्जन प्रक्रिया सूचक आहे, तितकेच रसव्यंजकही आहे. 'जाणिवा', 'अनुभूती आणि प्रतिमा', 'प्रेरणा' ही प्रकरणे वाचनीय आहेत. छपाई मौजच्या परंपरेला साजेशी आहे. अन्य निर्मिती शक्यतांचा शोध घेत गजानन भागवत यांनी पुस्तकाची शोभा वाढवली आहे.

(कोरा कॅनव्हास— प्रभाकर बरवे, मौज प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १५९. एकशेवीस रुपये.)

(संतोष शेणई, केसरी कार्यालय, नारायण पेठ, पुणे ३०.)

---

## एकनाथकालीन मराठी साहित्य : इनामदार, जोशी
### एका वाङ्मयीन कालखंडाचा साक्षेपी अभ्यास

डॉ. ल. रा. नसिराबादकर

---

विशिष्ट ग्रंथकार अथवा वाङ्मयेतिहास या अभ्यासविषयांवर मराठीत अनेक ग्रंथ निर्माण होत आहेत. पण एखादा विशिष्ट कालखंड समोर ठेवून त्यातील राजकीय, सामाजिक व धार्मिक परिस्थितीचा वेध घेत, तत्कालीन सांस्कृतिक पर्यावरणाचे आकलन करीत त्याचा वाङ्मयनिर्मितीशी अनुबंध शोधणाऱ्या, युगधर्माशी निगडित अशी स्वरूपमीमांसा करणाऱ्या ग्रंथांची आजही मोठीच गरज आहे. डॉ. हेमंत इनामदार व डॉ. वसंत जोशी यांचा 'एकनाथकालीन मराठी साहित्य' हा ग्रंथ म्हणजे प्रस्तुत दिशेने टाकलेले एक महत्त्वाचे पाऊल म्हणता येईल. कोणत्याही कालखंडातील वाङ्मयनिर्मिती तत्कालीन



अनुक्रमणिका





सांस्कृतिक पर्यावरणातून होत असते, तिच्या पाठीशी काही एक युगधर्म असतो, त्यातूनच लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण होत असते; आणि जीवनधारणाही आकार घेते असे एक मत आहे. एखाद्या कलाकृतीचे रूप विशिष्ट असे का, या प्रश्नाचे उत्तरही तत्कालीन सांस्कृतिक पर्यावरणातून, युगधर्माकडून मिळू शकते.

ही भूमिका स्वीकारून हे पुस्तके सिद्ध केले आहे. 'काळाचा मागोवा', 'संत एकनाथ', 'एकनाथांची प्रभावळ', 'नाथ परंपरेतील काही अल्पज्ञात कवी', आणि 'नाथकालीन साहित्याची फलश्रुती' हा प्रकरणक्रम या संदर्भात लक्षात घेण्यासारखा आहे. भूमिका, चौदाव्या शतकातील दुष्काळ, सुफी संप्रदायाचा प्रभाव, धार्मिक परिस्थिती, नवीन विचारसंप्रदायांचा उदय, वारकरी संप्रदायाचे वेगळेपण, नाथकालीन महाराष्ट्राचे बदललेले स्वरूप, वाङ्मयीन परिस्थिती, संस्कृत-प्राकृत संबंध, काव्यविषयक दृष्टिकोन, या काळात पुढे आलेले व पूर्वीचे विकसित झालेले वाङ्मयप्रकार; तसेच वाङ्मयरचनेचे अल्प प्रयत्न अशा अनेक अंगांनी येथे हा मागोवा घेतलेला आढळतो. सामाजिक जीवनात मूल्यहीनता, सत्त्वशून्यता, यामुळे नैराश्य येते तेव्हा कुणाही संवेदनशील प्रतिभावंताला आदर्शाचे स्मरण होणे स्वाभाविक असते. त्या दृष्टीने नाथांना आदर्शभूत श्रीरामचरित्राचे स्मरण झाले असावे. 'केवळ निर्गुणोपासना प्रापंचिक जीवनात उत्साह निर्माण करण्यास असमर्थ होती', ही कारणमीमांसा यथार्थ अशीच आहे. पण स्वातंत्र्यातले जीवन कसे जगावे, व त्यासाठी कोणत्या मूल्यांची उपासना करावी, याकडेही नाथांनी तितकेच लक्ष दिले असून त्याविषयीचे प्रतिपादन भागवताधारे केले आहे, हे देखील लक्षात घ्यावयास हवे. रामचरित्राद्वारे नाथांनी राष्ट्रीय स्वातंत्र्याचे दिग्दर्शन केले, तर भागवतातून सामाजिक संस्कारांचा आदर्श उभा करून लोकमानस घडविण्याचा प्रयत्न केला, या अंगाने येथे विवेचन केले असते, तर प्रस्तुत प्रकरणाच्या मौलिकतेत भरच पडली असती. या कालखंडातील वाङ्मयीन कृतींचे विवेचन करताना त्यांच्या निर्मितिप्रेरणांचा शोध, स्थितीच्या आणि युगधर्माच्या संदर्भात घेतला असता तर तो अधिक उपयुक्त ठरला असता.

दुसऱ्या प्रकरणात संत एकनाथांच्या जडणघडणीचा मागोवा घेत त्यांच्या काव्यनिर्मितीचे स्वरूप स्पष्ट केले आहे. नाथ भागवत, रुक्मिणीस्वयंवर, भावार्थरामायण आदी ग्रंथांचे अंतरंग उकलून दाखविले आहे. मूळ प्रेमकथेला आध्यात्मिकतेची गडद डूब देणे आणि कालविपर्यासाचा दोष पत्करून स्वकालाचे चित्रण करणे हे नाथांचे वैशिष्ट्य असले, तरी त्यामुळे रुक्मिणीस्वंयवरातील काव्यात्मतेला बरीच झळ पोचली आहे. म्हणून 'रुक्मिणीस्वयंवरने आख्यानकाव्याची एक नवी परंपरा मराठीत निर्माण केली असली, तरी तीमुळे काव्यदृष्ट्या काही अपप्रवृत्तीही निर्माण झाल्या;' हे लेखकांचे मत विचारार्ह ठरते. भावार्थरामायणातील युद्धकांडाच्या चव्वेचाळीस अध्यायानंतरचे सर्वच लेखन गावबाचे, या पारंपरिक समजुतीला डॉ.शं.गो.तुळपुळे यांनी दिलेल्या छेदाचे स्मरण लेखकाने करून दिले असून, उपलब्ध पुराव्यांधारे यासंबंधीचे दिलेले मत लक्षणीय वाटते.

(१) प्रचलित मुद्रित प्रतीतील युद्धकांडाच्या ४४ व्या अध्यायापर्यंतची रचना एकनाथांची.

(२) पंचेचाळीस ते नव्वद हे अध्याय बहुधा गावबाचे.

(३) ५४ वा अध्याय जयरामसुताचा, आणि

(४) उत्तरकांड हे कोण्या अनाम कवीचे, अशा चार व्यक्तींचा हातभार भावार्थरामायणाच्या परिपूर्तीसाठी लागला असे प्रतिपादन केले आहे. 'वंशपरंपरेचा वाद', व 'एकनाथांची गुरुपरंपरा' ही परिशिष्टे अद्ययावत संशोधनाधारे नाथचरित्रावर प्रकाश टाकत असल्याने महत्त्वाची ठरतात. विविध सांप्रदायिक प्रवाह व त्यांची वाङ्मयनिर्मिती यांचा शोध, परंपरा आणि प्रभाव अशा दोन्ही अंगांनी नाथप्रभावळीत येणाऱ्या कवींचा परामर्श तिसऱ्या प्रकरणात घेतला आहे.

कवी आपल्या काळातून जशा प्रेरणा-संस्कार घेतो, तसे आपल्या काळालाही तो काही देत असतो. नाथांनी आपल्या युगाला काय दिले? एकीकडे ज्ञानदेव-नामदेव आणि दुसरीकडे संतश्रेष्ठ तुकाराम-रामदास असे दोहों बाजूस लोकोत्तर पुरुष घेऊन उभ्या असलेल्या नाथांनी जुन्या संत परंपरेचा काहीसा खंडित झालेला धागा नव्याने जोडून घेतला, तसेच पुढच्या पंडिती परंपरेचा उपन्यासही केला. नाथवाणीच्या प्रासादिकतेने त्यांच्या समकालीनांची तर जीवने आणि कवने भारावून गेलीच, पण उत्तरकालीनांनाही नाथांचे चारित्र्य व संपन्न ग्रंथभांडार प्रेरक ठरले. त्यांच्या रामायणाचा प्रभाव पुढील अनेकांवर आढळतो. पण भारूडसदृश लोककविता मात्र या प्रभावळीत आढळत नाहीत. (नाथांच्या कवित्वाचे अनुकरण सोपे असले, तरी त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील समाजमनस्कता हा अलौकिक विशेष, अनुकरणाने येण्यासारखा नव्हता, हे तर कारण नसावे?) नाथप्रभावळीतील कवींना नाथांच्या व्यक्तित्वातील ज्या शलाका विशेष आवडल्या, त्यांच्या प्रकाशात त्यांनी आपल्या रचना केल्या, अशी अभ्यासपूर्ण आणि समतोल वृत्तीतून नाथवाङ्मयाची फलश्रुती लेखकांनी सांगितली आहे. पण या फलश्रुतीला आणखीही काही पैलू आहेत. आपला विचार पंडित, सांसारिक, आणि जनसामान्य अशा तीनही स्तरांपर्यंत पोचविण्यासाठी जाणीवपूर्वक काव्यरचना करणारा या अर्थाने 'महाराष्ट्राचे लोकनाथ' हे बिरूद त्यांना लागू पडते. आपली वाणी, लेखणी, व करणी यांद्वारे समाजमनातील धर्मभावना त्यांनी जागृत केली; व स्वतंत्रतेतील जीवन जगण्यास समर्थ असे लोकमानस घडविले. त्यामुळे 'महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग' उदयाला आला. युगधर्म, प्रमुख ग्रंथकार, प्रभावळ, प्रवाह आणि फलश्रुती अशा क्रमाने एकनाथकालीन वाङ्मयनिर्मितीचा हा परामर्श मार्गदर्शक ठरेल.

(एकनाथकालीन मराठी साहित्य— डॉ. हे. वि. इनामदार, डॉ. वसंत स. जोशी. दिलीपराज प्रकाशन, पुणे २. पृष्ठे १२२. पंचेचाळीस रुपये. प्रथमावृत्ती-ऑगस्ट ९०)

(डॉ. ल. रा. नासिराबादकर, आर-३, शिवाजी विद्यापीठ बंगला, कोल्हापूर ४१६००४)



अनुक्रमणिका






# मराठी व्याकरण विवेक : मा. ना. आचार्य

## व्याकरणाचा व्यापक विचार

डॉ. कल्याण काळे

'मराठी व्याकरण विवेक' हे मराठीच्या पारंपरिक व्याकरणाच्या क्षेत्रातील ताजे पुस्तक. त्याचे लेखक प्रा. मा. ना. आचार्य हे या क्षेत्रातील एक व्यासंगी अभ्यासक आहेत. आजवरच्या त्यांच्या चिंतनाची सुसंगत मांडणी करणारा हा ग्रंथ आहे. या ग्रंथात मराठी व्याकरणाची तपशीलवार माहिती नसून, व्याकरणातील विवाद्य प्रश्नांची चर्चा केलेली आहे.

मराठी व्याकरणाच्या १८० वर्षांच्या परंपरेत शंभरावर ग्रंथ निर्माण झालेले आहेत. शालेय पातळीवरील परिचयात्मक ग्रंथ सोडले, तरी ४०-४५ ग्रंथ दखलपात्र ठरतील. त्यात प्रामुख्याने तीन प्रवाह दिसून येतात. १) काही ग्रंथ अ-मराठी भाषकांना मराठी भाषा शिकवण्यासाठी तयार झालेले आहेत. २) मराठी व्याकरणाची तपशीलवार मांडणी करणाऱ्या घडणकारांचे ग्रंथ उदा. दादोबा पांडुरंग, रे.नवलकर, रा. भि. जोशी, मो. के. दामले, सबनीस. ३) या दोन प्रवाहांहून भिन्न असा प्रवाह म्हणजे वरील व्याकरणकारांनी केलेल्या व्याकरणांची चिकित्सापूर्वक पहाणी करणाऱ्या परीक्षणकारांचा होय. त्यांमध्ये कृष्णशास्त्री चिपळूणकर, रा. भि. गुंजीकर, वि. का. राजवाडे, गो. कृ. मोडक, अरविंद मंगरूळकर व कृ. श्री. अर्जुनवाडकर यांचा समावेश होतो. हे तिन्ही प्रवाह एकमेकांपासून पूर्णपणे भिन्न आहेत, असे नव्हे. तिन्ही प्रवाहांतील ग्रंथकारांनी आपापल्या परीने घडण आणि परीक्षण अशी दोन्ही कार्ये केली आहेत. पण त्यांच्या कार्याचा भर लक्षात घेऊन त्यांचा त्या त्या वर्गात समावेश केलेला आहे.

नामवंत विद्वानांची ही परंपरा दीर्घ असली, तरी तिच्यातून सिद्ध झालेलं मराठी व्याकरण शास्त्रीयत्वाच्या कसोटीवर फ़ारशी प्रगती करू शकलेलं नव्हतं. "शास्त्राच्या नकाशावर मराठी वाङ्मय (अर्थात व्याकरणावरील) अजून शैशवावस्थेमध्ये आहे," असे अर्जुनवाडकर १९८६ मध्येही म्हणतात. कारण, मराठी व्याकरणाची उभारणी चुकीच्या पायावर आणि चुकीच्या दिशेने होत राहिली.

मराठीमध्ये व्याकरणग्रंथांची निर्मिती झाली, ती शाळाखात्याच्या गरजेतून. आरंभीचे व्याकरणग्रंथ, मराठी हा विषय शालेय अभ्यासक्रमात आहे म्हणून तयार झाले. आरंभीच्या व्याकरणकारांनी संस्कृत व इंग्रजी व्याकरणग्रंथ आदर्श म्हणून समोर ठेवून, आपापली व्याकरणे तयार केली. इंग्रजीचे व्याकरणग्रंथही सदोष पायावर रचले गेले होते. त्यामुळे त्यांच्यावरून बेतलेले मराठी ग्रंथही चुकीच्या दिशेने भरकटत गेले. संस्कृत व्याकरणग्रंथांचे अनुकरण करतानाही त्या व्याकरणाच्या रचनेऐवजी व्याकरणाच्या तपशीलावर भर देण्यात

आला. त्यामुळे ते अनुकरणही चुकीचेच ठरले. यातच प्रभावांच्या अनुषंगाने आलेले तर्कशास्त्राचे लोढणेही मराठी व्याकरणाने आपल्या गळ्यात घालून घेतलेले दिसते. मराठीला संस्कृतचा वारसा लाभलेला असल्यामुळे संस्कृतच्या आधाराने मराठी रूपे सिद्ध करण्याचीही जबाबदारी आपल्या व्याकरणावर येऊन पडली. व्याकरण कशासाठी करायचं, हेच ठामपणे कळलेलं नव्हते. चांगले बोलायला किंवा लिहायला शिकवणे हेच व्याकरणाचे प्रयोजन असा समज होता. अशा तऱ्हेने प्रयोजन, प्रमेय आणि प्रमाण यांच्या निर्धारणाच्या अभावी ही व्याकरणे भरकटत गेली.

या परंपरेला परीक्षणकारांनी शास्त्रीय दृष्टी देण्याचा प्रयत्न केला. पण आरंभीच्या परीक्षणकारांवरही पूर्वसूरींचा प्रचंड प्रभाव असल्याने त्यांचंही चिंतन मर्यादाबद्धच राहिलं. व्याकरणाचं प्रयोजन, प्रमेय आणि प्रमाणं यांचा शास्त्रीय विचार पूर्णांशाने करायला तेही अपुरे पडले. त्यांना मधून मधून शास्त्रीय सत्य दिसत होतं, पण त्याचं सामग्र्याने दर्शन कुणाला घेता आलेलं नव्हतं. अर्जुनवाडकर म्हणतात, "मराठी व्याकरणावर, व्याकरण म्हणून आणि शास्त्र म्हणून येणाऱ्या ज्या जबाबदाऱ्या आतापर्यंत दाखविल्या, त्यांची जाण आजवरच्या मराठी वैयाकरणांना काहीच का नव्हती ? होती. अर्थात् ज्याला जे कळलं, त्याला तो पूर्णतत्त्व समजला. त्याला अनुकूल तेवढ्याच गोष्टी त्यानं हिशेबात घेतल्या. प्रतिकूल गोष्टींकडे दुर्लक्ष केलं." (मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद, पृ.७६)

गतानुगतिकत्वामुळे आणि प्रमाण-प्रमेयांच्या योग्य विचाराच्या अभावी, आवर्तात सापडलेल्या मराठी व्याकरणाला शास्त्रीय प्रवाहात आणण्यासाठी कृष्णशास्त्री चिपळूणकर व रा. भि. गुंजीकर यांनी हातभार लावला. पायाशुद्ध भूमिकेवर तसा प्रयत्न करणाऱ्यांमध्ये गो. कृ. मोडक, अरविंद मंगरूळकर व कृ. श्री. अर्जुनवाडकर यांचा निर्देश करावा लागेल. प्रा. मा. ना. आचार्य यांचा या मालिकेतच विचार करावा लागेल.

या पुस्तकामध्ये प्रा. आचार्यांनी मराठी व्याकरणातील विवाद्य असे सर्व प्रश्न स्तरशः हाताळले आहेत. त्यासाठी व्याकरणासंबंधीची स्वतःची शास्त्रीय भूमिका पक्की करून, तिच्या आधारावर सर्व प्रश्न उलगडण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. प्रत्येक प्रश्नावर पूर्वसूरींचे विचार थोडक्यात मांडून व त्यांची ग्राह्याग्राह्यता ठरवून, शेवटी स्वतःचं मत त्यांनी मांडलं आहे. एखादा प्रश्न हाताळण्याची त्यांची पद्धती व त्यावरील त्यांचे निष्कर्ष प्रा. अर्जुनवाडकरांच्या हाताळणीशी व निष्कर्षांशी खूप जुळणारे आहेत, याची त्यांना जाणीव असून प्रस्तावनेमध्ये त्यांनी त्याचं स्पष्टीकरणही दिलं आहे. पण अर्जुनवाडकरांच्या पुस्तकातील पाल्हाळ, उपरोध, उपहास हे विशेष आचार्यांनी कटाक्षाने टाळले आहेत. त्यामुळे हे पुस्तक सुबोध आणि सुटसुटीत झालं आहे. शास्त्रीय ग्रंथलेखनाचा हा एक चांगला नमुना आहे.

प्रा. अर्जुनवाडकर व प्रा. आचार्य यांची व्याकरणशास्त्राकडे पाहण्याची भूमिका समान आहे. ती पुढीलप्रमाणे सांगता येईल–

(१) भाषा कशी असावी हे सांगणे हे व्याकरणाचे काम नाही; तर भाषा जशी आहे तशी निरखून तिचे वस्तुनिष्ठ भूमिकेतून वर्णन करणे हे व्याकरणाचे काम आहे.

(२) भाषेतील सार्थ घटक व त्यांना प्रत्यय लागून होणारी रूपे आणि वाक्यातील त्यांचे परस्परसंबंध स्पष्ट करणे हेच व्याकरणरचनेचे प्रयोजन होय.

(३) वर्णप्रकृति विचार हा व्याकरणाचा विषय नाही. पण केवळ शब्दाचे घटक या दृष्टीने व्याकरणात वर्णविचार येतो. त्याचप्रमाणे शब्दांच्या अर्थाशी व्याकरणाला कर्तव्य नाही. त्यामुळे अर्थाच्या दृष्टीने व्याकरणात शिरलेली सर्व चर्चा आगंतुक ठरते.

(४) भाषेच्या रूपांची चर्चा करताना तिच्या ऐतिहासिक रूपांचा आधार अथवा परभाषेतील परिस्थितीचे आधार सांगणे गैर होय. अर्जुनवाडकर-आचार्य यांच्या व्याकरणांचा विशेष हा की, आपल्या व्याकरणांची भूमिका अशी पक्की करून तिचा ते सुसंगतपणे सर्वत्र पाठपुरावा करतात. पारंपरिक व्याकरणात या तत्त्वांचं थोडंफार भान क्वचित आढळत असलं, तरी ते सर्वत्र सुसंगतपणे पाळलं गेलेलं नसतं. त्या पार्श्वभूमीवर या दोघांची व्याकरणं नजरेत भरतात.

भाषाविज्ञानाच्या अभ्यासकांचे पारंपरिक व्याकरणावरील आक्षेप पुढीलप्रमाणे सांगता येतील :

(१) पारंपरिक व्याकरण मराठीचं, ती जशी आहे तसं वर्णन करत नाही. ते इंग्रजीच्या अथवा संस्कृतच्या साच्यात मराठी भाषेला बसवण्याचा प्रयत्न करतं.

(२) पारंपरिक व्याकरण हे लिहिण्या-बोलण्यातील शुद्धतेचा पुरस्कार करत असल्याने ते आदेशात्मक झालं आहे.

(३) भाषेच्या सद्यःस्थितीचं वर्णन करताना ऐतिहासिक रूपांचे आधार देणं अप्रस्तुत आहे. पण पारंपरिक व्याकरण विनाकारण ऐतिहासिक चर्चेत रस घेतं.

(४) त्याचप्रमाणे पारंपरिक व्याकरणात वर्तमान रूपांची चर्चा तर्कशास्त्राच्या आधाराने करण्याचा प्रयत्न असतो.

अशा तऱ्हेने पारंपरिक व्याकरणाच्या परंपरेतूनच पुढे आलेले अर्जुनवाडकर-आचार्य एका बाजूने व आधुनिक भाषाविज्ञानाचे अभ्यासक दुसऱ्या बाजूने, पारंपरिक व्याकरणावर आक्षेप घेताना दिसतात. हे दोन्ही प्रवाह भिन्न वाटत असले तरी त्यांची व्याकरणविषयक भूमिका खूपच जुळणारी आहे. त्यामुळे मराठीच्या व्याकरणातील विविध प्रश्नांची त्यांनी केलेली हाताळणी व त्यासंबंधातील त्यांचे निष्कर्ष जवळजवळ सारखे आहेत. वैज्ञानिक पायावर आधारलेली भूमिका आणि तिचा सुसंगत पाठपुरावा यांमुळे दोघांचेही निष्कर्ष जवळजवळ सारखेच येतात, असं याचं एक स्पष्टीकरण देता येईल. दुसरं स्पष्टीकरण असं की, पाश्चात्य भाषावैज्ञानिकांनीदेखील भाषेच्या वर्णनाचा आदर्श पाणिनीकडूनच घेतला आहे. त्यामुळे भाषेकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन मूलतः भिन्न नाही.

मराठीच्या पारंपरिक व्याकरणाबद्दल आंधळा अभिमान बाळगून भाषाविज्ञानाच्या

अंगाने लिहिण्यात येणाऱ्या वर्णनात्मक व्याकरणांना नाकं मुरडणाऱ्या लोकांना अर्जुनवाडकर-आचार्यांच्या ग्रंथांमधून घरचाच अहेर मिळालेला आहे. परंपरेत राहून का होईना, भाषेकडे वैज्ञानिक भूमिकेतून कसं पाहता येतं, याचा एक वस्तुपाठच ठेवला गेला आहे.

भाषाविज्ञान आणि अर्जुनवाडकर-आचार्यांची व्याकरणं यात बरेचसे साम्य असले, तरी त्यांमध्येही तपशीलातील भेद, मतभेदही आहेत. अशी काही ठिकाणे.

पृ० २९ . वर्णविचार हा व्याकरणाचा विषय नाही. तरीसुद्धा पदान्वयात संधीचा विचार येतो, म्हणून व्याकरणाला वर्णविचाराची दखल घ्यावी लागते, हे मान्य. आता मराठीसाठी कोणते वर्ण मानायचे ? "मराठीच्या वर्णमालेचा विचार करताना मराठी भाषेचे स्वरूप डोळ्यांसमोर ठेवून जे वर्ण आढळतील त्यांची नोंद केली पाहिजे," असे प्रा. आचार्य म्हणतात. पण यात वर्ण आढळतात, म्हणजे काय ?' अर्जुनवाडकर-आचार्यांनी न मानलेले इतर अनेक वर्ण मराठीत आढळू शकतील की ! 'फळ' यातील 'फ' चा उच्चार 'फ' असा दन्तौष्ठ्यही होताना आढळतो. 'वाडा' मधील 'ड' चा उच्चार ताडित असून तो 'डावा' मधील 'ड' च्या स्पृष्ट उच्चारापेक्षा वेगळा आहे. 'जहाज' मधील पहिला 'ज' स्पर्शसंघर्षी असून दुसरा 'ज' घर्षक आहे, हे सर्व वर्ण मराठीने मानायचे का? असा प्रसंगी भाषाविज्ञानात अर्थभेदक असणं, अंदाजक्षम नसणं अशा कसोट्या सांगितलेल्या आहेत. पण अर्जुनवाडकरांना अर्थभेदकत्वाची कसोटी अमान्य आहे. तेव्हा 'आढळतात म्हणून स्वीकारा' हे सूत्र संदिग्ध आहे. स्वतः अर्जुनवाडकरांनी 'अ', 'ई' आणि 'उ' यांचे दीर्घभेद अर्थभेदकत्वाच्या निकषावरच स्वीकारलेले दिसतात. आणि इतर स्वरांचे दीर्घभेद अंदाजक्षम म्हणून नाकारलेले दिसतात. हे दोन निकष स्वीकारले, तर –'ष' वर्ण अर्थभेदकत्वाच्या कसोटीवर नाकारावा लागतो, 'ज' चे दोन्ही प्रकार अंदाजक्षम म्हणून नाकारावे लागतील.

पृ० ३१ : अर्जुनवाडकर-आचार्य 'ऐ' आणि 'औ' यांचा, ते संयुक्तस्वर असूनसुद्धा वर्णमालेत समावेश करतात. याची त्यांनी दिलेली कारणं दोन :

(१) 'अ + इ = ए' या संधिनियमाची अपवादस्थळं व्यक्तिशः सांगत बसण्यापेक्षा 'ऐ आणि औ' ह्यांना स्वतंत्र वर्ण म्हणून मान्यता देणं अधिक लाघवाचं आहे.

(२) त्यामुळे वृद्धी या विकृतीचीही सोय लागते. अर्जुनवाडकरांचे विवेचन संस्कृत संधिनियमांना धरून आहे. इतर वैयाकरणांनी मराठी संधिनियम लक्षात न घेता, संस्कृतचेच संधिनियम अंधानुकरणाने स्वीकारल्याबद्दल अर्जुनवाडकर त्यांना दोष देतात. इथे मात्र संस्कृतच्या संधिनियमांची सोय लावण्यासाठी हे वर्ण स्वीकारावेत, असा ते आग्रह धरतात. भाषाविज्ञानात 'ऐ' आणि 'औ' ह्यांना स्वतंत्र वर्ण म्हणून मान्यता न देण्याकडे कल आहे.

पृ० ३१ : अर्जुनवाडकर-आचार्य बिंदू हा स्वरधर्म आहे म्हणून त्याला वर्ण म्हणून मान्यता देत नाहीत. भाषाविज्ञानात अर्थ भेदकतेच्या तत्त्वावर (उदा. ऐशी. ऐंशी) त्याला



अनुक्रमणिका

'खंडाधिष्ठित स्वनिम' म्हणून मान्यता दिली जाते.

पृ. ३९ : शब्दयोगी अव्ययान्त पदांना अर्जुनवाडकर-आचार्य सामासिक पद ठरवतात. पण समासात सामान्य रूप होत नाही. काही शब्दयोगी स्वतंत्रपणे वापरले जात नाहीत ; आणि काही शब्दयोगींना स्वतःचा अर्थही नसतो. (उदा. पेक्षा, प्रमाणे, इ.) या कारणांमुळे त्यांना सामासिक पद मानणं योग्य नाही.

पृ. ५५ : शब्दयोगी अव्ययांना विभक्तिप्रत्यय मानण्यात अडचण कोणती ? तर त्यांचा सामान्य रूपाशी / आणि षष्ठीयुक्त सामान्यरूपाशी योग होतो. विभक्तिप्रत्ययाचा फक्त सामान्य रूपाशीच योग होतो. म्हणून शब्दयोगींना विभक्तिप्रत्यय मानता येणार नाही असे अर्जुनवाडकर-आचार्यांचं मत आहे. पण विभक्तिप्रत्ययांचा षष्ठीयुक्त सामान्यरूपाशी योग होत नाही, असं समजणं चूक आहे.

पाहा : आपल्याला त्याच्याने, त्याच्याशी, रामच्याने, इ. केवळ एक उदाहरण सापडतं, म्हणून 'लृ'चा वर्णमालेत समावेश करावा, असं म्हणणाऱ्या अर्जुनवाडकरांनी वरील उदाहरणं लक्षात घेऊन शब्दयोगींना प्रत्ययांच्या योग्यतेचे मानण्यास आक्षेप घेऊ नये.

पृ. ६९ : भाषावैज्ञानिक सरळरूप आणि सामान्यरूप अशा दोनच विभक्ती मानतात. अर्जुनवाडकरांचा त्याला विरोध आहे. कारण सामान्यरूप हा चरमप्रत्यय नसल्याने त्याला विभक्तिप्रत्यय म्हणता येत नाही. सामान्यरूपाला विभक्ति प्रत्यय मानल्यास पदकल्पनाच विस्कळित होते असं त्यांचं मत आहे. पण षष्ठीचा प्रत्यय चरम नसतानाही त्याच्या विभक्तित्वाला बाधा येत नाही, असा निर्णय अर्जुनवाडकरांनीच दिला आहे. दुसरं असं की, संबोधनात सामान्यरूप हे चरमस्थानीच असतं. विशेषणाला जेव्हा सामान्यरूपाचा प्रत्यय लागतो, तेव्हा तो 'चरम'च असतो. तसंच सर्वच पदं विभक्त्यन्त असलीच पाहिजेत असं नाही. तेव्हा सामान्यरूपाला विभक्ती मानल्याने पदकल्पना विस्कळित होते, असं मानण्याचं कारण नाही. पद हे प्रत्ययरहित, प्रत्यययुक्त अथवा शब्दयोगीयुक्त अथवा सामान्यरूपान्त असते, अशी पदकल्पना करण्यात बाधा कोणती ? पाणिनीची पदकल्पना संस्कृतसाठी आहे, मराठीसाठी नव्हे, हे लक्षात घ्यावे.

पृ. ६५-६६ : "जे अपुरुष, सवचन प्रत्यय आहेत ते नामिकयोगी आहेत, त्यांना आपण विभक्तिप्रत्यय म्हणतो."– अर्जुनवाडकरांनीही विभक्तिप्रत्यय सवचन असतात, असं म्हटलं आहे. वास्तविक पाहता विभक्तिप्रत्ययांपैकी, ला (ए.व.), ना (अ.व.), ने (ए व), नी (अ.व.); ई (ए व.), ही (अ.व.) आणि नो (अ.व.)– एवढेच प्रत्यय सवचन आहेत. बाकीच्या प्रत्ययांमध्ये वचन अनुस्यूत नाही. ते प्रत्यय जेव्हा निरनुनासिक सामान्यरूपांपुढे येतात, तेव्हा त्यांना एकवचनी मानतात व जेव्हा आनुनासिक सामान्यरूपांपुढे येतात तेव्हा त्यांना अनेकवचनी मानतात. अर्जुनवाडकर-आचार्य हे शब्दयोगींनापण सवचन मानतात. तेही बरोबर नाही. याऐवजी भाषाविज्ञानाच्या पुस्तकातून सामान्यरूपाच्या प्रत्ययांनाच सवचन मानण्याची पद्धत आहे. निरनुनासिक ते सर्व एकवचनी आणि सानुनासिक ते अनेकवचनी, असा

निरपवाद नियम त्यांच्याबाबतीत देता येतो.

पृ॰ ९४ : अर्जुनवाडकर-आचार्य संयुक्त क्रियापदं मानत नाहीत. त्यासाठी त्यांनी कृदन्त शब्दांचं जे व्याकरण सांगितलेलं आहे, ते रूढ समजुतींना धक्का देणारं आहे. तो वाचू शकतो (वाचू हे कर्म), त्याला वाचता येते ('वाचता' हा कर्ता), तो गात होता ('गात' हे विशेषण) इ. हे स्वीकारलं तरीही एक अडचण येतेच. तो येतोय, तो येतो आहे, ही दोन्ही वाक्यं समानार्थीच आहेत. पण एकात 'येतोय' हे क्रियापद व दुसऱ्यात 'येतो' हे विशेषण व 'आहे' हे क्रियापद मानावं लागेल. हीच गोष्ट 'आलाय' 'येणाराय' इ. पदांच्या बाबतीतही होईल. अर्थात एकदा एक ठाम भूमिका पत्करल्यावर तिथे तडजोडीला वाव नाही, हेही तितकंच खरं.

पृ॰ ९९ : अर्जुनवाडकरांनी कर्माची रूपनिष्ठ व्याख्या दिली आहे. संस्कृत व्याकरणात कारकांच्या चर्चेत पाणिनीनं अर्थाचा आधार घेतलेला आहे. त्याची कर्माची व्याख्या 'कर्तुरीप्सिततमं कर्म ।' अशी आहे. अर्जुनवाडकरांची व्याख्या 'जे प्रथमान्त असल्यास ला– प्रत्ययान्ताने व ला– प्रत्ययान्त असल्यास प्रथमान्ताने वाक्याच्या सामान्य नियमांनुसार प्रतिष्ठापनीय (substitutable) असते, ते कर्म अशी आहे. ही व्याख्या पुरेशी नाही हे आचार्यांच्या लक्षात आलेलं आहे. 'शकुंतला पत्र लिहिते' या वाक्यात ही प्रतिष्ठापनीयतेची कसोटी लागू होत नाही. म्हणून त्यांनी 'कर्मणी प्रयोगात प्रथमान्त कर्म असणं' ही पूरक कसोटी सांगितली आहे. पण 'आई रामाला बोलावते' या वाक्याच्या बाबतीत कर्मणी प्रयोगच शक्य नसल्याने ती कसोटीही अपुरी पडते. तेव्हा कर्म ठरवण्यासाठी वेगळीच कसोटी ठरवावी लागते. अशोक रा. केळकरांनी क्रियापदाच्या '–णारा' कृदन्ताला व '–लेला' कृदन्ताला कोण / काय असे प्रश्न विचारावे, दोन्ही उत्तरं भिन्न असतील (वैयधिकरण्य) तर ती अनुक्रमे कर्ता व कर्म होत अशी एक कसोटी सांगितलेली आहे. ती वरील दोन्ही उदाहरणांना लागू होते. अर्जुनवाडकर द्विकर्मकता मानत नाहीत. केळकर संदिग्ध आहेत. मी द्विकर्मता मानणारा आहे. माझ्या मते कर्मनिश्चितीसाठी पुढील कसोट्यांचा विचार करावा लागतो.

(१) कर्मनिश्चितीपूर्वी अगोदर कर्ता निश्चित करावा.

(२) नंतर क्रियापदाला काय किंवा कुणाला असे प्रश्न विचारावेत. वस्तुवाचक कर्माचं निर्धारण 'काय' प्रश्नाने होईल आणि व्यक्तिवाचक कर्माचं निर्धारण 'कुणाला' प्रश्नानं होईल.

(३) मात्र कर्ता व कर्म यांच्यात वैयधिकरण्य असलं पाहिजे.

(४) विशेष विवक्षा नसताना कर्माचं स्थान नेहमीच कर्त्यानंतर असतं, हेही पाहिलं पाहिजे. नाहीतर 'मला दूध आवडतं', यात 'मला' हे कर्म ठरू लागेल.

पृ॰ ११९ : वाक्यपृथक्करण हा व्याकरणबाह्य विषय आहे, असं अर्जुनवाडकर-आचार्य यांचं मत आहे. भाषाविज्ञानामध्ये संरचनावाद्यांनी प्रथमोपस्थित

संघटक पद्धतीचं विश्लेषण, व्याकरणाचा भाग म्हणून स्वीकारलेलं आहे. ते वाक्यपृथक्करणाशी बरंचसं जुळणारं आहे. त्यामध्ये पदान्वयापेक्षा अर्थान्वयाचाच विचार प्रामुख्याने दिसतो. वाक्यांश संरचनावादी व्याकरणाच्या (Phrase-structure grammer) पुरस्कर्त्यांनी त्या पद्धतीचा विकास केला. चॉम्स्कीयानेही जनकसूत्री रचनांतरण पद्धतीच्या व्याकरणात सुरुवातीला त्याचाच आधार घेतला. केवळ रूपनिष्ठ भूमिकेवरही वाक्यपृथक्करण कशा प्रकारचं असू शकतं, हे मंगरूळकर-अर्जुनवाडकरांनी दाखवून दिलेलं आहे.

व्याकरण हे पूर्णतः रूपनिष्ठ असून 'अर्थो हि अर्थः परकीय एव' अशी आचार्यांची भूमिका आहे. तिला ते चिकटून राहिले आहेत. भाषाविज्ञानाची भूमिका वेगळी दिसते. व्याकरण फक्त पद आणि पदान्वय यांचा विचार करतं. पण भाषाविज्ञानात वाक्य हा मुख्य घटक मानला असून वाक्य हे सर्वांत मोठं भाषिक रूप आहे. भाषिक रूपाच्या व्याख्येतच ते अर्थपूर्ण असलं पाहिजे, असं गृहीत आहे. त्यामुळे 'अग्निना सिञ्चति' किंवा 'भदृस्य कट्या सरटः प्रविष्टः !' यासारखे प्रमत्तप्रलाप व्याकरणाला ग्राह्य असले, तरी भाषाविज्ञानाला ग्राह्य होणार नाहीत. कारण त्यांना भाषिक (लिंग्विस्टिक) रूप म्हणून मान्यता मिळणार नाही. वाक्य हे सार्थ मानल्यानंतर त्याचे घटकही सार्थ असलेच पाहिजेत, हे दाखविण्यासाठी प्रथमोपस्थित संघटक-पद्धतीचा अवलंब केला गेला.

वाक्याचे नैयायिकांनी आकांक्षा व योग्यता असे गुणधर्म सांगितले आहेत. सोस्यूरच्या अन्वयनिष्ठ संबंध (syntagmatic relations) आणि गणनिष्ठ संबंध (Paradigmatic relations) या संकल्पना वरील आकांक्षा आणि योग्यता यांच्याशी मिळत्याजुळत्या आहेत. व्याकरणाला नैयायिकांचे निकष मान्य नाहीत. भाषाविज्ञानाला मात्र ते ग्राह्य वाटतात. त्यामुळे दोहोंच्या वाक्यविश्लेषणात फरक पडतो.

भाषाविज्ञान ही फार मोठी व्यापक ज्ञानशाखा आहे. त्यामुळे त्यामध्ये भाषेच्या व्याकरणाबरोबरच भाषेच्या इतर विचारांचाही समावेश होतो. भाषेच्या व्याकरणाच्या बाबतीतदेखील त्यामध्ये अनेक संप्रदाय व प्रणाली आढळतात. मराठीतले भाषाविज्ञान प्रामुख्याने संरचनावादी संप्रदायाचे बोट धरून आलेले आहे. वैज्ञानिक अंगाने भाषेसंबंधी होणारे चिंतनही भाषाविज्ञानात समाविष्ट होईल. अर्जुनवाडकर-आचार्यांनी केलेलं व्याकरणही त्यामध्ये सहज सामावून जाईल. या दोन परस्परभिन्न अभ्यासशाळा आहेत असे मानण्याचे कारण नाही. शास्त्राच्या पायावर या दोन्ही शाखा एकरूप व्हायला काहीच हरकत नाही. व्याकरणविषयक अभ्यासाला योग्य गती देण्याचं बळ प्रा. आचार्यांच्या या ग्रंथात आहे.

(मराठी व्याकरणविवेक— प्रा. मा. ना. आचार्य. संजय प्रकाशन, पुणे ४. पृष्ठे १५०. पंचावन्न रुपये)

(डॉ. कल्याण वा. काळे, 'दीपक अपार्टमेंट्स, ९२/३, तुळशीबागवाले-नगर, पर्वती, पुणे ४११००९.)










# तीन अर्वाचीन कवी : स. त्र्यं. कुल्ली

## केशवसुत, मर्ढेकर व नारायण सुर्वे यांच्या काव्याच्या पुनर्विचार

**प्रा. प्रमोद मूनघाटे**

मार्क्सवादी दृष्टिकोनातून मराठी साहित्याची समीक्षा करण्याचे जे प्रयत्न झाले आहेत, त्यात 'तीन अर्वाचीन कवी'चे योगदान वैशिष्ट्यपूर्ण ठरेल. केशवसुत (इंग्रजी राजवटीने आलेली संवदेनक्षमता), मर्ढेकर (दुसऱ्या महायुद्धाने आलेली संवदेनक्षमता) व नारायण सुर्वे (नवकाव्याची प्रतिक्रिया) यांची मार्क्सवादी परिभाषेत वेगळी मांडणी प्रा. कुल्ली करू पाहतात. उदयोन्मुख भांडवली व्यवस्थेचे प्रतीक (केशवसुत), भांडवली व्यवस्थेच्या विकासानंतर सुरू होणारी भयावह घसरगुंडी (मर्ढेकर) आणि भांडवली व्यवस्थेच्या पोटात वाढणारा समाजवादाचा गर्भ– त्याचा वेध घेण्याची क्षमता (सुर्वे), अर्वाचीन मराठी काव्याचा व समाज विकासाच्या प्रक्रियेचा असा अन्वय लावण्यापूर्वी प्रा. कुल्ली यांनी महाराष्ट्रातील राजकीय, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक बदलांचा आढावा घेतला आहे. अर्थात हा आढावासुद्धा मार्क्सवादी चष्म्यातून घेतल्याने काही निष्कर्ष वादग्रस्त ठरण्याचा संभव आहे.

भौतिक परिस्थिती आणि कवीचे व्यक्तित्व यांच्या द्वंद्वानुसार महाराष्ट्रात एकोणिसाव्या शतकात सरंजामशाही व भांडवलशाही सनातनी व सुधारणावादी, स्थितिशील आणि गतिशील द्वंद्वे एकमेकांतून निर्माण होऊन समांतरपणे वाङ्मयाच्या निर्मितीसाठी कारणीभूत झाली. स्थितिशील जाणीव पुनरुज्जीवनवादी राष्ट्रवादाच्या स्वरूपात साहित्यात प्रकटली. (चिपळूणकर, टिळक, शि. म. परांजपे, सावरकर, विनायक, कवी गोविंद, नाटककार खाडिलकर व कृष्णशास्त्री राजवाडे, हळबे, रिसबूड, गुंजीकर) गतिशील भांडवली जाणीव प्रकटली ती सुधारकांच्या चळवळीतून आणि सुधारणावादी साहित्यातून. (न्या. रानडे, जांभेकर, लोकहितवादी, गोखले, फुले, भालेकर, आगरकर, हरिभाऊ, केशवसुत, कोल्हटकर, बी, किर्लोस्कर, देवल, गडकरी, बालकवी)

विसाव्या शतकात भांडवलशाहीचा ऱ्हास होत असताना मराठीत परंपरावादी साहित्याची निर्मिती अधिक झाली. सरंजामी संबंधाचा व उच्चवर्णीयांचा या निर्मितीला आधार होता. परंपरावादी साहित्याच्या प्रवाहातील लेखक म्हणून कुल्ली सावरकर, पु. भा. भावे, गो. नी. दांडेकर, य. गो. जोशी, बाळ कोल्हटकर, वसंत कानेटकर, मधुसूदन कालेलकर, पु. ल. देशपांडे, मो. ग. रांगणेकर यांची नावे घेतात तेव्हा वाचक संभ्रमात पडल्याशिवाय कसा राहील ?

'भौतिक परिस्थितीचा साहित्याशी संबंध असतो. त्यामुळे साहित्यकृतीला विशिष्ट

आशय तसेच रूप प्राप्त होऊ शकते. केशवसुत, मर्ढेकर, सुर्वे यांच्या काव्याला तत्कालीन भौतिक परिस्थितीने प्रभावित केले. असून गेल्या शतकापासून महाराष्ट्रातील सामाजिक व सांस्कृतिक जीवनात जे परिवर्तन झाले त्याचा आणि या तिन्ही कवींच्या काव्याचा अन्योन्य संबंध आहे आणि मार्क्सवादी दृष्टीतून केलेले समाजजीवनाचे विश्लेषण आणि मराठी काव्य यात जैव संबंध आहे असे या पुस्तकाचे मुख्य सूत्र आहे.

केशवसुतांची कविता ही 'युगकविता', मर्ढेकरांची कविता ही 'युगांताची कविता' आणि सुर्व्यांची कविता ही 'क्रांतीची कविता' असे प्रा. कुल्ली म्हणतात.

केशवसुतांच्या कवितेत भांडवली युगाचा आशय आहे असे म्हणणे हा त्यांचा अधिक्षेप नसून त्यांच्या द्रष्टेपणाचा गौरवच आहे, असे कुल्ली म्हणतात. महाराष्ट्रात सरंजामशाहीविरोधी लढ्यात 'ड्रायव्हिंग फोर्सचे' काम मध्यमवर्गाने केले, पण भांडवलशाहीच्या उदयाबरोबरच प्रबोधनाची पीछेहाट, बहुजनांचा राजकारण-समाजकारणातील प्रवेश, कामगारांचे संघटन यामुळे मध्यमवर्गाचा स्वप्नभंग झाला. 'पराभूत झालेल्या उच्चवर्णीय मध्यमवर्गाने फोडलेली किंकाळी म्हणजे मर्ढेकरांची कविता' असे त्यांना वाटते. त्याबरोबरच मानव्याच्या अस्तित्वासाठी केलेल्या आकांताचीही ती कविता आहे, तथापि मर्ढेकरांना 'दुसरे केशवसुत' म्हणण्याऐवजी दुसरे गडकरी म्हणावे असे त्यांना वाटते. कारण केशवसुतांचा मानवतावाद आशावादी तर मर्ढेकरांचा निराशावादी आहे. 'परंपरा की आधुनिकता, जुनी वैदिक मूल्ये की नवी समाजनिष्ठ मूल्ये या द्वंद्वात गोविंदाग्रज आणि मर्ढेकर अखेरपर्यंत अडकून राहिले.'

वैयक्तिक वेदना, समाजवादी क्रांती याकडून नारायण सुर्वे यांचा वैश्विक मानुषतेच्या सागरसीमेपर्यंत प्रवास झाला आहे असे कुल्लींचे मत आहे.

मार्क्सवादी तत्त्वज्ञानाचा व साहित्यविचारांचा आणि त्याआधारे महाराष्ट्रातील सांस्कृतिक परिस्थितीचा साक्षेपी आढावा घेतल्यामुळे या पुस्तकाला संदर्भमूल्यही प्राप्त झाले आहे.

(तीन अर्वाचीन कवी— स. त्र्यं. कुल्ली, लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई. डिसेंबर ८९. पन्नास रुपये.)

(प्रा. प्रमोद मुनघाटे, ६ सोळा शिक्षकांची घरे, विद्यापीठ परिसर, नागपूर १०)

---

**साभार-स्वीकार**

**१३. सृजन सोहळा**— गोमंतक मराठी अकादमी, पणजी, पृष्ठे— ८८, तीस रुपये.

**१४. गुणगुण छोटीशी**— माधव रामचंद्र कुलकर्णी, न्यू सद्‌गुरू प्रेस, जळगाव, पृष्ठे— १२

**१५. गट्टी फू**— सी. बी. दोडती, सुवर्णाक्षर प्रकाशन, गोरेगाव (प.), मुंबई-६२, पृष्ठे— २१, साडेसहा रुपये.

**१६. देवराई**— वसंत सावंत, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई-३४, पृष्ठे— ७५, पस्तीस रुपये.

**१७. परागपुष्पे**— य. न. केळकर, कृषिउद्योग मूलशिक्षणसंस्था, कऱ्हाटी (पुणे), पृष्ठे— २१६, चाळीस रुपये.

# पुन्हा तुकाराम : दिलीप चित्रे
## तुकारामाचे काव्यात्म एकसंध आत्मकथन

मालती देऊळगावकर

लहानपणापासूनच तुकाराम भावलेले दि. पु. चित्रे यांनी तुकारामांचे १०० अभंग निवडून हे पुस्तक मांडलेले आहे. तुकोबा-विठोबा संबंध परस्परांशी निवेदन करू शकणाऱ्या दोन व्यक्तींमधील संबंध असल्याप्रमाणे मांडला गेला आहे. म्हणजेच विठोबाचे मानवीकरण, व्यक्तिरूपकरण झालेले आहे. दोन मित्र, प्रियकर-प्रेयसी, आई-मूल, पिता-पुत्र, दोन शत्रू, मालक-गुलाम, देणेकरी-घेणेकरी अशा नाना प्रकारच्या द्वंद्वात्मक मानवी संबंधाची रूपके उत्स्फूर्तपणे रचत जातात. दुसरे तुका म्हणे, या अभंगाच्या सहीमुळे एकूण समग्र गाथेला येणारे वैयक्तिक अनुभवाचे,अस्सल कैफियतीचे, ठाम विधानाचे व निष्कर्षाचे स्वरूप होय. तुकोबा-विठोबा ह्यांची एकेरी, दुहेरी, द्वंद्वात्मक, संघर्षशील आणि तरी एकजीव, अद्वैतरूप प्रतिमा गाथेत सतत प्रकटत राहते.

तुकोबांचे प्रचंड व्यवहारजन्य शब्दभांडार, सर्वंकष भाषा, बोलीच्या सहजतेतून छंदाच्या व सुभाषितांच्या तोलात विविधपणे चकित करत येणारे पद्य-प्रभुत्व– समकालीन व पूर्वसूरींच्या काव्यात आढळत नाही असे लेखकास वाटते. हिंदुत्ववादी ज्ञानेश्वरी डोक्यावर घेतात ती भगवद्गीतेखातर. नाहीतर नामदेव व तुकाराम हेच मराठीचे मुख्य मानदंड आहेत असे त्यांनी मान्य केले असते असे लेखकाचे मत आहे. पेशवाईपासून मराठी वाङ्मयात वर्णीयतेची वाढ आली. स्वातंत्र्यानंतर त्यात वर्गीयतेची भर पडली. पेशवाईच्या उदयापासून अस्तापर्यंत अव्वल इंग्रजीपासून थेट स्वातंत्र्योत्तर पहिल्या दशकापर्यंत आपल्या दृष्टीने तुकोबांच्या वह्या बुडालेल्याच राहिल्या. मराठी समीक्षेत तुकोबा अस्पृश्य राहिले ही लेखकाची खंत आहे, पण सर्व वर्णातील जनसामान्यांच्या वाणीतून तुकोबाच उत्फूर्तपणे बाहेर येतात. अडाणी व निरक्षर तुकोबाचे अभंगही सहज बोलून जातात. हे वरील लेखकाच्या विधानास पुरून उरणारे वास्तव आहे. तुकोबांच्या वाणीचे अतुलनीय यश आहे. संतांमध्येही (साडेतीन) टक्केवारी पाडायची का ? हे त्यांच्या शिकवणुकीला धरून होणार नाही. मग आंबडेकरवादी लेखकांचेही तुकोबाकडे लक्ष गेले नाही त्याचे कारण काय असू शकेल ?

लेखकाने तुकोबांच्या अस्तित्वाचे दहा अवतार कल्पिले आहेत. कवी असणे, माणूस असणे, ज्ञानी असणे, भक्त असणे, तळमळत असणे, स्वतःच्या स्थळकाळात असणे, संत असणे, ब्रह्मानंदी असणे, केवळ असणे व असण्याचा निरोप या दृष्टीने तुकोबाचे अभंग अभ्यासण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. तुकोबा मराठी वाङ्मयाच्या केंद्रस्थानी आहेत.



अनुक्रमणिका







हे मानल्यावरच मराठीचे स्वतंत्रपण वैश्विक संदर्भात मांडण्याजोगे काव्यशास्त्र आपणांस दिसून येते, हे लेखकाचे मत आहे. माणसातील संपूर्ण मानवतेचे पैलू गाथेत दिसतात. गाथेकडे लेखक 'एकसंध महाकृती' व 'काव्यात्म आत्मचित्रण' म्हणून पाहतात. तुकोबांची गाथा हे एका माणसाच्या अनेक स्वगतांचे एकत्रित रूप आहे. म्हणून ते एक महास्वगत आहे. (आपुलाच वाद आपणांसी). तुकोबा अभंग रचत राहिले व त्याची आपोआप गाथा झाली.

जो कवी आहे तोच माणूस आहे, भक्त आहे, तडफडत आहे, संत आहे, ज्ञानी आहे, स्वतःच्या देशकाळात स्वतःला पाहणारा आहे, ब्रह्मानंदात मग्न आहे, मुक्त आहे व स्वयंपूर्ण आहे– तोच अस्तित्वाचा निरोप घेऊन अनाद्यनंत अन् अस्तित्वाकडे जाणारा कधी न परतणारा यात्री आहे. सुरुवातीला तुकोबाचा आणि विठोबाचा स्वप्नातल्या भेटीपुरताच संबंध आलेला आहे, पण संसारात विरक्तीचा अनुभव घेत उत्कट भक्तीच्या आहारी जाणारे तुकोबा क्रमशः विठोबाशी आक्रमक सलगी साधतात.

वह्या जेव्हा तरंगून वर आल्या तेव्हा विठोबाला साकडे घातल्याचा पश्चात्ताप तुकोबांना झाला. लोक त्यांना पांडुरंग मानू लागले तेव्हाच जाण्याचा निश्चय त्यांनी पक्का केला. भोळ्याभाबड्या भाविकांच्या अंधश्रद्धेचा फायदा घेणाऱ्यांची– तांत्रिक, मांत्रिक, ब्राह्मण, गुरव, अंगात येणारी माणसे इत्यादींची व्यक्तिचित्रे या गाथेत आहेत. आर्थिक, कौटुंबिक व्यवहार, शेतकरी जीवनाचे तपशीलही यात आहेत. सामाजिक संदर्भ भरपूर आहेत.

मुळात ते एक संसारी कुणबी म्हणजे शूद्र– वेदाचा अधिकार नसलेले. व्यवसायाने शेतकरी, शेतातल्या उत्पन्नाचे व्यापारी. कुळधर्मानुसार विठ्ठलाचे उपासक व वारकरी. गृहस्थाश्रमी, संसारी.

तुकोबांच्या जीवनाने असामान्य वळण घेतले ते स्वप्नात विठ्ठलासह येऊन नामदेवाने त्यांना कवित्व करण्याचा आदेश दिल्यामुळे. हे स्वप्न तुकोबांना दुष्काळानंतर विठोबाच्या मंदिराचा जीर्णोद्धार करून तेथे दिवसभर भजनात वेळ घालवताना पडलेले. म्हणजेच वयाच्या २१ व्या वर्षानंतर घडलेली ही गोष्ट.

'भूतबाधा आम्हा घरी । हे तो आश्चर्य गा हरि ॥' या अभंगातून कवित्वाचे भूतबाधेशी समीकरण मांडताना तुकोबांची विनोदाची प्रतिभा स्पष्ट दिसते. तुकोबा भ्रमिष्ट, वेडे, झपाटलेले असे लोकांना वाटायला लागले. कारण ते कविता करू लागले. ही भूतबाधा विठ्ठलाचीही असू शकते. तुकोबांच्या स्वभावानुसार विनोदाबरोबर वेदनेची झाकही त्यात मिसळलेली दिसते. जीवनातल्या वेदनेने होरपळून निघाल्यानंतर कवीच्या रूपाने पुनर्जन्म घेऊन जीवनानुभवाचे, समाकालीन समाजाचे व सर्वकालीन मानवी अवस्थेचे सर्वांगीण चित्रण करणारा हा श्रेष्ठ कवी आहे. कवित्वाचे श्रेय स्वतःकडे न घेता नम्रपणे समाधानी भक्ताची भूमिका तुकोबा काव्याबाबत घेतात.











कवी असण्याप्रमाणे माणूस असण्याची जाणीव सुद्धा तुकोबांमध्ये सहजपणे व निरंतर आहे. कोणी त्रयस्थाने सहानुभूतीचा लेश न बाळगता सांगावे अशा पद्धतीने ते आपले चरित्र मांडतात. तहान-भूक, काम-क्रोध, सुख-दुःख, मानापमान इ. अनुभव ज्याच्या जीवनानुभवाचा मुख्य भाग होतात असा एक मनुष्य जीवनातल्या व्यापक दुःखाची जाणीव होऊन हळूहळू संसारापासून अलग कसा होत गेला आणि आपल्या दैवताशी संवाद साधण्याच्या उत्कट प्रयत्नामधून त्याला स्वतःचेच अंतःस्वरूप कसे उलगडत गेले याची एक हकीकत तुकारामाच्या गाथेत आहे. तुकोबांच्या माणूस असण्याच्या भानामुळे ते आपल्यातले असून महान व महान असून आपल्यातले वाटतात.

भक्ती म्हणजे आपल्या दैवताचे हुबेहूब प्रतिबिंब आपण बनणे हाही एक भाग आहेच. सामीप्य, सारूप्य आणि सायुज्य या भक्तीच्या तीन अवस्था. या तिन्ही अवस्था तुकोबांनी तऱ्हेतऱ्हेने व्यक्त केलेल्या आहेतच, पण या अवस्थांच्या अभावी येणारा ताटातुटीचा, विरहाचा अनुभवसुद्धा नाना परींनी तुकोबांनी व्यक्त केलेला आहे. अनेकदा तुकोबांची श्रद्धा डळमळते. आपल्या दैवतापुढे आपला आकांत मांडणारे तुकोबा संदेहाने पीडित होतात, भेदरतात. देवाच्या निष्ठुरपणावर संतापतात, व्यथित, निराश, विफल होतात तरी त्यांचा देवाशी संवाद चालूच राहतो, वाढत राहतो. त्यांची तळमळ, ओढाताण याच्या विविध छटा काही अभंगांतून व्यक्त होतात. तुकोबांच्या उत्क्रांतीवर प्रकाश टाकणारे अनेक अभंग या भागात लेखकाने एकत्रित केले आहेत.

'ढेकणासी बाजगड । उतरचढ केवढी ॥' या अभंगात तुकोबांच्या विनोदबुद्धीचे, उपरोधाचे आणि उपरोधाच्या विषयाच्या तात्काळ चिंधड्या उडविण्याच्या हाताटीचे यात दर्शन घडते. ढेकूण व बाज यांचा आकार आपण जाणतो, पण अचानक ढेकणाच्या नजरेतून तुकोबा आपल्याला बाज दाखवितात व ती 'गडासारखी' दिसते. उतरचढ केवढी ! हे तुकोबा मिस्किलपणे सांगतात. यातूनच पुढे माणसाच्या संकुचित संवदेनाक्षेत्राचा, बुद्धीचा, अहंकाराचा, दंभाचा संदर्भ जोडला जातो. 'पोटी जन्मती रोग । तरी का म्हणावे आप्तवर्ग ?' यातून आपले शरीर आणि आपण ह्यात सगळेच आपण नाही. त्यातही आपपर विवेक करावा लागतो असे तुकोबा मार्मिकपणे सांगतात. गावकऱ्यांना समजेल अशी तुकोबांची भाषा सोपी वाटते, पण फारच थोड्या साधकांना कळू शकले अशी अवघड व दुर्बोधही आहे.

'बरा कुणबी केलो । नाहीतरी दंभेचि असतो मेलो' असे तुकोबा म्हणतात. पुस्तकी अभ्यास तर त्यांनी केला नव्हता. 'पाहो ग्रंथ तरी आयुष्य नाही हाती । नाही ऐशी मती अर्थ कळे ॥' असे ते विनयाने सांगतात, पण 'घटी अलिप्त असे रवि' अशा सारख्या अभंगात प्रगल्भ तत्त्वज्ञान पटवू शकतात.

'नव्हती ते संत–' या अभंगात आपल्या मते कोण संत नव्हेत ते तुकोबा परखडपणे सांगतात. एकांतात सृष्टीशी तादात्म्य पावलेले संत, (वृक्षवल्ली आम्हां) सदैव जागरूक राहून

अस्तित्वाचा मूळ संघर्ष अनुभवणारे लढाऊ संत तुकोबा, (रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग) मानवतेविषयी अनुकंपा असणारे आणि विशेषतः दुःखी आणि अभागी व्यक्तींविषयी करुणा बाळगणारे संत तुकोबा (जे का रंजले गांजले), निःस्पृह, निस्संग, विरागी वृत्तीचे संत तुकोबा अशी त्यांची संत असण्याची विविध रूपे आहेत. कठोर निग्रह हा जसा संतत्वाचा एक पैलू आहे, तसाच हळवेपणा हाही त्याचा एक पैलू आहे. (मऊ मेणाहूनि आम्ही विष्णूदास).

'ब्रह्मानंदी असणे' या भागातल्या अभंगाची निवड करताना इंद्रिय सुखाच्या सीमारेषा ओलांडून ओसंडून वाहणारा अंतर्यामीचा आनंद अभिप्रेत होता असे लेखकाचे म्हणणे आहे.

'सत्य असत्यासी मन केले ग्वाही । मानियले नाही बहुमता ॥' असे तुकोबा निरोप घेण्यापूर्वी म्हणतात. 'आम्ही जातो आमुच्या गावा' असे सांगत तुकोबा दिसेनासे होतात. कवीच्या स्वायत्ततेचा आणि सार्वभौमत्वाचा साक्षात्कार तुकोबांच्या गाथेत आढळतो. तुकोबा श्रद्धाळू आहेत, पण अंधश्रद्ध नाहीत. अंधश्रद्धेची जागा अमर्याद मानवी अहंकाराने घेतल्यामुळे संकुचित बुद्धिप्रामाण्य हीच आता नवी श्रद्धा बनली आहे असे लेखकाला वाटते. तुकोबांची कविता खुली असून चोखदंळ आहे. अभिजातता आणि आधुनिकता या कसोट्यांना ती उतरतेच शिवाय ती मानवतावादी आणि कलात्मक स्वातंत्र्यवादी आहे. आधुनिक काव्यातला मुख्यध्वनी उपरोध व अंतर्विरोध तुकोबांच्या गाथेतच प्रथम स्पष्टपणे दिसतो.

तुकोबांच्या गाथेतील विविध पैलू दाखवून विश्लेषणासह मांडल्यामुळे हे पुस्तक लक्षणीय ठरते.

(पुन्हा तुकाराम, दि. पु. चित्रे. एस. के. बेलवलकर पब्लिशिंग कंपनी, पुणे पृष्ठे ३२०, दीडशे रुपये.)

(मालती देऊळगावकर, सरस्वती नगर, लातूर ४१३५३१.)

## भाषा व साहित्य : संशोधन (खंड ३) :

### संशोधकांना उपयुक्त ठरणारा संदर्भ ग्रंथ

प्रा. य. शं. कळमकर

'संशोधन ही जीवनाची वृत्ती आहे. तो केवळ व्यावसायिक किंवा पदवीपुरता पत्करलेला उद्योग नाही,' असा मोलाचा विचार डॉ. सु.रा. चुनेकर यांनी 'भाषा व साहित्य : संशोधन' (खंड तिसरा) या ग्रंथातील आपल्या लेखात मांडला आहे. डॉ. वसंत जोशी यांनी प्रा. गं. ना. जोगळेकर, प्रा. म. ना. अदवंत प्रभृती सहकाऱ्यांच्या मदतीने तीन खंड प्रसिद्ध केले



अनुक्रमणिका







त्यामागे असलेली प्रेरणा हीच आहे. मराठी भाषा व साहित्य संशोधनाची गुणवत्ता यावद्दल अधूनमधून शंका व्यक्त केली जाते किंवा टीका केली जाते. त्या टीकेला उत्तर म्हणजे हे तीन खंड असे म्हणता येईल.

या तिसऱ्या खंडातील सर्वच लेख उल्लेखनीय आणि स्वतंत्र संशोधनशाखेला हात घालणारे आहेत.

डॉ. चुनेकर यांनी जुन्या आणि नव्या मराठी वाङ्मयाच्या शोध-निबंध प्रबंध व ग्रंथांची उदाहरणे देत संशोधनाच्या वेगवेगळ्या दिशांचा परिचय करून दिला आहे. संशोधकाला नवी दिशा दिसते कशी याचीही उदाहरणे त्यांनी दिलेली आहेत. साहित्य विचाराची व समीक्षेची तात्त्विक वैठक संशोधकाने कशी उपयोगात आणावी (किंवा ही बैठक असणे आवश्यक कसे आहे) याची चर्चा त्यांच्या लेखात आढळत नाही. चरित्रात्मक संशोधनाचा उल्लेख त्यांच्या विवेचनात आहे, पण चरित्रात्मक समीक्षेच्या मर्यादा, त्या संबंधीचा वाद, साहित्याकडे लेखक व काल-निरपेक्ष पद्धतीने पाहण्याचा दृष्टिकोण आणि संशोधनात या दृष्टिकोणाचे स्थान याचा परामर्शही आवश्यक होता. हे केवळ डॉ. चुनेकरांच्याच लेखाबद्दल नव्हे तर या तीनही खंडांवद्दल म्हणता येईल. संशोधकापाशी साहित्य व समीक्षा यांच्याविषयी मूलभूत विचारांचे संचित असल्याशिवाय त्याच्या संशोधनाला वजन येणे शक्य नाही. साहित्यविषयक तात्त्विक बैठक मांडणारा एक स्वतंत्र विभागच कुठेतरी यायला हवा होता.

प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्या लेखात साहित्याविषयीचा समाजशास्त्रीय दृष्टिकोण दिसून येतो, पण एवढ्याने अभ्यासकाला साहित्याच्या समाजशास्त्रीय अभ्यासाचा विचार किंवा त्यासंबंधीचे वेगवेगळे दृष्टिकोण समजतील असे नाही. त्यासाठी एक स्वतंत्र लेखच हवा आणि समाजशास्त्रीय विचाराचा संशोधनात कसा उपयोग होतो याची उदाहरणासहित चर्चा हवी.

डॉ. मंचरकर यांनी 'तुलनीय संहिता : शोध, छाननी आणि निश्चिती' या लेखात संहितांची तुलना करताना केवळ सत्यशोधनाचाच नव्हे तर मूल्यमापनाचा आणि सौंदर्यसमीक्षेचा नवा दृष्टिकोण संशोधकांनी ठेवायला हवा हे दाखवून दिले आहे. इतकेच नव्हे तर लेखकाने उपयोगात आणलेले आधारग्रंथ निश्चित न केल्यामुळे अप्रस्तुत टीका कशी केली जाते हे देखील स्पष्ट केलेले आहे. संशोधक-विद्यार्थ्यांना मार्गदर्शन कसे करावे याचा एक उत्तम नमुना म्हणजे हा लेख होय. संशोधकांनी असे श्रम घेतले, आपल्या संशोधनात वेगवेगळ्या प्रकारचे निकष वापरले तर लेखनाचा दर्जा निश्चितच उंचावेल.

डॉ. शिवाजीराव चव्हाण यांनी शाहिरी साहित्यच नव्हे तर महाराष्ट्रातील एकूणच लोकसाहित्य कसे दुर्लक्षित आहे आणि संशोधकांना या नव्या क्षेत्रात कसे मौलिक काम करता येईल हे दाखवले आहे. लोकसाहित्याचा अभ्यास करताना संशोधकाचे 'कान' देखील तयार असले पाहिजेत कारण लोकसाहित्य बरेचसे 'मौखिक' आहे.












प्रा. रा. ग. जाधव यांनी 'साहित्याचा सांस्कृतिक विचार' या लेखात वाङ्मयाची स्वायत्तता, कलाकृतींचा सांस्कृतिक वारसा आणि जीवनदर्शनाचा वेध घेण्याची गरज इ. गोष्टींचा ऊहापोह केलेला आहे. सामाजिक आणि सांस्कृतिक विचाराबरोबरच कलावंताचा विश्लेषणात्मक अभ्यास करणे हेही महत्त्वाचे आहे असे ते म्हणतात.

विद्यापीठीयस्तरावर मान्य झालेल्या मराठीतील प्रबंधांची सूचीही देण्यात आली आहे. संशोधकांसाठी आवश्यक अशी अनेक प्रकारची माहिती या तिन्ही खंडांत उपलब्ध आहे. यात संशोधन ग्रंथालयांवरचा श्री. कृ. शं. हिंगवे यांचा लेख देखील महत्त्वाचा आहे. मराठी संशोधन प्रबंधांमध्ये बऱ्याच ठिकाणी रेफरन्स (संदर्भ-निर्देश) आणि बिब्लिओग्राफी (ग्रंथ-सूची) यांची गल्लत केलेली आढळते. ती श्री. हिंगवे यांच्या लेखामुळे दूर व्हावी.

या तीनही खंडांचा एकत्रित विचार करताना असे जाणवते की या खंडांमधील हे विद्वत्तापूर्ण लेख तिन्हींपैकी कुठल्याही खंडात येऊ शकले असते. म्हणजे कुठल्या योजनेनुसार हे लेख विशिष्ट खंडात आले ते लक्षात येत नाही. उदाहरणार्थ, संहितेसंबंधीची सर्व तांत्रिक चर्चा एका (म्हणजे पहिल्याच) ग्रंथात तिच्या सर्व अंगांसह यायला हरकत नव्हती. एका विभागात भारतीय आणि पाश्चात्य साहित्यविचारांचा व समीक्षेचा परिचय करून देणारे व संशोधनात त्यांचे महत्त्व सांगणारे लेख सलग यायला हवे होते. (हा विभाग या खंडात अभावाने जाणवतो आहे.)

दुसरी गोष्ट—'भाषा व साहित्य : संशोधन' असे जरी या ग्रंथाचे नाव असले तरी यात 'भाषासंशोधनाचा' कुठे मागमूस दिसत नाही. (डॉ. कल्याण काळे यांचा लेख प्रामुख्याने भाषासंशोधनाविषयी आहे असे म्हणता येणार नाही.) तसेच शैली-विज्ञानावरील लेख म्हणजे भाषासंशोधन नव्हे. खरे म्हणजे संपादकांना देखील भाषासंशोधन अभिप्रेत आहे असे वाटत नाही. कारण हा वेगळाच प्रांत आहे. त्यासाठी स्वतंत्र खंडाची आवश्यकता आहे. त्याच्या उपयोजित स्वरूपाविषयीचेच लेख साहित्य-संशोधन विषयक ग्रंथात येऊ शकतात.

संशोधकाने आपला प्रबंध लिहिताना भाषा कशी वापरावी, प्रबंध हा खरा 'बंध' कसा असतो याचे विवेचन या तीन खंडांत कुठेतरी यायला हवे होते. त्याचप्रमाणे साहित्य विचार व समीक्षा यात सतत वापरल्या जाणाऱ्या तांत्रिक शब्दांची व संकल्पनांची एक सूची देखील परिशिष्ट म्हणून हवी होती.

उत्तम संशोधकांचे महत्त्वपूर्ण मार्गदर्शक लेख प्रथमच अभ्यासकांना उपलब्ध होत आहेत. यात आणखी काय हवे त्याचा विचार करून डॉ. जोशी आणि साहित्य परिषदेतील त्यांचे सहकारी हे कार्य पुढे चालू ठेवतील, तर अभ्यासकांची सोय होईल.

(भाषा व साहित्यसंशोधन खंड ३. संपादक डॉ. वसंत जोशी, प्रा. म. ना. अदवंत,
महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०. पृष्ठे ३००. शंभर रुपये.)

(प्रा. य. शं. कळमकर, किसनवीर महाविद्यालय, वाई ४१२८०३)



अनुक्रमणिका

# लोकसंबंध विज्ञान : मोरजे-मिरीकर

## प्रसार माध्यमांनी मिळणारे ज्ञान व जनसंपर्क

**प्रा. सुनील भा. शिंदे**

प्रसारमाध्यमांच्या अथवा संज्ञापन साधनांच्या आधारे मिळणारे ज्ञान सुलभ रीतीने कसे स्वीकारावे ? अथवा अशा साधनांना सामोरे कसे जावे ? याबद्दल चर्चा करणारे पब्लिक रिलेशन्सवरील 'लोकसंबंधविज्ञान' हे पुस्तक उपयुक्त व माहितीपर आहे. मराठीतील एक समीक्षक आणि व्यासंगी संशोधक डॉ. गंगाधर मोरजे आणि नाट्य-संगीत समीक्षक, पत्रकार गोपाळ मिरीकर यांनी हे पुस्तक लिहिले आहे.

या ग्रंथात 'लोकसंज्ञापन', 'लोकसंपर्क', 'लोक संज्ञापनाचा भारतीय जीवन संदर्भात विचार' तसेच 'वृत्तपत्रविद्या' या विषयांवर मुद्देसूद चर्चा केली आहे. 'ज्ञापन' हा शब्दप्रयोग ज्ञान अथवा माहिती सांगणे, देणे या अर्थाने योजला असून एकत्रित येऊन समूहाने ज्ञानाचे आदान-प्रदान करणे म्हणजे 'लोकसंज्ञापन' (मास कम्युनिकेशन) हे एक शास्त्र आहे, या जाणिवेतून लोकसंबंध विज्ञानाचे विवेचन केले आहे.

लोकसंबंध शास्त्राच्या निमित्ताने माणसा-माणसांतील जिव्हाळा, आपुलकी, स्नेहसंबंध निर्मितीची प्रक्रिया विशद करतानाच 'लोकसंज्ञापनाचा उद्देश' स्पष्ट केला आहे. लोकसंज्ञापनाची आधुनिक साधने आणि लोकसंपर्क, वृत्तविद्या यांचे परस्परावलंबित्व यावर प्रकाशझोत टाकला आहे.

लोकसंज्ञापनाचा भारतीय जीवनपद्धतीच्या संदर्भात विचार मांडताना वेदवाङ्मय तसेच विदग्ध वाङ्मय या प्रकारांची मीमांसा केली आहे. लोककलांचा परिचय करून देत असतानाचा लोकशिल्प व वास्तुशिल्प, लोकसंकेत, चालीरीती, लोकदेवता, लोकरूढी, लोकश्रद्धा या संस्कृती स्रोतांचे पारंपरिक आणि सामाजिक संदर्भ नजरेआड केलेले नाहीत. केवळ माहितीच्या दृष्टीनेच नव्हे तर लोकसंस्कृतीच्या अभ्यासाच्या दृष्टीनेदेखील एक साधनग्रंथ म्हणून हे पुस्तक उपयुक्त आहे.

बाराव्या शतकानंतरच्या लोकसंज्ञापनाचा मागोवा घेताना अमृतानुभव, ज्ञानेश्वरी आणि त्यांचे अभंग यांची चर्चा करण्यात आली आहे. एकनाथांच्या भारूड संकल्पनेपासून तर रामदास, तुकारामांच्या रचनांबद्दलचे संज्ञापनचित्र रेखाटले आहे. एक प्रसार माध्यम म्हणून लोककलांचे स्थान काय, यावरही प्रकाश पडतो.

लोकसंपर्क (पब्लिक रिलेशन्स) अंतर्गत आवश्यक बाबी, लोकसंपर्काची व्याप्ती आणि शैक्षणिक समस्यांचे स्वरूप यांचा विचार स्वतंत्र प्रकरणात केला आहे. म. गांधींच्या शिक्षणविचाराबरोबरच परिसर महत्त्व विशद केले आहे. विशेषतः प्राथमिक, माध्यमिक



अनुक्रमणिका






आणि उच्चमाध्यमिक शिक्षणाच्याबाबतीत लोकसंपर्काचे स्वरूप सूत्रबद्ध मांडले आहे. शेती, व्यापार, समाजकल्याण, स्थानिक स्वराज्य संस्था, राजकीय पक्ष तसेच कायदा व सुव्यवस्था यांसारख्या क्षेत्रातील लोकसंपर्काचे स्वरूपही स्पष्ट केले आहे.

प्रसार माध्यमांच्या संदर्भात वृत्तपत्रविद्या या प्रकरणात पत्रकाराचे स्वभावविशेष, पूर्वतयारी यांबद्दलचा चिकित्सक आढावा घेण्यात आला आहे. पत्र आणि वर्तमानपत्र यांतील भेद सांगून 'बातमीची' प्रक्रिया उलगडून दाखवली आहे.

पत्रकारितेतील संकल्पना, तत्त्वज्ञान व नीतिमूल्ये, ध्येयप्रवण पत्रकारिता, सनसनाटी, शोधपर, विकासगर्भ पत्रकारिता यांचेही विश्लेषण केले आहे.

अखेरीस देण्यात आलेली 'विषयवार सूची' उपयुक्त आहे. एक उपयुक्त संदर्भग्रंथ म्हणून अभ्यासकांना हे पुस्तक मोलाचे ठरेल.

(लोकसंबंध विज्ञान— डॉ. गंगाधर मोरजे, गोपाळ मिरीकर. पद्मगंगा प्रकाशन, अहमदनगर, तीस रुपये.)

(प्रा. सुनील भा. शिंदे, कमान वेस, आकरकर लेन, अकोला ४४४६०१)

# कल्पद्रुमाचिये तळी : डॉ. रा. चिं. ढेरे

## ज्ञानेश्वर-ज्ञानेश्वरीवरील काव्यात्म चिंतन

प्रा. मधु जामकर

१९९० हे वर्ष महाराष्ट्रात ज्ञानेश्वरी सप्तशताब्दी वर्ष म्हणून साजरे होत आहे. 'कल्पद्रुमाचिये तळी' ग्रंथ या वर्षी प्रकाशित होतो, यामागे केवळ योगायोग नसून आशय-अभिव्यक्ती यातील अभिजात अद्वैत दिसून येते. या ग्रंथात डॉ. रा. चिं. ढेरे या चिकित्सक संशोधकाचे आणि काव्यात्म व्यक्तिमत्त्वाचे नितळ प्रतिबिंब दिसते ते वेगळेच. गेल्या तीस वर्षांत ज्ञानदेव आणि ज्ञानदेवी या एकवटलेल्या दुव्याचे गहिरे रंग, संशोधक रूप आणि भावपूर्ण विवेचन याचा एक हृदयंगम आलेख या ग्रंथात आढळतो. ज्ञानेश्वर हा या लेखकाचा केवळ चिंतनाचा विषय नसून त्यात त्यांना समानधर्मी दिसतो, अंतरीचे बोल सापडतात किंबहुना 'इथे हृदयीचे तिये हृदयी घातले'चा आत्मप्रत्यय येतो.

संशोधन ही डॉ. ढेरे यांची वृत्ती असून त्यामागची चिकित्सा ही त्यांची अंगभूत प्रकृती आहे. हे संशोधन प्राचीन वाङ्मयाचे असले तरी त्याला काव्यात्म पातळी लाभल्यामुळे ते स्थल-काल-व्यक्ती निरपेक्ष झाले आहे. शिवाय विद्वत्तापूर्ण आणि विद्वत्‌जड यांतील विवेक या संशोधनाने समतोलपणे सांभाळल्याने त्याला वेळोवेळी रसपूर्णता येते.

डॉ. ढेरे यांचे संशोधनपर लेखन ललित गद्याचे लावण्य खुलवून दाखविते. या संशोधनपर लेखनात ते सातत्याने एक काव्यात्म प्रवाह ओघवता करून देतात. यामुळे या

ग्रंथातील लेख विचारप्रवणतेपेक्षा भावगर्भतेकडे अधिक झुकताना दिसतात. ज्ञानदेव आणि ज्ञानदेवी, ज्ञानेश्वरांचे चरित्र, पसायदानाची संहिता आणि ज्ञानराजांची आरती या विषयीचे अभ्यासपूर्ण विवेचन सांस्कृतिक अंगाने झाल्याने त्याविषयी वाचकांच्या मनात एक प्रकारची आपुलकी राहते. एकाच विषयाचे दर्शन लेखक अनेकांगाने घडवीत असल्याने त्याच्या चौफेर दृष्टीने वाचकही चकित होतो. ज्ञानेश्वरीचे प्राचीन संशोधक अजमावतानाही ढेरे यांचा श्रद्धाळूपणा दिसतो.

हे लेख वाचताना वाचकांच्या बुद्धीची क्षितिजे विस्तारतात. एक कलापूर्ण भावानुभव त्याला येतो.

या ग्रंथाच्या शेवटच्या विभागात 'पैल तो गे काऊ कोकताहे' या ज्ञानेश्वरांच्या रचनेचा डॉ.ढेरे जो सौंदर्यवेध घेतात तो त्यांच्या मूलभूत काव्यप्रकृतीचा दाखला आहे. या समग्र रसग्रहणात लेखक भावसमाधीवर असल्याने त्याची अवस्था 'मन धाले, परि न धाये' अशी झाली आहे. ज्ञानेश्वरांची विरहिणी निसर्गाच्या अंगाने आपली व्यथा अधिक बोलकी करून जाते आणि ढेरे यांच्या शैलीतून ती तुमच्या आमच्या मनाच्या गाभाऱ्यात जाऊन बसते. या शैलीला 'दर्पणी पाहता रूप न दिसे आपुले' या भाव प्रत्ययाचे एक आवर्तन असून दुसरे 'मोगरा फुलला, मोगरा फुलला' या भावस्थितीचे आहे. वस्तुतः या तिन्ही गीतांत ज्ञानदेवाच्या परिपक्व मनाची पृथगात्म अशी एकमेकात मिसळलेली भावपूर्ण आवर्तने दिसून येतात. 'पैल तो गे काऊ कोकताहे'च्या निमित्ताने ज्ञानदेवकृत विरहिणीविषयीच ते बोलू लागतात. जी विरहिणी 'अवघ्याबाही म्यां व्योम कवळिले'चा साक्षात्कार अनुभवते तिला एकाच वेळी रूपवान अन् प्राणवान् व्हावे लागते. इथे आपल्या अनुभवाची लय आणि शब्दांची लय एकमेकांच्या सौंदर्याचा वेध घेताना दिसते. शब्दातून शब्दापलीकडे, इंद्रियातून अतींद्रियाकडे आणि रूपातून रूपापलीकडे ज्याचा प्रवास अंगभूत धर्म बनून राहिला त्याला मोगरा फुलल्याशिवाय आणखी काय दिसणार? या साक्षात्काराशिवाय दुसरे ते काय देणार? या भावानुभवातून आपण जेव्हा 'ताटी उघडा ज्ञानेश्वरा' या ललित लेखाकडे येतो तेव्हा स्वरूपतेची सीमा सायुज्यतेकडे आलेली असते.

या ग्रंथाचे प्रास्ताविक 'कल्पद्रुमाचिये तळी' आणि 'ताटी उघडा ज्ञानेश्वरा' हे भरत वाक्य होय. ज्ञानदेवाशी झालेली लेखकाची समरसता इथे केवळ भावसंकुल होत नाही, तर ती कल्पना, भावना आणि विचार यांच्या एकोप्याने समृद्ध बनते. त्यातून डॉ.ढेरे ज्ञानेश्वराविषयी व वाचक ढेऱ्यांविषयी अपूर्व श्रद्धा बाळगून राहतो.

(कल्पद्रुमाचिये तळी— डॉ. रा. चिं. ढेरे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे ४. पृष्ठ २१५. साठ रुपये.)

(प्रा. मधु जामकर, दिलासा, स्नेहनगर, परळी वैजनाथ ४३१५१५)



अनुक्रमणिका







# सार्थ अनुभवामृत : रा. ना. सराफ
## साक्षात्कारी भाष्याचे अभूतपूर्व सौंदर्य

अशोक जावडेकर

'ज्ञानेश्वरीच्या सप्तशताब्दी'च्या निमित्ताने ज्ञानेश्वरी अनुभवामृताबरोबरच त्यावर विवेचन करणाऱ्या अनेकांचे लेखन वाचनात आले. श्रेष्ठ-कनिष्ठ ठरवण्याचा, तुलना करून निष्कर्ष काढण्याचा उद्देश नाही. तथापि रा. ना. सराफांचा 'सार्थ अनुभवामृत' हा मधुर, सुंदर, तत्त्वचिंतक ग्रंथ वाचल्यावर तर मला असे वाटले की जीवनाचे सौंदर्य, त्याचा अर्थ, त्याची शक्ती आणि या सर्वांना व्यापून, भारून टाकणारे सत्य सहज प्रेमाने समजण्यासाठी प्रत्येक मराठी भाषकाने हे पुस्तक वाचलेच पाहिजे !

१६३५ मधील शिवकल्याणापासून १९१९ मधील 'जीवन्मुक्तयती'पर्यंत अनुभवामृताचे नामवंतांनी केलेले आस्वादन, समीक्षण व चिंतन विख्यात आहे. अलीकडच्या काळात जोग, साखरे, दासगणुमहाराज, सुबंध, बहिरट, शर्मा, श्रीस्वरूपानंद, पंडित, पु. य. देशपांडे, पेंडसे, विंदा करंदीकर, सोनोपंत, गो. नी. दांडेकर, वि. रा. करंदीकर, तर्कतीर्थ जोशी इत्यादी मान्यवरांनी त्यावर लेखन केलेले आहे. रमणमहर्षी, जे. कृष्णमूर्ती, द. रा. बेन्द्रे, निसर्गदत्त, अरविन्द यांच्या लेखन-भाषण-संवादातून अमृतानुभवविचारांचे सदैव मंथन आलेले आहे. श्री अरविंदांनी तर 'काव्याचे भवितव्य' मध्ये म्हटले आहे की भावी काळात उपनिषदस्मृतिश्रुती ग्रंथांची जागा (अनुभवामृतासारखी) कविता घेईल. एवढे निश्चितच की, वारकरी संप्रदायाची विठ्ठलभक्ती, नाथसंप्रदायाची योगसाधना, साहित्यप्रेमींची काव्यसौंदर्यरसिकता या सर्वांची गंगोत्री आणि परिणती अनुभवामृतात आढळून येईल. प्रेमाला ज्ञानाची, सौंदर्याला शक्तीची, सिद्धान्तसत्याला वास्तव अर्थाची तोडीस तोड अशी जोड असलेले अमृतानुभव हे एकमात्र मराठी काव्य आहे याचा प्रत्यय हा ग्रंथ वाचताना येतो. मात्र सराफांच्या विवरणाचे विशेष रसाकलन होण्यासाठी अनुभवामृताची मूळ आधारभूमिका माहीत असणे आवश्यक आहे.

जीवाला जीवन्त असल्याचा क्षणोक्षणी अनुभव येत असतो; तसेच सभोवताली सजीव आणि जीवरहित स्वरूपात जगत् पसरलेले आहे असे जाणवत असते. जीव आणि जगत् यांच्या संदर्भातून देवविषयक विचाराचा जन्म होतो. कुणी देवाचे अस्तित्वच नाकारतो तर कुणी सृष्टीला, शक्तीला मानतो; पण प्रत्येक क्षणी, प्रत्येक स्थळी देवाचा संबंध असलाच पाहिजे या मताला नकार देतो. अशा रीतीने जीव जगत् आणि देव यांचा एकेकाशी आणि सर्वांशी काय संदर्भ संबंध आहे हा मूलभूत प्रश्न होतो. देव आहेच किंवा तो नाहीच असा काहीही निर्णय घेण्यासाठी जीवाला विचार (ज्ञान) आणि विश्वास (भाव) हे दोनच मार्ग



अनुक्रमणिका






शक्य आहेत. यासंबंधात व्यासशंकराचार्य गोरक्षनाथादिकांचे द्वैत-अद्वैताबद्दलचे विविध श्लेष तसेच भक्ती, प्रेम, सौंदर्य इत्यादी भावगम्य अनुभव या सर्वांचा सहज-समावेश अनुभवामृतात आणि या अर्थाने अमृतानुभव हा सर्वकष प्रचीतीचा झालेला आहे.

सराफांचा विशेष हा की त्यांनी प्रत्येक ओवीचा, शब्दाशब्दाचा जो अर्थ वाटत पटत गेला आहे तो कुणाला किंवा परस्परविरोधी व निराळा वाटला तरीही तोच तेथे लिहिला आहे आणि निर्णय वाचकावर सोपवला आहे. या निराग्रही लेखनाची प्रस्तावनाकारांनी दखल घेतली आहे, सराफांनी दुसऱ्या कुणा भाष्यकाराचा किंवा त्याच्या लेखनाचा प्रतिहार किंवा पुरस्कार करण्यासाठी हाती लेखणी घेतली आहे अशी शंका घ्यायला जागा नाही.

प्रचलित पद्धतीने ग्रंथाची दहा प्रकरणांतील विभागणी ग्राह्य धरून आपल्याला उमगलेला अर्थ क्रमशः स्पष्ट केला आहे. प्रकरणाच्या आरंभीच व शेवटी अनुषंगिक विचार स्वतंत्रपणे मांडलेले आहेत. (हा अनुषंगिक भाग या ग्रंथात विस्तारभयास्तव मुद्रित केलेला नाही.) पण केवळ मंगलाचरणनमन आणि शिवशक्तिसमावेशनासारखे एकच प्रकरण अभ्यासले तरी ज्ञानदेवांचा अमृतानुभवातील विचार यथापूर्ण कळून येतो असा अनुभव आला !

जीवात आणि जगतात प्रतिक्षणी, प्रतिकणी बदल घडत असतात. चिद्विलासवादी सराफांना हे बदल खरे आहेत पण ते अविकृत परिणाम आहेत असे जाणवते. सराफांच्या या धारणेला अनुभवामृतात पाठबळ मिळते. चिद्विलासाचे प्रत्यंतर असा श्रीकृष्णाचे व ज्ञानदेवांचे साक्षात दर्शन झाल्याचा आध्यात्मिक अनुभव सराफांनी आरंभीच सांगितला आहे. अनुभवामृताचा प्रत्येकजण अधिकारी होऊ शकतो अशी त्यांची धारणा झाली आणि आत्मा हाच अमृतानुभवाचा विषय याचा त्यांना प्रत्यय आला. हे स्वरूप सांगावे हा ज्ञानदेवांचा उद्देश तोच त्यांचाही उद्देश झाला. आपल्याप्रमाणे सर्वांच्या हृदयात हा ज्ञानदीप प्रज्वलित होऊन विश्वाचा दिवाळसण आपल्यापरीने अनुभवला जावा या भावनेनेच सराफांनी या ग्रंथांचे लेखन केले. आत्म्याची अद्वैतसिद्धी करावी हा ज्ञानदेवांचा उद्देश त्यांनी स्वीकारला. (एकच पूर्णशंभूचा आत्मलीलाविलास म्हणजे हे सारे दृश्यादृश्य जगत् असे प्रगट अनुभवणाऱ्या) शिवशक्ति या एकात्म युगुलाच्या सत्यसौंदर्याच्या अनुभवाने सराफ भारावले हे निश्चित सांगणे सोपे नाही. असे हे अद्‌भूत लेखन सराफांच्या पश्चात् आता सर्वांना उपलब्ध झाले.

नमनमंगलाचरणामध्ये ज्ञानदेवांनी सद्‌गुरू निवृत्तिनाथांबद्दल कृतज्ञता व्यक्त केली, चिद् आणि विलासरूप अशा दिव्य शिव आणि शक्ती यांना जनक म्हणून वंदन करून, आत्मभावाने पूर्णशंभुरूप एकसत्याचा अनुभव घेतला. तो दिव्य आनंद इतरांना देण्यासाठी शिवशक्तिसमावेशनापासून त्यांनी प्रारंभ केला. या प्रारंभाच्या प्रकरणापासून अखेरपर्यंत सराफांच्या विवरणात तत्त्वचिंतन आढळते, सिद्धान्तसत्याचा बोध होतो, काव्यमय सुंदरतेचाही अनुभव येतो, त्यांचे सामाजिक व मानवमानसशास्त्रीय निरीक्षण जाणवते आणि



अनुक्रमणिका

निरपेक्ष निष्कपट जिव्हाळ्याचा प्रत्यय येतो. अभिजातता, आदर्शवाद, वास्तववाद, गूढरहस्यप्रेमी सौंदर्यवाद हे विविध स्थळांतून जाणवतात. अशी सर्व स्थळे येथे देणे अपेक्षित नाही. खरे तर ती मुळातूनच वाचावीत. पण काहींचा निर्देश करणे प्राप्त आहे.

शिवशक्ती अद्वैत आहेत असे मानल्यावर त्यांचा दोनपणा मिथ्याच ठरतो. परंतु एकाहून अधिक पण दोनाहून कमी अशी गणिताला न सुटणारी शिवशक्तिस्वरूपाची बिकट समस्या ज्ञानदेवांनी कशी सोडवली यावरील विवरण–'स्वतःच्या सुखाचीही केवढी आवड ! एकामध्ये दोनपणा मिळवून कौतुकाने सुद्धा एकपणा फुटू देत नाहीत !' (शिवशक्तिसमावेशन)

कोणाचेही घेत नाहीस, आपलेही कोणाला देत नाहीस, मग कोण जाणे तुला गौरव मोठेपण कसे प्राप्त होते !– न उत्पन्न होणाऱ्या, नष्ट न होणाऱ्या, तर स्वतःतच घुमत राहणाऱ्या हिला सुखाला सुख होणे हीच उपमा देता येईल (जीवन्मुक्तविवरण)

आवश्यक असणाऱ्या आरशाशिवाय कुणी आपल्या मुखाचे ज्ञान कौशल्याने करतील तर त्यालाच हातोटीने रूपाशिवाय सौंदर्य, आघाताशिवाय नाद, मनाशिवाय मदनबाधा असे वर्म समजेल (सच्चिदानंदपदत्रयविवरण)

दृष्टी आरशात पाहून आरशातील दृष्टीला भेटण्यासाठी गेलीच तर दृष्टी स्वतःलाच भेटते, आरशातील प्रतिबिंबाची दृष्टीस भेटच होत नाही, तसे वृत्तीचे थांबणे होते (जीवन्मुक्त दशाविवरण)

अशा ओव्यांवरील विवरणात सराफांना रमणमहर्षींच्या रमणगीतेचीही आठवण येते: साधकाला उमजलेल्या अभिनव सत्याचे प्रत्यंतर कुणा दृश्यमान व्यक्तिमत्त्वात साकार होणे सहजच आहे. ज्ञानदेव विवरण वाचताना कुणाला समर्थ रामदास दिसतात, कुणाला रामकृष्ण परमहंस दिसतात. सराफांनी श्लोक उद्धृत केला आहे,

*"शक्ते ! संचलनादेव लोकानां तातसंभवः ।*
*चलनस्याश्रयोवस्तु न संचलतिकर्हिचित् ॥" (१२ अध्यायश्लोक)*

शक्तीच्या घडामोडीमुळे विश्वाची उत्पत्ती होते पण शक्तीला आधारभूत असलेले तत्त्व (शिव) आपल्या स्वस्थितीहून कधीच हालत नाही, शिवाच्या आधारावरच शक्तीचा सारा जगद्विलास अवलंबून आहे. पाँडिचेरीच्या मदरनी अरविंदाबद्दल म्हटले आहे, "Without Him I cannot exist, without Me He cannot express" श्री अरविन्दांना static Potential व माताजींना Dynamic Kinetic असे स्थितिगतिशील शिवशक्तिस्रोत मानतात यावरून अनुभवामृतातील ज्ञानदेवांनी सद्चिद्विलासात मांडलेल्या विचाराचे सार्वकालीन सर्वव्यापी सर्वसमावेशक स्वरूपच प्रत्ययाला येते.

गोसावी या शब्दाच्या विविधांगी अर्थछटेतून सराफांच्या सर्वसमावेशक सूचकतेचे संक्षेपण दिसून येते. काव्यरूप रचनेत मिळणाऱ्या या रहस्यविस्मयकारी रचनासौंदर्याचा लाभ एरव्ही गद्यलेखनास दुर्मिळच राहिला असता.

अज्ञानखंडनात जुगाऱ्यावर टिपण करताना सूक्ष्म पाठभेदचर्चा दूर ठेवून सराफांनी ज्ञानदेवांच्या मूळ विचारप्रवाहाची गती व सुसंगती हीच प्रमाण मानली आहे. कारण तत्त्वबोधाचे सौंदर्य अनुभवात, आनंदात आहे हे त्यांना सतत जाणवले आहे. तर्काच्या पलीकडे असलेल्या विषयांचे सराफांचे गद्यरूप विवरण रूक्ष शब्दजंजाळ न बनता प्रत्ययकारक झाले आहे. संगीतरागविलासात तेच आरोही-अवरोही स्वर भिन्न संगतींनी व भिन्न गतींनी पुन्हापुन्हा येत असतात तेव्हा त्याच रागाचे रंगच, छटा गडद रूपात ऐकायला येत असतात. साधक सराफ 'हे मागे सांगितलेच आहे' असे जाणत्या वाचकांना विनयाने सांगतात तेव्हा 'आवृत्तिरूपदेशो असकृत्' असा प्रत्यय येतो. असणे हेच दिसणे, पाहणे, दाखविणे यापेक्षा अधिक आवश्यक आहे आणि दिसण्या-पाहण्यामुळे असण्याला आनंदाची गोडी येते. याबद्दलची गहन प्रमेये शिवशक्तिसमावेशनात शंभुशांभवी बोधातून व्यक्त करताना आलेल्या माधुरीचा मुळातून अनुभव घ्यायला हवा. जो सदाशिव स्वतःच्या प्राणेश्वरीचे शरीर होऊन स्वतःच तिचा प्राणप्रिय होतो तोच विसाव्या शतकात 'सेल्फलेस सेल्फिशनेस' बनून अनुभवायला मिळतो.

सराफ सांगतात, "भक्ताला स्वतःची जाणीव असते तेव्हा देवाची नसते आणि देवाची जाणीव असते तेव्हा स्वतःच जाणीव राहत नाही— "मै— तुम" न करणारा कबीरभक्तच भूतेशु आणि भवानी यांना सिनानी न करता नमन करतो. सराफ सांगतात, "बाबारे, बुद्धी ही सुद्धा एक प्रकारची निद्राच आहे !" ज्ञानोत्तर आनंदाची परमशांती सराफ स्पष्ट करतात तेव्हा श्री अरविंदांच्या 'अवर ऑफ गॉड' या शुभ समयी जणू अविद्येचा नाश करणारी विद्याही विरून जाते. सुगंधलाच नाक येते आणि पूर्ण असलेला शंभूच पूर्ण होतो ! हाच अमृतानुभव !

सराफ सांगतात या अमृतानुभवाची स्मृती अनेक मनू ओलांडून अमर झाल्याने चिरंतन मनुस्मृती बनते, हे स्मृती अव्हेरणाऱ्यांनी स्मरणात ठेवले पाहिजे.

सराफांच्या अनुभवामृत ग्रंथपठनाची फलश्रुती वरद आश्वासन अखेरीस सांगण्याचा पारंपरिक संकेत इथे मुळीच आवश्यक नाही. तथापि प्रातिनिधिक वानगीदाखल एक जाणवलेले निरीक्षण सांगणे सयुक्तिक आहे की विलग झालेले आदर्शवादी बुद्धिजीवी पति-पत्नी शिवशक्तिसमावेशन विवरण वाचल्यावर सत्यार्थतेने जीवनसौंदर्य उमजून अधिक समरस एकरसच होऊन गेलेले आहेत !

(सार्थ अनुभवामृत— रा. ना. सराफ, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई ४. पृष्ठ ३९२. एकशेवीस रुपये.)

(अशोक जावडेकर, ३१/४४३ लोकमान्यनगर, पुणे ४११०३०.)



अनुक्रमणिका

# अपार्थिवाचे गाणे : संपादक– कोत्तापल्ले/भोसले

## ज्ञानेश्वरांच्या १०० अभंगांचे १२ प्रकरणांमधील वर्गीकरण

सौ. वसुंधरा बनहट्टी

डॉ. नागनाथ कोत्तापल्ले आणि डॉ. द. ता. भोसले, यांनी ज्ञानेश्वरांच्या निवडक १०० अभंगांचे संकलन केले आहे.

ज्ञानदेवांच्या अभंगांचा अभ्यास, तुलनेने पाहता फार थोडा केला गेला आहे. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्टी ही त्यांची रचना निरनिराळ्या दृष्टिकोनांतून बरीच अभ्यासिली गेली आहे. ज्ञानेश्वरी जशी काव्य, तत्त्वज्ञान, योग, भाषा, अध्यात्म ह्या सर्व दृष्टींनी अभ्यासिता येते, तसाच अभ्यास त्यांच्या अभंगांचाही करता येतो. फरक दोहोंत एकच आहे. ज्ञानेश्वरीतील अभिव्यक्तीमागे, पार्थसारथी श्रीकृष्णाच्या विचारांचे अनुस्यूत सूत्र आहे; तर गाथेमधे अगदी स्वतंत्र विचार व अनुभव आहेत. इतकेच नव्हे, तर प्रत्येक अभंग एकमेकापेक्षा वेगळा आहे. त्यातील विचार, अनुभव , मूड आणि आविष्कार ह्यांत विविधता आहे. ते पूर्णतः ज्ञानेश्वरांच्या व्यक्तिगत भावनांचे, कल्पनांचे, विचारांचे प्रकटीकरण आहे. ज्ञानेश्वर जन्मजात कवी असल्याने ह्याचा आविष्कारही अंतर्बाह्य काव्यातच झाला आहे.

एक 'भक्त' म्हणून ज्ञानदेवांचा विकास कसा झाला हे शोधण्याची दृष्टी अभंग निवडताना ठेवलेली आहे. ह्या 'अपार्थिवाच्या गाण्यात' 'अपार्थिव' शब्द महत्त्वाचा. ज्ञानेश्वरांच्या व्यक्तिमत्त्वातली आणि त्याअनुषंगाने ह्या अभंगात व्यक्त होणारी 'अपार्थिवता' येथे मध्यवर्ती आहे.

संन्याशाची पोरे म्हणून आयुष्याच्या कोवळ्या वयात छळ सोसलेल्या ज्ञानेश्वरांच्या अभंगांत त्यांचे लौकिक जीवन फारसे सापडत नाही. ह्या आत्मनिष्ठ प्रकारातही स्वतःच्या दुःखाची अभिव्यक्ती, छळाची आठवण, समाजाबद्दलची कटुता, वैताग कुठेही दिसत नाही. इतकेच काय, पण वैयक्तिकताही नाही. 'अवघाचि संसार सुखाचा करीन' असे म्हणतानाही विश्वाचा संसार डोळ्यांपुढे असतो. प्रपंच आणि संसार, हे खरेतर एकाच अर्थाचे शब्द. पुढे रामदासांनी प्रपंचाचे तत्त्वज्ञान सांगितले त्यात व्यवहार होता. पण त्याच अर्थाच्या ज्ञानेश्वरांच्या संसारात विश्वव्यापकता आहे. लौकिकार्थाचा तो संसार नाही. मुक्ताबाईच्या 'ताटी उघडा ज्ञानेश्वरा' ह्या अभंगात वैयक्तिक कटू अनुभवाच्या निमित्ताने अध्यात्माची, परमार्थाची शिकवण आहे. गाथेतील निवृत्तिनाथांच्या 'एकांती बाळा, की सोहंसुखशयनवेळा' ह्या अभंगात ज्ञानेश्वरांना 'बाळा !' असे संबोधून कृष्णस्वरूपाचे सुंदर वर्णन केलेले आहे. पण ज्ञानेश्वरांच्या अभंगात मात्र नातेवाइकांचे, प्रियजनांचे निमित्तही नाही. त्यांनी निवृत्तिनाथांचा उल्लेख अतीव प्रेमाने, आदराने, पण गुरू म्हणूनच केला आहे.










तुकारामासारख्या कालदृष्ट्या पुढच्या संतांनी अभंगांतून आपल्या उत्कट अनुभवांना वाचा फोडली. ज्ञानेश्वरांच्या अभंगात उत्कटता आहे. पण तिची पातळी मात्र सदैव आत्मानुभवी, आध्यात्मिक, साक्षात्कारी अशीच राहिलेली आहे.

ज्ञानेश्वरांचे व्यक्तिमत्त्व, त्यांची कविता यांचा विकास शोधणे, अभंगातील वाङ्मयसौंदर्य शोधणे हा येथे उद्देश आहे. ज्ञानेश्वरांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास, म्हणजे त्यांचा आत्मिक विकास. 'वैयक्तिकतेचा निरास करून, आपला अनुभव, व्यापक आणि अपार्थिव पातळीवर नेण्याची त्यांची ताकद' व्यक्त करणारे अभंग यात आहेत.

आपले अध्यात्मनिरूपण लोकांना कळावे म्हणून ज्ञानेश्वरांनी जनसामान्याशी जवळीक साधली. लोकपरंपरांचा स्वीकार करून, लोकवाङ्मयाद्वारे ते लोकजीवनाच्या जवळ गेले. त्याला त्यांनी उच्च आध्यात्मिक मनोबुद्धीने तेज प्राप्त करून दिले. आत्मा हा परमात्म्याचाच एक अंश आहे हे पटविणारे अभंग, काव्याची कोवळीक प्रत्ययाला आणून देणारे अभंग, भावनेने भरलेले तुडुंब मन व्यक्त करणारी शब्दकळा लाभलेले अभंग, परमेश्वर-विरहाची उत्कटता व्यक्त करणाऱ्या विराण्या, देवाच्या सगुण-निर्गुणाच्या छायाप्रकाशाने दिपलेले मन व्यक्त करणारे अभंग, अशा सर्वांची एक भरगच्च, प्रफुल्लित पुष्पमाला येथे आढळते.

ह्यात विषयानुरूप १२ प्रकरणे केली आहेत. मंगलाचरण, गुरुमहिमा, हरिपाठ इत्यादी विषयांवरील अभंगांवर निवेदने आणि थोडक्यात रसग्रहणे केली आहेत. प्रकरणाच्या शेवटी त्या त्या विषयाचा अर्क किंवा आत्मा सांगणारे विधान आले आहे. 'उपमा नसलेले सौंदर्यरूप म्हणजे परमेश्वर,' अभंगाची लय ही अलौकिक आनंदाचा ताल पकडणारी आहे. 'येथे मोगऱ्याच्या वेलीमुळे आत्मतत्त्वाचे व्यापक होणे सहज साकार झाले आहे.'

ज्ञानदेवांच्या उपलब्ध ११२१ अभंगांमधून, केवळ १०० अभंग निवडायचे काम, तसे कठीणच. ज्ञानेश्वरांचे अभंगवाङ्मय दक्षिणेतल्या शिल्पांप्रमाणे भव्य आणि कलाकुसरीचे आहे. तिथल्या शेषशायी विष्णूच्या मूर्तीचे दर्शन ३-४ वेगवेगळ्या गवाक्षांमधून घ्यावे लागते. ज्ञानेश्वरांच्या गाथेचे दर्शनही मनाची कवाडे अनेक दिशांनी उघडून घ्यावे लागते. 'अपार्थिवाचे गाणे'च्या निमित्ताने एक गवाक्ष उघडे झाले आहे. त्यातून घडणारे दर्शन रम्य आहे.

(अपार्थिवाचे गाणे. सं. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले व डॉ. द. ता. भोसले. प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठ १०४. अठ्ठावीस रुपये.)

(सौ. वसुंधरा राजेंद्र बनहट्टी, सुविचार प्रकाशन, टिळक रोड, पुणे ३०.)

---

**साभार-स्वीकार**

१८. सीनाकाठच्या कविता– आ. य. पवार, चंद्रमौळी प्रकाशन, कडेगाव (नगर), पृष्ठे– ६६, तीस रुपये.

१९. प्रतीक्षा– अनुसया कुंभार, मायबोली प्रकाशन, मुंबई– १३, पृष्ठे– ७९, साडेबारा रुपये.



अनुक्रमणिका

# मस्तकी हिमालय अंतरंगी अंगार : यदुनाथ थत्ते

## डॉ. आंबडेकर-महात्मा गांधी यांच्या द्रष्टेपणाचे दर्शन

प्राचार्य पुरुषोत्तम शेठ

सामाजिक बांधिलकीचे भान ठेवून धर्मातीत राष्ट्रवादावर अनन्य निष्ठा ठेवून सामाजिक कार्य व वृत्तपत्रीय लिखाण करणाऱ्या लेखकांत यदुनाथ थत्ते यांचे महत्त्वपूर्ण स्थान आहे. साने गुरुजींचा सहवास लाभलेल्या व येवल्याच्या आपटे गुरुजींच्या राष्ट्रीय शाळेत संस्कारसंपन्न झालेल्या यदुनाथजींच्या जीवनमूल्यांना अनुरूप असे हे पुस्तक आहे. एकूण ६ भागांत विचारांची मांडणी केली आहे. डॉ. आंबडेकर व्यक्तित्व आणि कर्तृत्व, धर्मांतराचे प्रश्न, डॉ. आंबडेकरांचे विचार, महात्मा गांधींच्या विचारांचा मागोवा– यावरोवर काही सामाजिक प्रतिक्रियाही व्यक्त केल्या आहेत.

डॉ. आंबडेकर हे जागरूक पत्रकार होते. 'बहिष्कृत भारत, मूकनायक, जनता, प्रबुद्ध भारत' या आंबेडकर संपादित वृत्तपत्रांतील अनेक उतारे देऊन यदुनाथजींनी हे दाखवून दिले आहे. आंबडेकर हे भाषाप्रभू होते. प्रश्नाच्या गाभ्याला हात घालणारे विचार आणि संघर्षासाठी ललकार यासाठी जी ओजस्वी भाषा लागते ती डॉ. आंबेडकरांनी आत्मसात केली होती. उपेक्षित समाजाच्या दुःखांना त्यांनी जळजळत्या भाषेत वाचा फोडली. आंबेडकरांच्या वृत्तपत्रीय गुणांची योग्य तेवढी दखल घेतली गेली नाही अशी खंतही यदुनाथजी व्यक्त करतात. महात्मा गांधींनी आंबेडकरांचे काही लेख 'हरिजन' मध्ये प्रसिद्ध केले याचाही पुरावा ते सादर करतात.

डॉ. आंवेडकरांकडे लोक एक कायदेपंडित म्हणून पाहतात. त्यांनी अर्थशास्त्रासंबंधीही काही मूलभूत विचार व्यक्त केले होते. याचे अनेक दाखले ते देतात. जातीयपद्धतीचा अर्थशास्त्रीय पाया, अस्पृश्यतेचा अर्थशास्त्रीय आधार, आर्थिक लोकशाही, समाजवाद विरुद्ध हिंदुत्ववाद हे लेख आंबेडकरांच्या अर्थशास्त्रीय विचारांची ओळख पटवतात.

धर्मांतर करून हिंदू झालेल्यांना जात कोणती देणार या प्रश्नाबरोबर हिंदू धर्मातून सामूहिक धर्मांतर करणाऱ्या व्यक्तींच्या हिंदू समाजाबद्दलच्या नाराजीचाही ते मागोवा घेतात व हिंदुत्ववाद्यांनी धर्मांतराच्या प्रश्नाचा सखोल विचार केलेला नाही हे ते निदर्शनास आणून देतात. डॉ. आंबेडकरांचे हे विचार मनाला पटतात. 'हिंदू धर्म हा असा एक अनेकमजली देखणा महाल आहे की ज्यात एका दालनातून दुसऱ्या दालनात प्रवेश करायला दरवाजे नाहीत आणि एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर जा-ये करण्याला जिने नाहीत.' या छोट्याशा वाक्यात आंबेडकर हिंदू धर्माचे चौकटबंद स्वरूप आपल्यासमोर उभे करतात.

या पुस्तकातील सर्वांत करुण भाग जो आहे तो महात्मा गांधीच्या ज्येष्ठ पुत्राने



अनुक्रमणिका







मुस्लीम धर्माचा अंगीकार केला त्या संदर्भातला आहे. या धर्मांतराबावत मुस्लिम नेत्यांना लिहिलेली पत्रे आणि मुस्लिम नेत्यांनी त्यांना दिलेला मनस्ताप हे सर्व मुळात वाचण्यासारखे आहे. "हरीलालचा धर्मत्याग हा हिंदू धर्माला हानिकारक नाही आणि तो पूर्वीप्रमाणे आजही चारित्र्यहीनच असेल तर इस्लाम धर्मात त्याला प्रवेश देणे हे त्या धर्माला न्यूनत्व आणण्यासारखेच आहे. . . निर्मळ अंतःकरणावाचून केलेले धर्मांतरही ईश्वरप्रेमी माणसांच्या दृष्टीने आनंदाची नव्हे तर दुःखाची गोष्ट होय" असे महात्मा गांधींनी म्हटले होते. कस्तुरबांनी आपल्या मुलाला इस्लामची दीक्षा देणाऱ्या मुसलमान बंधूंना उद्देशून जे पत्र लिहिले त्याचे काही उतारेही यदुनाथजींनी उद्धृत केले आहेत. एका हिंदू मातेचे अंतःकरण व तिची धर्मांतराबावतची भूमिका आपल्याला स्पष्ट समजते. शुद्धिवादी हिंदुत्ववाद्यांनी धर्मांतराबाबतचे हे विचार जाणून घ्यायला हवेत.

यदुनाथजींनी महात्मा ज्योतिबा फुले आणि डॉ. बाबा आढाव यांच्या 'एक गाव एक पाणवठा' चळवळीच्या निमित्ताने काही विचार मांडले आहेत. सवलतीचा पांगुळगाडा या लेखात सवलतीच्या राजकारणातून निर्माण होणारे सामाजिक प्रश्न चर्चिले आहेत. "साक्षरांची पहिली पिढी मागासवर्गीयांच्या घरात तयार होऊ लागली आहे. त्यांचे गृहपाठ कोणी करून घ्यावेत आणि तपासावेत हा प्रश्न शिल्लकच राहिला. . . अशा मुलांना सोई-सवलती दिल्या पाहिजेत. नाहीतर मस्तवाल घोड्यांच्या दुगाण्याच फक्त त्यांना खाव्या लागतील." मंडल आयोगाच्या संदर्भात हे लेख सवलतीच्या राजकारणाचे नवे पैलू प्रकट करतात. हिंदू विरुद्ध हिंदू या लेखात यदुनाथजींनी डॉ.लोहियांचे हिंदू धर्मासंबंधीचे विचार सांगून हिंदू धर्म आपल्या विरोधकांना पचवून टाकण्यास समर्थ आहे असे मत दिले आहे.

संघ परिवाराच्या विचारासाठी व सावरकरवाद्यांसमोरील काही प्रश्न हे दोन लेख यदुनाथजींच्या निधर्मवादी विचारसरणीला साजेसे आहेत. गांधी, आंबेडकरवाद या लेखात महात्मा गांधी यांचे कार्य आंबेडकरांच्या चळवळीला पूरक होते असे ते पटवून देतात. मातृभूमीसाठी 'तुजसाठी जनन, तुजसाठी मरण' या न्यायाने आयुष्याचा होम केला त्या स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या संदर्भातील यदुनाथजींचे लिखाण थोडेसे पूर्वग्रहाने शबलीत झाले आहे. सावरकरांनी आपल्या वैयक्तिक जीवनात विज्ञाननिष्ठा जपली होती. यदुनाथजी जेवढे तिखट भाषेत प्रहार करू शकणार नाहीत येवढे प्रहार सावरकरांनी हिंदूंच्या कर्मकांडावर केलेले आहेत.

'मस्तकी हिमालय अंतरंगी अंगार' हे पुस्तक थंड डोक्याने वाचल्यास हिंदुत्ववादी मनालाही आपल्या वाटा कितपत बरोबर आहेत हे तपासायची इच्छा होईल. या पुस्तकांत विचारांची पुनरावृत्ती आहे, असंख्य अवतरणे आहेत, तरीही यदुनाथजींचे हे समाजचिंतन अंतर्मुख होऊन वाचण्याची गरज आहे.

(मस्तकी हिमालय, अंतरंगी अंगार : यदुनाथ थत्ते, निर्मल प्रकाशन, नांदेड. पृष्ठ १९२, पन्नास रुपये.)

(प्रा. पुरुषोत्तम शेठ, ९२९, शनिवार पेठ, सातारा.)










# आज्ञार्थी गीता : डॉ. व. दि. कुलकर्णी
## गीतेतील आचारधर्माचे ४८ आदेश

शंकर सारडा

भगवद्‌गीता हा भारतीयांना आध्यात्मिक आणि व्यावहारिक पातळीवर मार्गदर्शक ठरणारा ग्रंथ आहे; आणि कोणाही जिज्ञासू भारतीय विचारवंताला व कार्यकर्त्याला कधी ना कधी भगवद्‌गीतेचा आधार घेतल्याविना आपल्या आयुष्याचा अर्थ उमगत नाही. भगवद्‌गीतेकडे मंत्रग्रंथ म्हणून पाहिले जाते. तद्वत ज्ञानयोग, कर्मयोग, भक्तियोग या त्रिकांडवेदाचा शास्त्रग्रंथ म्हणूनही त्याचे महत्त्व अपरंपार आहे. ब्रह्मविद्यान्तर्गत, योगशास्त्र, अध्यात्मशास्त्र, ज्ञानमूलम, भक्तिप्रधान, निष्काम कर्मयोगशास्त्र वगैरे दृष्टींनी गीतेचा उलगडा करून घेतला जातो. जो तो साधक, अभ्यासक आपापल्या परीने या ग्रंथांमध्ये नवनवी दर्शने शोधत राहतो.

गीता हा व्यावहारिकदृष्ट्या काही विशिष्ट आचारसूत्रे मांडणारा ग्रंथ आहे, असेही दिसते. श्रीकृष्णांने गीतेमध्ये जे जे आदेश दिलेले आहेत, असे असे कर, असे असे आचरण कर अशा आज्ञा दिलेल्या आहेत, अशा आज्ञांचे संकलन करून, त्यांचे वर्गीकरण करून, गीतेचा संदेश समजावून घेणे सर्वसामान्य माणसांना सुलभ जाऊ शकेल. स्वामी शिवानंदांनी सप्तश्लोकी गीता, प्रतिज्ञा गीता या कल्पनांच्या आश्रयाने गीतेचे सार लोकांपुढे ठेवले. श्रीकृष्णाचे गीतेतील आदेश म्हणून २९ श्लोकही वेगळे काढले. गुरुवर्य आबासाहेब कुलकर्णी यांच्या आदेशानुसार डॉ. व. दि. कुलकर्णी यांनीही गीतेतील आज्ञावचनांचा मागोवा घेतला आणि अठ्ठेचाळीस आज्ञार्थी श्लोकांची जंत्री केली. या श्लोकांचे आठ ढोबळ गटांत वर्गीकरण केले आणि सुगमरीत्या अर्थसंगती लागेल, अशी त्यांची क्रमवारीही ठरवली.

(१) ऐक हे वाक्य उत्तम, (२) नेमिले ते करी कर्म, (३) योगकर्मात कौशल, (४) ते वैरी जाण तू इथे, (५) मन्मन तू होई, (६) सर्व गूढातले गूढ एके तू पुन्हा, (७) झुंजू ते सुखे, (८) शरण ये, तुला मी पापमुक्त करीन, अशा आठ गटांत गीतेतील आज्ञांची मांडणी बसवून, श्रीकृष्णाचा संदेश नेमका साररूपाने आपल्या मनोबुद्धीला आकळावा, असा हा प्रयत्न आहे. वर्गीकरणातील काही श्लोक थोडे इकडे-तिकडे करता येतील, परंतु त्यामुळे अर्थामध्ये मूलगामी असा काही फरक पडत नाही. जीवनाचे श्रेष्ठतम ध्येय व श्रेय, नित्यकर्माचे आचरण, कर्माला आवश्यक अशी योगाची जोड, शत्रूंचे स्वरूप, ईश्वराशी एकरूपता, गुह्यतम ज्ञान, शत्रूशी प्राणपणाने लढण्याचे महत्त्व आणि शरणागतांना मोक्ष देण्याची ईश्वरी रीती या मुद्द्यांमधून गीतेचा संदेश आपोआप उमलत जातो.



अनुक्रमणिका








डॉ.कुलकर्णी यांनी ही ४८ श्लोकांची आज्ञार्थी गीता प्रथम सिद्ध केली, त्याला १५ वर्षे झाली; परंतु केवळ ४८ श्लोक व त्यांचे अर्थ देऊन चार-आठ पृष्ठांची पुस्तिका काढण्यात त्यांना स्वारस्य वाटले नाही. प्रास्ताविक, समग्र गीतेचा संदर्भ, गीतेवरील विविध भाष्ये, वगैरेंची जोड देऊन अभ्यासपूर्ण असे पुस्तक तयार करण्याची इच्छा त्यांनी मनी बाळगली. पंधरा वर्षे त्यात गेली. दरम्यान, या पुस्तकाच्या प्रकाशनाचा आग्रह धरणारे त्यांचे गुरुवर्य आबासाहेब कुलकर्णी आणि त्यांच्या पत्नी, तसेच डॉ.कुलकर्णी यांची आई आणि पत्नी यांचे प्राणोत्क्रमण झाले. सारी कामे सोडून आधी हे काम करा, हा पत्नीचा आग्रह; पत्नीच्या निधनानंतर त्या आग्रहाची तीव्रता अधिकच जाणवत गेली आणि अखेर हा अंतरीचा ठेवा बाहेर आला.

मूळ श्लोक, त्यांचा अन्वय अर्थ, 'गीताई' मधील विनोबांचे श्लोक, भावार्थ, उपसंहार, विवेकानंदांचे विवेचन, स्वामी शिवानंदांनी निवडलेले आदेशात्मक श्लोक यामुळे या सर्व मांडणीला विद्वत्तापूर्ण बैठक लाभली आहे. शिवाय डॉ. कुलकर्णी यांच्या पत्नीने लिहिलेली भगवद्‌गीतेतील श्रीकृष्णाची भूमिका हा लेख या आज्ञार्थी गीतेला रहस्योद्‌घाटक प्रस्तावना म्हणून वापरला आहे.

गुरुवर्य कुलकर्णी यांचे व्यक्तिचित्रही उभे केले आहे. निवृत्ती-ज्ञानदेवासारखाच गुरू-शिष्य भक्तीचा हा एक हृदयंगम आविष्कार आहे. प्रबोधन रिसर्च असोसिएट या सद्‌धर्म विद्येच्या प्रसारात रस घेणाऱ्या संस्थेने या पुस्तकाच्या प्रकाशन वितरणाची जबाबदारी श्रद्धापूर्वक स्वीकारली आहे. ज्ञानेश्वरीच्या सप्तशताब्दी वर्षात ही सुटसुटीत आज्ञार्थी गीता उपलब्ध होत आहे, ही लक्षणीय बाब आहे.

(आज्ञार्थी गीता : डॉ. व. दि. कुलकर्णी, प्रबोधन रिसर्च असोसिएट, १७ के. जी. बी. निवास, गिरगाव, मुंबई ४. पृष्ठे : ७२. किंमत पंधरा रुपये.)

---

## मनुष्याची ज्ञानसाधना : डॉ. दु. का. संत

### आधुनिक ज्ञानाचा भव्य पट उलगडून दाखवणारा ग्रंथ

---

**डॉ. हरी श्रीधर शेणोलीकर**

---

'ज्ञान मिळविणारा प्राणी म्हणजे मनुष्य होय' या व्याख्येप्रमाणे मनुष्याची खरी अर्जित संपत्ती म्हणजे त्याने संपादन केलेले विविध प्रकारचे ज्ञान होय. ते ज्ञान म्हणजे काय ? त्याची मूळ सुरुवात कशी झाली ? येथपासून ते अगदी आजच्या काळात विज्ञानाने माणसाला जेथवर आणून ठेवले आहे, तेथपर्यंतच्या माणसाच्या 'ज्ञानसाधनेचा ऐतिहासिक आलेख' डॉ. दु. का. संत यांनी प्रस्तुत पुस्तकात अवघ्या २५० पानांत समर्थपणे काढला आहे.



अनुक्रमणिका






माणसाच्या 'ज्ञानसाधनेचा सर्वांगीण इतिहास' या ग्रंथाच्या रूपाने मराठी भाषेत प्रथमच उपलब्ध होत आहे. त्यासाठी डॉ.संत धन्यवादास पात्र आहेत.

व्यासंगी विद्वान, मूलगामी प्रवृत्तीचे संशोधक, सामाजिक दृष्टीचे विचारवंत आणि नव्या नव्या विषयांवर तात्त्विक स्वरूपाचे लेखन करणारे मराठी ग्रंथकार म्हणून प्रा. संतांना त्यांच्या आधीच्या ग्रंथांनी [साहित्य आणि संस्कृती (१९५०), मराठी स्त्री (१९५७), संशोधन : पद्धती, प्रक्रिया, अंतरंग (१९६६), वाङ्मयीन विद्वत्ता (१९७६), शोधविज्ञान कोश (१९८५)]
चांगली मान्यता मिळवून दिली आहे. श्री. म. माटे यांच्या 'विज्ञानबोधा'कडून प्रेरणा घेऊन परिश्रमपूर्वक तयार केलेल्या शोधविज्ञान कोशाने तर त्यांना डि. लिट ही सर्वोच्च पदवी प्राप्त करून दिली. त्याच कोशाची प्रस्तावना लिहिताना प्रस्तुत ग्रंथाची– ज्ञान संकल्पनेच्या ऐतिहासिक शोधाची-आखणी संतांच्या मनात होत होती. या ग्रंथांत मानवी इतिहास व मानवी संस्कृती यांच्या सर्वेक्षणाबरोबरच त्यासंबंधीचे व्यापक व मूलगामी चिंतनही आहे. मानवी संस्कृतीच्या विकासाला कारणीभूत झालेल्या ज्ञानसाधक उपक्रमांची ऐतिहासिक दृष्टीने पाहणी करण्यासाठी ज्ञानसंकल्पनेच्या विकसनाचे डॉ.संतांनी चार टप्पे कल्पिले आहेत आणि त्यांना उद्‌गम, विकसन, विस्तार आणि प्रकर्ष अशी अन्वर्थक नावे दिली आहेत. ज्ञानसाधनेची प्रक्रिया समाजजीवनाशी समांतर असणारी अशी आहे, हे पटवून देण्यासाठी कृषिपूर्वकालची आदिम अवस्था ही ज्ञानसाधनेच्या उद्‌गमाची वाचक, तर कृषिकाल हा ज्ञानविकासाचा प्रेरक. आधुनिक काळ विस्तारद्योतक असून सद्यःकाल प्रकर्षावस्थेचे प्रत्यंतर आणून देणारा आहे, असे लेखकाचे तात्पर्य आहे.

### आदिम अवस्था

आदिम अवस्थेच्या प्रारंभी मनुष्य रानावनातील पशूंप्रमाणे भटके, शिकारी जीवन जगत होता. त्या काळात निसर्गक्रमाने त्याचा मेंदू विकसित होत जाऊन म्हणजेच बुद्धी व मन या शक्ती त्याचे ठिकाणी उदित होऊन पशूपासूनचे आपले वेगळेपण त्याला कसे जाणवू लागले; निसर्गक्रमाचे अवलोकन व अनुकरण करता करता अवकाश (स्थल), काल आणि रूप (Form) यांच्या संवेदना जागृत होताच ज्ञानाला कशी सुरुवात झाली याचे वर्णन पहिल्या भागात डॉ. संतांनी केले आहे. घर बांधणे, गुरे पाळणे, विस्तवाचा उपयोग करणे, आयुधे किंवा हत्यारे तयार करणे इत्यादी जीवनोपयोगी गोष्टी मनुष्य शिकला. तेव्हा मानवी बुद्धीच्या तीन प्रशक्ती म्हणजे स्थल-काल व रूप या जाणिवा त्याला उपयोगी पडल्या. हेच मूळ ज्ञान होय. त्याच्याशी हातांच्या शारीर शक्तीचा मिलाफ होताच मानवाने 'हस्त संस्कृतीत'त प्रवेश केला, हे जेव्हा डॉ. संत दाखवून देतात; तेव्हा वाणीचा, भाषणक्रियेचा स्वतःच्या विकासासाठी माणसाने यथायोग्य उपयोग करून घेतला असेही संत वर्णन करतात. विचार करणे, चिंतन करणे, स्मृति-कोशात ज्ञानसंचय करणे ह्या मानसिक











अभिक्रिया भाषेच्या बळावरच वृद्धिंगत होत गेल्या. मानवी मनाचे सामर्थ्य प्रकट करणारी कल्पनाशक्ती यातूनच प्राप्त झाली. तेव्हा धर्माची पूर्वावस्था म्हणजे 'यातुविद्या' हिला माणसाने जन्म दिला. जड वस्तू, पशु-पक्षी यांच्याशी मानवी व्यवहाराचा कल्पित संबंध जोडून माणसाने भीतीच्या निराकरणासाठी व इच्छा, वासना यांच्या पूर्तीसाठी यातुविधी कल्पिले. त्याच्या सिद्धीसाठी माणसाने प्राथमिक अवस्थेतील नृत्य, अभिनय, चित्राकृती, शब्दरचना (काव्य) यांचा उपयोग करून घेतला. धर्मविचाराच्या मुळाशीही यातु क्रियेवरील विश्वास- आंतरमनातील श्रद्धा नि उत्साह आढळून येतो. हा कालखंड ज्ञान- कला यांच्या दृष्टीने सामूहिकक्रिया स्वरूपाचा होता. स्थल-कालजाणिवेतून निर्माण झालेली व्यक्तिगत दुबळेपणाची, पराधीनतेची, जीवनाच्या नश्वरतेची भावना आंतरमनात संचयित होत जाऊन माणसाला सर्वशक्तिमान ईश्वराची- सर्वसंरक्षकशक्तीची गरज उत्पन्न झाली. पुढील काळात विकास पावलेल्या धर्मकल्पनेचा हा पाया होय, असे डॉ. संतांचे पहिल्या विभागातील प्रतिपादन आहे.

### कृषिसंस्कृतीचा काळ

दुसरा कालखंड कृषिसंस्कृतीचा. लोहयुगापासून अगदी १९ व्या शतकापर्यंतची मध्ययुगीन प्रगती ही या संस्कृतीची देणगी होय. 'साहित्य आणि संस्कृती' या आपल्या पहिल्या ग्रंथात डॉ. संतांनी या कालखंडाचा चांगला परामर्श घेतला आहे. त्याचा त्यांनी येथे उपयोग करून घेतलेला दिसून येतो. या कालखंडाच्या सुरुवातीला गटाचे समाजात आणि यातूचे धर्मात नि विविध शास्त्रात रूपांतर झाले. शेतीव्यवसायाने मानवी जीवनाला स्थिरता व समृद्धी प्राप्त झाली. कुटुंब, समाज, गाव, राज्य इत्यादी घटकांची स्वरूपे नि उद्दिष्टे निश्चित होत गेली. सर्व गोष्टी ईश्वरप्रणीत मानल्या गेल्या. त्यामुळे मानवी जीवनावर धर्माचे सार्वभौमत्व प्रस्थापित झाले. भौतिक जीवनाशी संबद्ध, समांतर व संलग्न असे वेगळेच विश्व परलोक, स्वर्ग-नरक, पाप-पुण्य शुभाशुभ इत्यादी कल्पनांच्या द्वारा धर्मकल्पनेने निर्माण केले. निरनिराळ्या समाजातील लोक दुभंगलेले- ऐहिक व पारलौकिक अशा दोन पातळ्यांवरील- जीवन जगू लागले. आत्मज्ञान किंवा साक्षात्कार, परमेश्वरप्राप्ती किंवा ब्रह्मज्ञान हे मानवी जीवनाचे अंतिम उद्दिष्ट ठरवले गेले. अबोध किंवा अ-जाणीवयुक्त अंतर्मन हेच या कालखंडातील ज्ञानक्षेत्रीय संकल्पनांचे उगमस्थान व शक्तिस्थान होते. या काळातील ज्योतिष नि वैद्यक यासारखी विशुद्ध शास्त्रेही अदृष्टशक्तीच्या दडपणातून बाहेर पडू शकली नाहीत.

अतिमानुष्यत्वाचा वा दिव्यत्वाचा ध्यास या कालखंडातील माणसाला लागलेला दिसतो. ज्ञानाचे स्वरूप केवळ चिंतनात्मक गणले जाऊन लौकिक विद्या-कला यांच्या मानाने श्रेष्ठ ठरविले गेलेले (आत्म) ज्ञान 'पवित्र' म्हणूनच सर्वश्रेष्ठ, प्राप्य व श्रेय मानले गेले. ज्ञान हे एका गटाची मिरासदारी होऊन बसले. कष्टकरी समाजातला सामान्य माणूस अशा श्रेष्ठ

ज्ञानाला वंचित होऊन पारंपरिक यातुविधीत– म्हणजेच अज्ञानात गुरफटला गेला. शरीराबरोबर त्याचे मन, बुद्धी हीही परंपरावादी बनली. या भूतकालीन वास्तवाचा परामर्श डॉ. संतांनी दुसऱ्या भागात चांगल्या प्रकारे घेतला आहे.

**ज्ञानपद्धतीतील फरक**

कृषिसंस्कृतीच्या काळात मानवी मन, जीवन व समाज स्थितिशील होता. त्या काळात माणसाचे अंतर्मन प्रभावी व कार्यशील होते. पण आधुनिक कालातील यंत्रसंस्कृतीशी संलग्न असलेल्या प्रबोधनाने प्रगट मनाच्या शक्तींना जाग आणली. 'मनुष्य आत्म-जागृत झाला' या सूत्राभोवती डॉ. संतांनी तिसऱ्या विभागातील आपले सारे विवेचन गुंफले आहे. या संबंधात डॉ. संतांच्या विवेचनाचे निष्कर्ष पुढीलप्रमाणे आहेत–

'पूर्वीची दृष्टी आत्मनिष्ठ व संश्लेषणात्मक होती. आत्ताची वस्तुनिष्ठ, व विश्लेषणात्मक आहे. अवलोकन, पृथक्करण, वर्गीकरण, कार्यकारण भाव इत्यादी नवी आयुधे पुढे आली आहेत. पूर्वीची ज्ञानपद्धती सिद्धांतानुगामी-निगमनात्मक होती; आताची अनुभवानुगामी-विगमनात्मक आहे. प्राचीनांच्या ग्रंथप्रामाण्यापेक्षा प्रत्यक्ष प्रयोगांमध्ये चुका करीत व त्यांची दुरुस्ती करीत तथ्य शोधणाऱ्या वैज्ञानिक पद्धतीला आता प्रमाण मानावे लागत आहे. प्राचीनांच्या सर्वंकष व त्रिकालाबाधित ज्ञानावरील विश्वास आता ढळला असून आदर्श, योग्य व अनुकरणीय या संकल्पनांचे क्षेत्र मर्यादित झाले आहे. प्रत्येक ज्ञानक्षेत्रात आता उपयोजनप्रधान तंत्रविद्या निर्माण होत आहेत. संगणकासारखी समस्या उपायशोधक उपकरणे पुढे आली आहेत. यंत्रसंस्कृती अशी विस्तार पावत आहे.'

**ज्ञानोपासनेचे ठळक विशेष**

आधुनिक ज्ञानोपासनेची वैशिष्ट्ये सांगताना डॉ. संत म्हणतात : यंत्र संस्कृतीने निर्माण केलेल्या आधुनिक काळात परमेश्वराचे अस्तित्व शंकास्पद ठरले, त्याची जागा निसर्गाने घेतली. पूर्वीचे एकत्रैकताप्रधान धर्माचे स्थान विज्ञानामुळे ढळले असून परमेश्वरनिरपेक्ष रीतीने इतिहास, धर्म, समाज इत्यादी मानव्यशास्त्रे अभ्यासली जाऊ लागली आहेत. भौतिक विद्या व मानव्यशास्त्रे यांनीही आपली ज्ञान संकल्पना बदलली आहे. आता ज्ञान केवळ तत्त्वशोधक न राहता सामाजिक अभिसरणासाठी त्याची निर्मिती व प्रसार होऊ लागला आहे. नव्या ज्ञानशाखा, नवी शास्त्रे परिवर्धित होत आहेत. नुसता ज्ञानस्फोटच नव्हे तर ज्ञानाचा प्रकर्ष अनुभवाला येत आहे. त्याबरोबर त्याच्या मर्यादांची जाणही आपणास होत आहे.

वैज्ञानिक पद्धतीने सिद्ध होणारे सत्य त्रिकालाबाधित म्हटले जात होते, पण आईन्स्टाइनच्या ज्ञानदृष्टीने तेही सापेक्ष ठरविले आहे. अबोध मनाच्या अस्तित्वामुळे मनोव्यापारांचे गूढ अधिकच गूढ वाटू लागले आहे. फ्राईडच्या मनोविश्लेषणपद्धतीने

साहित्य-कला या क्षेत्रांवर जबरदस्त परिणाम घडविला आहे. मानवाची आत्मशोधाची दिशाच बदलली आहे.

मार्क्सच्या प्रभावाने काळाची गरज, ऐतिहासिक अपरिहार्यता, सामाजिक न्यायाची जाणीव, समता-स्वातंत्र्य यांचे वास्तव रूप, आर्थिक नियोजन इत्यादी संकल्पना आजच्या विचारविश्वात स्थिर झाल्या आहेत. विज्ञानाने भौतिक विश्व पालटले, संपन्नता आणली. तशीच संहारक अस्त्रेही निर्माण केली म्हणून या सर्वांमागे 'मानवी कणवबुद्धीतून उदित होणारे अहिंसाव्रतासारखे नैतिक अधिष्ठान हवे.' हा विचार म. गांधी, बर्ट्रंड रसेल यांनी दृढमूल केला आहे.

राज्यसंस्थेची धर्मनिरपेक्षता व लोकशाही समाजवाद या संकल्पना पं. नेहरूंनी पुढे आणल्या. डॉ. संतांच्या दृष्टीने या कृतिवीरांच्या संस्कारांमुळे सामाजिक जाणिवेला व्यक्तिता प्राप्त झाली. त्यामुळे एकीकडे समाज ज्ञानमनस्क होत आहे, त्याप्रमाणे ज्ञानही समाजमनस्क होत आहे. संतांचे हे विधान विचारार्ह आहे.

### ज्ञानक्षेत्राची वाढती व्याप्ती

या ग्रंथाच्या चौथ्या भागात आजच्या काळातील ज्ञानक्षेत्राची व्याप्ती कशी वाढत चालली आहे, त्यासाठी तात्त्विक व प्रात्यक्षिक अशा दोन्ही अंगाने बदलत चाललेले संदर्भ लक्षात घेण्याची आवश्यकता डॉ. संतांनी उदाहरणे देऊन स्पष्ट केली आहे. 'प्रात्यक्षिक पातळीवर यंत्राशी येणारा नित्य संबंध लक्षात घेऊन अपाय वा अपघात होऊ नये म्हणून आज प्रत्येक माणसाने उपकरणमनस्क व्हायला हवे. व्यावसायिक प्रगतीसाठी शिबिरे, चर्चासत्रे यांच्या द्वारा आपले शास्त्रज्ञान व तंत्रज्ञान अद्ययावत राखणे आवश्यक आहे. शैक्षणिक क्षेत्रातही दिले जाणारे ज्ञान अधिकाधिक शोधप्रधान व संशोधनमनस्क असायला हवे. समस्याउपायशोधक प्रशिक्षण मिळावयास हवे. ज्ञान देणे-घेणे ही प्रक्रिया सदैव गतिशील असावयास हवी.' या संदर्भात 'आपली विद्यापीठे समाजाच्या गतिविधीशी अद्यापपर्यंत फारशी संबंधित नाहीत. ती समाज जीवनापासून खूप दूर दूर आहेत. आपले जीवन अद्याप स्वयंगतिक नाही. सध्या आपली अनुकरणावस्थाच चालू आहे.' या शब्दात ड़ॉ. संतांनी विद्यापीठांच्या उणिवेवर नेमके बोट ठेवले आहे.

### ज्ञान : सामूहिक-सामाजिक

ज्ञान ही आता पूर्वीच्या अध्यात्मज्ञानाप्रमाणे व्यक्तिगत साफल्याची गोष्ट राहिली नसल्याने समाजातील प्रत्येक घटकाने त्यात नवी भर घातली पाहिजे; कारण ज्ञान हे सामाजिक व सामूहिक बनले आहे. तसेच, यापुढे सत्यशोधन हे एकट्या-दुकट्या ज्ञानशाखेकडून होणार नाही. त्यासाठी संबद्ध शास्त्रांनी एकत्र यायला हवे. विशिष्टीकरणाबरोबरच आंतर अनुशासन संबद्धतेचाही विद्वानांनी स्वीकार केला पाहिजे;



अनुक्रमणिका

यावरही डॉ. संत भर देतात. आजचे संशोधन हे कार्यावलंबी व उपयोजनप्रधान झाले आहे. त्यासाठी शास्त्रज्ञान व तत्संबद्ध तंत्रविद्या यांची जोडीनेच उपासना करायला हवी, कारण आजचे ज्ञान हे आत्मजागृत आहे; तसेच ते समाजमनस्कही आहे.

मनुष्याच्या ज्ञानसाधनेची आजची अवस्था लक्षात घेऊन डॉ. संतांनी जे निष्कर्ष काढले आहेत, त्यांच्या प्रकाशात पूर्वकालीन परंपरा असलेला इतिहास-संस्कृती हा विषय, कालचा, आजचा साहित्यविचार आणि भाषाभ्यास या तीन ज्ञानक्षेत्रांची पाहणी शेवटल्या तीन प्रकरणांत सविस्तरपणे केली आहे, ती मुळातूनच वाचावयास पाहिजे, तरच या ग्रंथाचे महत्त्व ध्यानात येईल. या ग्रंथाला इंग्रजी-मराठी साधन ग्रंथांची जी सूची जोडली आहे, त्यात शंभरावर ग्रंथ आहेत, त्यावरून संतांच्या व्यासंगाची व्याप्ती व खोली कळून येण्यासारखी आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारख्या ज्ञानयोग्याला हा ग्रंथ अर्पण करून डॉ. संतांनी वर्ण्यविषयाच्या औचित्याबरोबर कालौचित्यही साधले आहे. शिवाय केशवसुतांच्या 'विद्यार्थ्याप्रत' या कवितेतील जे अवतरण दिले आहे ते त्यातील शब्दमाहात्म्यामुळे आणि 'बाबा ! जग हे बदलायचे !' या उद्गारामुळे ग्रंथातील विषयाच्या दृष्टीने अगदी समर्पक आहेत. डॉ. बारलिंगे यांच्या विवेचक प्रस्तावनेमुळे डॉ. संतांच्या विचारातील काही त्रुटी स्पष्ट झाल्या असल्या तरी ग्रंथाचे एकूण मोल वाढले आहे.

सामान्य वाचकाच्या दृष्टीने 'ज्ञान संकल्पना' हा विषयच मुळात कठीण आहे. अमूर्त विषयाचे मूर्तीकरण करण्याच्या दृष्टीने डॉ. संतांनी वैचारिक पातळीवर खूपच कष्ट घेतलेले दिसतात. त्या मानाने शैलीकडे त्यांना तेवढे लक्ष पुरविता आलेले दिसत नाही. तरी देखील मागील विभागात मांडलेले विचार प्रत्येक विभागाच्या (वा प्रकरणाच्या) आरंभी थोडक्यात संकलित केल्यामुळे पुनरावृत्तीच्या दोषापेक्षा उजळणी केल्याचे श्रेयच लेखक-वाचकाच्या पदरात पडते. इंग्रजी शब्दांसाठी प्रत्येक ठिकाणी नवा मराठी शब्द तयार करण्याचा संतांचा प्रयत्न असतो. (उदा.- अभिशोधन (Exploration), सर्वप्रतीत (Universal), अभिवर्धन (Extention), अनुप्रदान (Contribution), विमूर्तीकरण (Abstraction) इ.) त्यामुळे शैलीला येणारा बोजडपणा दुर्लक्षित केल्यास त्यांचा परिभाषानिर्मितीचा हा प्रयत्न कौतुकास्पद व स्वागतार्हच म्हणावा लागेल.

(मनुष्याची ज्ञानसाधना : डॉ. दु. का. संत, पुणे विद्यार्थी गृह, पुणे ३०; पृष्ठे— २४८; साठ रुपये)

(डॉ. ह. श्री. शेणोलीकर, ४, अनंत अपार्टमेंट, गुरुराज सोसायटी, पौड रोड, पुणे २९)

---

**कादंबऱ्या**

१. **मन:पूत**– उद्धव शेळके, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई-३४, पृष्ठे— ३४२, सव्वाशे रुपये.
२. **पराभूत**– भाऊ बाविस्कर, जनवाणी प्रेस, पुणे-२, पृष्ठे— २४०, ऐंशी रुपये.
३. **ब्रह्मावर्त**– माधव साठे, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे-, पृष्ठे— २००, चाळीस रुपये.
४. **गगनाला गवसणी**– संदीप हळदणकर, जनवाणी प्रेस, पुणे-२, पृष्ठे— १४४, पन्नास रुपये.
५. **कार्मेलीन**– मावजो दामोदर, साहित्य अकादमी, दिल्ली-१, पृष्ठे— २४६, पन्नास रुपये.



अनुक्रमणिका

# दि महाभारत रि-व्हिजिटेड : डॉ. रा. ना. दांडेकर

## पंचवीस विद्वानांनी घेतलेला महाभारताचा आढावा

ना. बा. मराठे

दूरदर्शनवरील 'महाभारत' लोकप्रिय मालिका सुरू होण्यापूर्वी दिल्ली येथील साहित्य अकादमीने साहित्य उत्सवात 'महाभारत' या विषयावर एक आंतरराष्ट्रीय चर्चासत्र (फेब्रु. १९८७) आयोजित केले होते. या चर्चासत्रात निमंत्रितांकडून मागविलेले २५ निबंध आता पुस्तकरूपात वितरित झाले आहेत. आंतरराष्ट्रीय अशा नामाभिधान असणाऱ्या या चर्चासत्रात फक्त दोन परदेशी विचारवंतांचे निबंध आढळतात.

यातील निबंधाचे प्रमुख विषय असे आहेत :

(१) महाभारताची संरचना; त्यातील आख्यानके, (२) महाभारत काव्यांतून उमगलेले एकूण जीवनदर्शन, (३) महाभारतात दिसून येणारा मानवाचा सांस्कृतिक-सामाजिक जीवनस्तर, (४) महाभारतात व्यक्त झालेली कला व संस्कृती, (५) महाभारत महाकाव्याचा तदुत्तरकालीन लेखकांवर झालेला परिणाम, (६) आधुनिक साहित्यिकांचा महाभारतीय कथेकडे पाहण्याचा दृष्टिकोन.

चर्चासत्राचे अध्यक्ष डॉ. व्ही. के. गोकाक, उद्घाटक डॉ. रा. ना. दांडेकर आणि मुख्य वक्ते डॉ. विद्याविलास मिश्र यांची भाषणे सुरुवातीला जोडली आहेत. नंतर विषयानुक्रमे निबंध. निबंध अभ्यासपूर्ण असूनही फक्त आठ विद्वानांनी शेवटी संदर्भ साहाय्यक टीपा जोडल्या आहेत. चांगल्या दर्जेदार ग्रंथाला शेवटी सूची (इंडेक्स) देण्याची सर्रास पद्धत रूढ आहे. त्यामुळे त्या विषयाशी संबद्ध उल्लेख पट्दिशी शोधून काढणे सुलभ होत असते. या ग्रंथाला अशी उल्लेख सूची असती तर ग्रंथाच्या लौकिकात भर पडली असती.

महाभारत या ग्रंथाची थोरवी काय वर्णावी ? व्यासांनीच म्हटल्याप्रमाणे 'धर्मेचार्थेच कामेच मोक्षेच भरतर्षभ । यदिहास्ति न तदन्यत्र, यत्रेहास्ति न तत् क्वचित् ॥' (म.भा. १.५३.३३) 'धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थासंबंधीची जी माहिती या ग्रंथात मिळेल ती अन्यत्र मिळणार नाही किंवा जी माहिती इथे नाही, ती अन्यत्र कुठेही मिळणार नाही.' असा आत्मविश्वास यात व्यक्त झाला आहे. महाभारताच्या थोरवीबद्दलचे ओडेनबर्गचे मत डॉ. दांडेकरांनी आपल्या भाषणात उद्धृत केले आहे. तो म्हणतो, 'महाभारतात, भारतदेशाशी संबद्ध आत्म्याचे एकत्र श्वसन गवसते आणि भारतीय जनतेमधील प्रत्येक व्यक्तीचा आत्मा गवसतो.' महाभारताचा विस्तार पाहाता तो होमरच्या ओडेसी व इलियडच्या एकत्र विस्तारापेक्षा आठ-पटीने अधिक आहे आणि युरोपमधील सर्व महाकाव्यांच्या विस्तारापेक्षा तो मोठा आहे, अशी माहितीही डॉ. दांडेकर देतात. (पृ.



अनुक्रमणिका







१३)

महाभारताला 'महाभारत' असे का नाव दिले याचा मूळ उद्देश महाभारतात दिला आहे. 'महत्त्वाद्भारवत्त्वाच महाभारतमुच्यते' (म.भा. १.१.२०९) फार अवाढव्य आणि वजनदार असल्याने त्याला महाभारत म्हणतात– या वचनात दुरुस्ती सुचवून 'भारतत्वात' महाभारत म्हणावे असा पाठ डॉ. दांडेकर यांनी सुचवला आहे. भारतीय जीवन त्यात प्रतीत होते म्हणून महाभारत !

'जय भारत आणि महाभारत' अशा स्वरूपात त्याचे संकलन क्रमशः व्यास, वैशंपायन आणि उग्रश्रवस् यांनी केले हे मत आता सर्वमान्य झाले आहे. याचा मागोवा यात सापडेल. महाभारत हे मूलतः कौरव-पांडवांच्या कथेवर आधारलेले महाकाव्य आहे. तो काही इतिहास नाही. त्यात इतिहास सापडेल तो शोधून काढावा लागेल. तसे प्रयत्न झाले आणि होत आहेत. इ. स. १७७० ते १९७९ या दोन शतकात महाभारताविषयी जगात कुणी कुणी लिहिले याचा आढावा 'आल्फ हिटेवेटेल' यांनी भा. ओ. इं. च्या ॲनल्स्मध्ये घेतला आहे. याचा उल्लेख वरील चर्चासत्राच्या निबंधात कुठे आलेला दिसला नाही.

महाभारतावर मराठी व इतर भारतीय भाषांमध्येही बरेच वाङ्मय निर्माण झाले आहे. सदरहू चर्चासत्रातील विषय नेमके असल्याने ज्याने त्याने विषयाची मांडणी स्वतंत्रपणे केली आहे. त्यातल्या त्यात काही निबंध महाभारतावर बरीच अधिक माहिती देऊन जातात. उदा. एस. सिंगारवेलु या मलाया युनिव्हर्सिटीतील विचारवंताने महाभारताचा मलायामधील वाङ्मयावर झालेला परिणाम मांडला आहे. तो मराठी वाचकांना एकदम नवा वाटेल. भोपाळचे प्रा. रमेशचंद्र शहा यांनी समकालीन भारतीय ललितकृतींवर महाभारतीय कथावस्तूचा व त्यातील चपखल वर्णनांचा जो परिणाम झाला आहे, त्याचे सोदाहरण विवेचन केले आहे. बनारस हिंदू युनिव्हर्सिटीतील प्रा. आनन्द कृष्ण राय यांचा भारतीय चित्रकलेवरील महाभारतीय कथावस्तूची छाप दाखवणारा निबंध मार्मिक आहे. गुजराती वाङ्मयाचे अभ्यासक डॉ. उमाशंकर जोशी यांनी महाभारत कथेवर आधारित गुजराती वाङ्मयातील कलाकृतींचे मर्मग्राही विवेचन केले आहे.

एकूण हा ग्रंथच वाचकांना काहीतरी नवीन देऊन जाणारा आहे, म्हणून त्याचा आवर्जून इथे उल्लेख करीत आहे.

(दि महाभारत रि-व्हिजिटेड : सं. डॉ. रा. ना. दांडेकर, साहित्य अकादमी, दिल्ली, पृष्ठे ३०६, पंचाहत्तर रुपये.)

(ना. बा. मराठे, डी १०४, अमरेन्द्र सोसायटी, गणेश मळा, पुणे ३०.)



अनुक्रमणिका







## १९९० मधील निवडक पुस्तके

**(वाचकांच्या सोयीसाठी ही निवडक यादी देत आहोत. तिच्यात वाचकांना आपल्या मर्जीनुरूप भर घालता येईल– संपादक)**

---

---

**कादंबरी**

झिपऱ्या– अरुण साधू
झोंबडं– महादेव मोरे
गूढयात्री– विद्या सप्रे-चौधरी
कृष्णमयी– विद्या सप्रे-चौधरी
हारण– रंगनाथ पठारे
वेणास्वामी– मृणालिनी जोशी
वणवा– रंगा मराठे
चारापाणी– रा.रं.बोराडे
नियती– विजया जहागिरदार
परकी– शांता योगी
शिकार– चिंतामणी लागू
भूमिपुत्र– रामचंद्र देखणे
खुनी वेताळ– रघुवीरसिंह रजपूत
व्यथित– रघुवीरसिंह रजपूत
इये मराठीचिये नगरी– अनंत तिबिले
भावीण– भा.वा.आठवले
वृत्त सुदर्शन– अनंत शंकर ओगले
यतीम– राजन खान
योगेश्वर श्रीकृष्ण– सुमती क्षेत्रमाडे
गगनाला गवसणी– संदीप हळदणकर
साळी,वादळवारं– बाबा कदम
काळी जोगीण– नारायण धारप
ब्रह्मावर्त– माधव साठे
मानिनी– अनंत तिबिले



अनुक्रमणिका

थर्ड चॅनेल– धर्मव्रत
परीसस्पर्श– गीता मंगेशकर
प्रतिघात– आशू रावजी, दिनू कानडे
भेदिले सूर्यमंडळा– रवींद्र भट
साथ– जाई निंबकर
त्रिशंकू– उषा कोल्हटकर
मनःपूत– उद्धव शेळके
पर्व– भैरप्पा (अनुवाद– उमा कुलकर्णी)
काळी-पर्ल बक– (भारती पांडे)
क्लिओपात्रा– संजय सोनवणी
एका श्वासाचं अंतर– अंबिका सरकार
बऱ्याची दिंडी– शंकरराव खरात
रीटा वेलिणकर– शांता गोखले
मला आई व्हायचंय– डॉ. भा. ल. पाटील

**कथा**

पूल– शरच्चंद्र चिरमुले
आणखी पूर्वज– वि. ग. कानिटकर
शिवार– विजय कुवळेकर
काचघर– प्र. ल. मयेकर
कोळीष्टकं– केशव मेश्राम
शरीरयात्रा– आशा कर्दळे
मेखमोगरी– रणजित देसाई
बारा बायकांचा दादला– रमेश मंत्री
फिल्ड वर्क– प्रवीण पाटकर
काचापाणी– नीता गद्रे
आकाशफुले– जी. ए. कुलकर्णी
मुलाकथी– अरविंद गोखले
पापो नावाचे प्रकरण– क. दि. सोनटक्के
समास– ज्योत्स्ना देवधर
जेथे जातो तेथे– सुभाष भेंडे
अनामिक– विजया राजाध्यक्ष
उरल्या कहाण्या– नीलम गोऱ्हे

निळेगर्द आणि लालभडक- ए.वि.जोशी
संध्याराग- शांताराम
विज्ञानिनी- सं.अ.पां.देशपांडे
पाचवा चंद्र- विश्वेश्वर सावदेकर

**आठवणी, आत्मकथन**

आहे मनोहर तरी- सुनीता देशपांडे
संस्मरणे- शांता शेळके
अनुदिनी अनुतापे- श्रीरंग विष्णू जोशी
मोहनमाळ- मोहन बोराडे
एरियल- ज्योत्स्ना देवधर
आठवणींचे चतकोर- ज्योत्स्ना देवधर
माझी वाकळ- रत्नाजी आगलावे
जातीला जात वैरी- ना.मा.शिंदे
काचेचं मन- गणेश चौधरी
आजीच्या आठवणी- स्नेहलता दातार
नांगरणी- आनंद यादव
माझी कॅन्सर यात्रा- संगीता वझे
नक्कलनामा- नाना टेलर
जी.ए.नावाचे स्वप्न-वि.ग.परचुरे
कशाला उद्याची बात- शांता हुबळीकर
सिंधुलहरी- सिंधु गाडगीळ
स्वतः विषयी- अनिल अवचट

**चरित्रे**

नेहरू- अरविंद ताटके
मंडेला- सदानंद बोरसे
सालीम अली- वीणा गवाणकर
राळेगणचा सिद्धयोगी- सुरेशचंद्र वारघडे
बापू गोखले- सदाशिव आठवले
महायोगी- निशिकांत श्रोत्री
संगीतसूर्य- आत्माराम सावंत
गुरुदत्त- भाऊ पाध्ये

मी पाहिलेले सावरकर– चंद्रकांत
शेगावचा योगीराजा– लीला गोळे
मार्शल टिटो– श्यामकांत फडणीस
लक्ष्मीबाई टिळक– संपूर्ण स्मृतिचित्रे
विद्यापती– पं.राघवेंद्र पगडी
महर्षी पटवर्धन– ग.स.दीक्षित
बुजुर्ग– रामकृष्ण बाक्रे
चौकटीबाहेरचे चेहेरे– चंद्रकांत पाटील
दिना दिसे मज दिनरजनी– प्रभाकर जठार
कळात्या काळच्या– माधव कोंडविलकर
एलफिन्स्टन– प्रमोद ओक
कॉ.डांगे– रणदिवे

**काव्य**

देवराई– वसंत सावंत
प्रार्थना दयाघना– ना.धों.महानोर
पक्ष्यांचे लक्ष थवे– ना.धों.महानोर
झोपेचा गाव– शांता शेळके
आई– फ.मुं.शिंदे
चकवा– रवींद्र दत्त
ऋतू फुलांचा– रमण माळवदे
बोलगाणी– मंगेश पाडगावकर
आरसा– आसावरी काकडे
चांगभलं– रामदास फुटाणे
दस्तऐवज– देवेंद्र खंदारे
तळघर– अरुण शेवते
जन्मजान्हवी– शांता शेळके
मंत्राक्षर– अरुणा ढेरे

**समीक्षा**

मराठी विनोद– उषा दा.कुलकर्णी
टीका स्वयंवर– भालचंद्र नेमाडे
विषयांतर– चंद्रकांत पाटील

आरती प्रभूंची कविता– माधवी वैद्य
साहित्यसौरभ– मधुकर जावडेकर
साहित्यरंग– म. वि. गोखले
काळीजवेध– धनंजय आचार्य
मराठी नाटक व मनोविकृती– सुधा तावरे
पुन्हा तुकाराम– दिलीप चित्रे
तिरकस आणि चौकस– दिलीप चित्रे
साहित्य : देय आणि श्रेय– प्रा. केशव सद्रे
अभिजात– गोविंद तळवलकर
चैत्य– गंगाधर पानतावणे
लोकसाहित्य-शोध आणि समीक्षा– रा. चिं. ढेरे
मऱ्हाटी स्त्री रचित रामकथा– डॉ. नांदापूरकर
काही नाटके काही नाटककार– शुभदा शेळके
मराठी लोकगीते स्वरूपविशेष– शरद व्यवहारे
कोरा कॅनव्हास– प्रभाकर वरवे
रंगतरंग– सुहास बापट
साहित्याने मला काय दिले ?– सं. तावरे, दातार
मराठी भाषा आणि साहित्य– सं. देशपांडे, तावरे
ललित शिफारस– सं. म. द. हातकणंगलेकर
जीएंच्या कथा : एक अन्वयार्थ– धों. वि. देशपांडे

**ज्ञानेश्वरी-गीता**

साम्ययोग– वसंत नारगोळकर
आज्ञार्थी गीता– व. दि. कुलकर्णी
सार्थ अनुभवामृत– रा. ना. सराफ
ज्ञानेश्वरी व विसावे शतक– सं. तावरे
ज्ञानेश्वर आणि संतमंडल– हे. वि. इनामदार
ज्ञानेश्वरी-एक शोध– उषा देशमुख
कल्पद्रुमाचिये तळी– रा. चिं. ढेरे
कल्लोळ अमृताचे– डॉ. वा. पु. गिंडे
ज्ञानेश्वरीचे भावविश्व– डॉ. मो. रा. गुण्ये

**ललित, विनोदी, प्रवास**

आदिकाळोख– गुरुनाथ धुरी
आयफेलच्या पंखावर– बी.एस.कुलकर्णी
सूर्यफुलाचं गाव– शैला सायनाकर
बोगी नं.४६९२– हरिहर आठवलेकर
अबीर गुलाल– मधु मंगेश कर्णिक
माझा गाव माझा मुलुख– मधु मंगेश कर्णिक
रंग इंद्रधनूचे– विद्याधर गोखले
काबूलनामा– फिरोज रानडे
मंतर कैफ– चंद्रकुमार नलगे
दोन युरोप– अरुण खोरे
शत्राडे– शं.ना.नवरे
परभणी टू मॉस्को– जी.यू.भालेराव
नर्मदा परिक्रमा– दा.वि.जोगळेकर
भरती-ओहोटी– श्री.ज.जोशी
एकच प्याला पण कोण– बाळ गाडगीळ
गंभीर आणि गमतीदार– सं.सुभाष भेंडे
क्षिल्लक– अरविंद गोखले
फुलवा– शरदिनी डहाणूकर

**इतर**

विज्ञानाची गरुडझेप– जयंत नारळीकर
विज्ञान आणि वैज्ञानिक– जयंत नारळीकर
हिंदु-मुस्लीम ऐक्य– ब.ना.जोग
पालीवरचं जग– लक्ष्मण माने
माते नर्मदे– दत्तप्रसाद दाभोळकर
संधिकाल– माधवराव घोरपडे
महाराष्ट्र-कर्नाटक सुवर्णकाल– सेतुमाधवराव पगडी
महाभारत (खंड– १-२)– लाटकर-गर्गे
महाभारत-एक इतिहास– वि.ग.कानिटकर
विज्ञानाच्या प्रकाशात– डॉ.लागू
कोरा कॅनव्हास– प्रभाकर बरवे

संवादशास्त्र– श्री.भा.जोशी
मुलखावेगळे जग– बाळ सामंत
सेनादलांचे आवाहन– श्याम चव्हाण
समाजस्पंदने– अरुण टिकेकर
न संपणाऱ्या गोष्टी– बाळ सामंत
मर्यादापुरुषोत्तम राम– श्री.मा.कुलकर्णी
अदृश्यभस्मासुर : दहशतवाद– म.न.उदगावकर
आधुनिक भारतीय तत्त्वज्ञ– सं.इनामदार/गोसावी
एक सम्राज्ञी एक सम्राट– मधुकर तोरडमल
जंगलगाथा– अनिल महाबळ
आम्ही लमाण– उषा पाणंदीकर
स्वर एक स्वाराचा– शांता निसळ
चला व्यासपीठावर– ललिता गुप्ते
रशियातील पुनर्रचना– भा.गो.बापट
आदिवासींची लोकनृत्ये– गोविंद गारे
हसरे झुंबर– वा.रा.सोनार
रंग उमलत्या मनाचे (नाटक)– वसंत कानेटकर
ईश्वर-स्वरूप आणि साक्षात्कार– के.वि.बेलसरे
असे सामने असे खेळाडू– बाळ ज.पंडित
पांचभौतिक चिकित्सा– वैद्य आत्मारामशास्त्री दातार
बिनभिंतीची शाळा– राजा मंगळवेढेकर
परिवर्तनासाठी धर्म– फ्रॉन्सिस दिब्रिटो
पं.नेहरू आणि संसदीय परंपरा– डॉ.प्रभा आपटे

---

**साभार-स्वीकार**

६. **टेक ऑफ–** शैलजा काळे, ज्ञानेश प्रकाशन, नागपूर-२२, पृष्ठे– ८०, पस्तीस रुपये.
७. **हर हर महादेव–** शैलजा काळे, ज्ञानेश प्रकाशन, नागपूर-२२, पृष्ठे– ६१, पंधरा रुपये.
८. **बऱ्याची दिंडी–** शंकरराव खरात, प्रतिमा प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे– १४४, पंचवीस रुपये.
९. **काळगर्भ–** विजय सिरसट, प्रतिमा प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे– १६२, साठ रुपये.

**कथा**

१. **काचापाणी–** नीता गद्रे, स्पर्श प्रकाशन, राजापूर, पृष्ठे– ७७, पंचवीस रुपये.
२. **हुरडा–** द. पां. मालुगडे, नृसिंह प्रकाशन, येळावी (जुळेवाडी), पृष्ठे– ११२, वीस रुपये.
३. **पाचवा चंद्र–** डॉ. विश्वेश्वर सावदेकर, शलाका प्रकाशन, मुंबई-५८, पृष्ठे– १३०, वीस रुपये.

# कार्यवृत्त

## महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे.

**(१ जुलै १९९० ते ३१ डिसेंबर १९९० अखेर)**

**साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम**

**५ जुलै १९९० :** कै. र. वा. दिघे स्मृतिदिनी प्राचार्य रा. रं. बोराडे यांचे 'आजची ग्रामीण कादंबरी' या विषयावर व्याख्यान झाले.

**२० जुलै १९९० :** कै. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त, प्रा. गो. म. कुलकर्णी यांचे 'आधुनिक मराठी साहित्य : प्रेरणा आणि फलश्रुती' या विषयात व्याख्यान झाले.

**१ व २ ऑगस्ट १९९० :** संतश्रेष्ठ सावतामहाराज यांच्या स्मृत्यर्थ डॉ. रामचंद्र देखणे यांची 'काय वानू आता संतांचे उपकार' आणि 'मराठी संताची भारुडे' या विषयांवर व्याख्याने झाली.

**२० ऑगस्ट १९९० :** सुप्रसिद्ध कथाकार कै. पु. भा. भावे यांच्या स्मृतिदिनानिमित्त पु. भा. भावे यांचा नवा लेखसंग्रह 'सर्वनाश' या विषयावर नांदेडचे प्रा. डॉ. सुधाकर देशपांडे यांचे व्याख्यान झाले. या कार्यक्रमाचे वेळी पु. भा. भावे यांच्या दोन कथांचे वाचन करण्यात आले. तसेच भावे स्मारक समितीने ठेवलेल्या पारितोषिकांचे वितरण करण्यात आले.

**१४ व १७ सप्टेंबर ९० :** बालकवींच्या स्मरणार्थ दि. १४.९.९० रोजी डॉ. अनुराधा पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली मराठीतील नामवंत व नवोदित कवी, कवयित्री यांचे कविसंमेलन आयोजित करण्यात आले होते. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्री. संतोष शेणई यांनी केले. तसेच १७ सप्टेंबर १९९० रोजी 'बालकवींची कविता' या विषयावर डॉ अक्षयकुमार काळे (नागपूर) यांचे व्याख्यान झाले.

**२७ नोव्हेंबर १९९० :** महाराष्ट्रातील थोर विद्वान आहिताग्नि शंकर रामचंद्र राजवाडे यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. वि. रा. करंदीकर यांचे 'ज्ञानेश्वरी व अमृतानुभव अनुबंध' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**२९ नोव्हेंबर १९९० :** थोर कवी माधव जूलियन यांच्या स्मृतिदिनानिमित्त मराठीतील नामवंत कवींचे कविसंमेलन सुप्रसिद्ध कवयित्री शांता शेळके यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आले होते. या कविसंमेलनात डॉ. वि. म. कुलकर्णी, सरिता पदकी, हेमंत जोगळेकर, डॉ. अनुराधा पोंतदार, अश्विनी धोंगडे, संजीवनी मराठे, डॉ. अरुणा ढेरे या कवींनी भाग घेतला होता.



अनुक्रमणिका







**का. र. मित्र शारदीय व्याख्यानमाला :**

मासिक मनोरंजनकर्ते का. र. मित्र यांच्या स्मृत्यर्थ दरवर्षीप्रमाणे यंदाही दि. २२-१०-९० ते १-११-९० या काळात 'मराठी ऐतिहासिक नाटके' या विषयावर व्याख्याने आयोजित करण्यात आली होती. या मालेत डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. म. वि. गोखले, श्री. गो. रा. जोशी, प्रा. मेघा सिधये, डॉ. सुधाकर, के. भोसले, डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वीणा देव, प्रा. निर्मला मोने, डॉ. अरविंद कुलकर्णी व प्रा. सदाशिव आठवले आदी वक्त्यांनी व्याख्याने दिली.

**संमेलनाध्यक्ष मधु मंगेश कर्णिक यांचा सत्कार**

रत्नागिरी येथे झालेल्या ६४ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री.मधु मंगेश कर्णिक यांचा महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या हस्ते २४-११-९० रोजी प्रकट सत्कार करण्यात आला. या प्रसंगी श्री. शंकर सारडा, डॉ. सुभाष शेण्डे व डॉ. वीणा देव यांची कर्णिक यांच्या गौरवपर भाषणे झाली.

**४ जुलै १९९० :** महाराष्ट्र साहित्य परिषद व शारदा-ज्ञानपीठम् यांच्या संयुक्त विद्यमाने संस्कृत– सौदामिनी– पंडिता क्षमादेवी राव यांचा जन्मशताब्दी समारंभ डॉ. राजारामशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित केला होता. या वेळी वसंत गाडगीळ यांचे 'क्षमादेवी-चरितम्' या विषयावर व्याख्यान झाले.

**८ व ९ ऑगस्ट १९९० :** महाराष्ट्र साहित्य परिषद व श्री. ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ यांच्या संयुक्त विद्यमाने ग्रंथश्रेष्ठ ज्ञानेश्वरींच्या रचनेस ७०० वर्षे पूर्ण होत असल्याच्या निमित्ताने प्रा. राम शेवाळकर यांनी 'ज्ञानेश्वरीचे मंगलाचरण' आणि 'ज्ञानेश्वरीतील प्रेम आणि श्रेय' या विषयांवर दोन व्याख्याने आयोजित करण्यात आली होती.

**पारितोषिके**

**(१) कै. ग. ल. ठोकळ पुरस्कार :** ठोकळ कुटुंबियांनी ठेवलेल्या ठेवीच्या व्याजातून दरवर्षी ग्रामीण मराठी साहित्यास ग. ल. ठोकळ यांच्या स्मरणार्थ रु. १००१ चा पुरस्कार देण्याची योजना सुरू करण्यात आली आहे. या वर्षीचा हा पुरस्कार श्री. रामचंद्र गबाजी पठारे यांच्या 'पाचर' या पुस्तकाला देण्यात आला. दि. २३ जुलै १९९० रोजी हा पुरस्कार सुप्रसिद्ध ग्रामीण कथाकार श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते श्री. पठारे यांना समारंभपूर्वक देण्यात आला. या वेळी श्री. शंकर पाटील यांचे 'आजच्या ग्रामीण लेखकांपुढील समस्या व आव्हाने' या विषयावर भाषण झाले. पारितोषिक समितीत प्रा. स्नेहल तावरे, डॉ.अनुराधा

पोतदार व राजा फडणीस (निमंत्रक) यांनी काम पाहिले. परीक्षकांतर्फे डॉ. स्नेहल तावरे यांनी भाषण केले.

(२) **श्री. शंकर पाटील कथा/कादंबरी पारितोषिक :** १९८९ मधील उत्कृष्ट कादंबरीचे रु. २०००/- चे पारितोषिक आणि मानचिन्ह यंदा श्री. वामन पात्रीकर यांच्या 'जगबुडी' या कादंबरीला दि. ९ ऑगस्ट १९९० रोजी श्री. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आले. परीक्षकांतर्फे प्रा.मेधा सिधये यांचे भाषण झाले.

पारितोषिक समितीत श्री. गो. म. कुलकर्णी, प्रा. मेधा सिधये आणि श्री. राजा फडणीस (निमंत्रक) यांनी काम पाहिले.

(३) **कै. द. वा. पोतदार पारितोषिक :** म. म. द. वा. पोतदार यांच्या स्मृतिदिनी त्यांच्या स्मृत्यर्थ ऐतिहासिक, वैचारिक व साहित्यविषयक ग्रंथाला म. म. दत्तो, वामन पोतदार हे २५० चे पारितोषिक देण्यात येते. यंदाच्या वर्षी हे पारितोषिक श्रीप्रमोद ओक यांच्या (एलफिन्स्टन) या ग्रंथास दि. ६ ऑक्टो. १९९० रोजी देण्यात आले.

पारितोषिक समितीचे सदस्य म्हणून श्री. म. श्री. दीक्षित यांनी काम पाहिले.

याच वेळी प्रा. म. आ. कुलकर्णी यांचे 'रियासतकार' गो. स. सरदेसाई यांचे कर्तृत्व' या विषयावर व्याख्यान झाले.

(४) **कै. विद्याधर पुंडलिक पारितोषिक :** कै. विद्याधर पुंडलिक यांच्या कुटुंबियांनी ठेवलेल्या ठेवीच्या व्याजातून या वर्षीपासून उत्कृष्ट व्यक्तिचित्रे ललित गद्य एकांकिकाच्या पुस्तकांना आलटूनपालटून रु.७५१/- चा पुरस्कार देण्यात येणार आहे.

यंदाच्या वर्षी हा पुरस्कार श्री.वसंत पोतदार यांच्या 'नाळ' या व्यक्तिचित्रात्मक पुस्तकास देण्यात आला. पुरस्कार वितरण समारंभ कैविद्याधर पुंडलिक यांच्या प्रथम स्मृतिदिनी म्हणजे दि. ९-१०-१९९० रोजी ज्येष्ठ लेखिका प्रा. शांता शेळके यांच्या हस्ते पार पडला. परीक्षकांतर्फे प्रा. निर्मला मोने यांनी आपले विचार व्यक्त केले.

पारितोषिक समितीत डॉ. म. वि. गोखले, प्रा. निर्मला मोने आणि डॉ. वीणा देव (निमंत्रक) यांनी काम पाहिले.

**दिवाळी अंक स्पर्धा**

१९९० मधील पुढील तीन दिवाळी अंकांना रु. १०१/- चे पुरस्कार देण्यात आले.
गुलमोहर– संपादक श्री. अनिल किणीकर, पुणे
(विविध ज्ञान विस्तार कर्ते रावसाहेब मोरमकर)
ललित– संपादक श्री. अशोक केशव कोठावळे (मुंबई)
(मासिक मनोरंजन कर्ते का. र. मित्र पारितोषिक)
माणूस– संपादक श्री. श्री. ग. माजगावकर (पुणे)
('किर्लोस्कर'चे शं. वा. किर्लोस्कर पारितोषिक)










दिवाळी अंकांतील उत्कृष्ट ललित लेखनास परिषदेतर्फे कै. अनंत काणेकर यांच्या स्मृत्यर्थ रु. २००/- चे देण्यात येणारे पारितोषिक 'ललित' दिवाळी अंकांतील डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या 'हरवलेले पुणे' या लेखास देण्यात आले.

या स्पर्धेच्या निर्णयासाठी डॉ. शशिकांत देशपांडे. डॉ. सुप्रिया अत्रे आणि डॉ. वीणा देव यांची समिती नेमली होती.

**देणगी** सुप्रसिद्ध लेखक कै. स. ह. मोडक यांच्या स्मृत्यर्थ दरवर्षी ग्रंथपुरस्कार देण्यासाठी श्री. श्री. ग. जोशी आणि श्री. ना. के. भावे (मुंबई) यांनी परिषदेस रु. २५०००/- ची देणगी दिली आहे.

परिषद देणगीदारांची आभारी आहे.

**शाखा सभा मेळावा**

परिषदेच्या शाखांचे प्रतिनिधी आणि परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सभासद यांचा संयुक्त मेळावा 'येवले' येथे दि. २५ नोव्हेंबर १९९० रोजी आयोजित करण्यात आला होता.

या मेळाव्याला परिषदेमार्फत श्री. राजेन्द्र बनहट्टी (कार्याध्यक्ष) श्री. राजा फडणीस, श्री. गं. ना. जोगळेकर, श्री. चिं. शं. जोशी (कार्यवाह), श्री. प्र. ल. गावडे, श्री. शंकर सारडा, डॉ. वीणा देव, डॉ. ललिता कुंभोजकर आणि डॉ. लीला गोविलकर (कार्यकारी मंडळाचे सभासद) उपस्थित होते. शाखांतर्फे कुसुमाकर शिंपी (धुळे), हो. पं. चौधरी (जळगाव), प्र. अ. संत (कल्याण), अशोक गोवंडे (इचलकरंजी), वैजनाथ महाजन (सांगली), विजय जाधव (पिंपरी-चिंचवड) आणि ल. रा. कांबळे (येवला) हे प्रतिनिधी उपस्थित होते.

या वेळी शाखा प्रतिनिधींशी सर्वांगीण चर्चा झाली. १९९१ साली धुळे येथे शाखेतर्फे वार्षिक उत्सव भरविण्याचे निमंत्रण कुसुमाकर शिंपी यांनी दिले. ते सभेने मान्य केले. तसेच म. सा. प. चे ७ वे विभागीय संमेलन अहमदनगर येथे फेब्रु. १९९१ मध्ये घेण्याचे निमंत्रणही स्वीकारण्यात आले.

सभेच्या शेवटी श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी म. सा. प.च्या नियोजित घटना दुरुस्तीबद्दल माहिती सांगितली.

श्री. ल. रा. कांबळे यांनी शाखेच्या वतीने सर्वांचे आभार मानले.

सभेनंतर श्री. प्र. ल. गावडे यांच्या अध्यक्षतेखाली कुसुमाकर शिंपी (धुळे) यांचे 'ज्ञानेश्वरी दर्शन' या विषयावर रसाळ व सुश्राव्य व्याख्यान झाले यांस येवलेकरांनी भरघोस प्रतिसाद दिला.

**वार्षिक सभा :** दि २६-८-९० रोजी म. सा. प. चे अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली वार्षिक सभा घेण्यात आली. याचे सभेत १९८९-९० चे कार्यवृत्त, हिशोबपत्रके आणि १९९०-९१ चा अर्कसंकल्प याला मान्यता देण्यात आली.

कार्यकारी मंडळाने केलेल्या परिषदेच्या सर्वांगीण प्रगतीबद्दल उपस्थित सभासदांनी



अनुक्रमणिका






पोतदार व राजा फडणीस (निमंत्रक) यांनी काम पाहिले. परीक्षकांतर्फे डॉ. स्नेहल तावरे यांनी भाषण केले.

(२) **श्री. शंकर पाटील कथा/कादंबरी पारितोषिक :** १९८९ मधील उत्कृष्ट कादंबरीचे रु. २०००/- चे पारितोषिक आणि मानचिन्ह यंदा श्री. वामन पात्रीकर यांच्या 'जगबुडी' या कादंबरीला दि. ९ ऑगस्ट १९९० रोजी श्री. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आले. परीक्षकांतर्फे प्रा.मेधा सिधये यांचे भाषण झाले.

पारितोषिक समितीत श्री. गो. म. कुलकर्णी, प्रा. मेधा सिधये आणि श्री. राजा फडणीस (निमंत्रक) यांनी काम पाहिले.

(३) **कै. द. वा. पोतदार पारितोषिक :** म. म. द. वा. पोतदार यांच्या स्मृतिदिनी त्यांच्या स्मृत्यर्थ ऐतिहासिक, वैचारिक व साहित्यविषयक ग्रंथाला म. म. दत्तो, वामन पोतदार हे २५० चे पारितोषिक देण्यात येते. यंदाच्या वर्षी हे पारितोषिक श्रीप्रमोद ओक यांच्या (एलफिन्स्टन) या ग्रंथास दि.६ ऑक्टो. १९९० रोजी देण्यात आले.

पारितोषिक समितीचे सदस्य म्हणून श्री. म. श्री. दीक्षित यांनी काम पाहिले.

याच वेळी प्रा. म. आ. कुलकर्णी यांचे 'रियासतकार' गो. स. सरदेसाई यांचे कर्तृत्व' या विषयावर व्याख्यान झाले.

(४) **कै. विद्याधर पुंडलिक पारितोषिक :** कै. विद्याधर पुंडलिक यांच्या कुटुंबियांनी ठेवलेल्या ठेवीच्या व्याजातून या वर्षीपासून उत्कृष्ट व्यक्तिचित्रे ललित गद्य एकांकिकाच्या पुस्तकांना आलटूनपालटून रु.७५१/- चा पुरस्कार देण्यात येणार आहे.

यंदाच्या वर्षी हा पुरस्कार श्री.वसंत पोतदार यांच्या 'नाळ' या व्यक्तिचित्रात्मक पुस्तकास देण्यात आला. पुरस्कार वितरण समारंभ कै.विद्याधर पुंडलिक यांच्या प्रथम स्मृतिदिनी म्हणजे दि. ९-१०-१९९० रोजी ज्येष्ठ लेखिका प्रा. शांता शेळके यांच्या हस्ते पार पडला. परीक्षकांतर्फे प्रा. निर्मला मोने यांनी आपले विचार व्यक्त केले.

पारितोषिक समितीत डॉ. म. वि. गोखले, प्रा. निर्मला मोने आणि डॉ. वीणा देव (निमंत्रक) यांनी काम पाहिले.

**दिवाळी अंक स्पर्धा**

१९९० मधील पुढील तीन दिवाळी अंकांना रु. १०१/- चे पुरस्कार देण्यात आले.
गुलमोहर-- संपादक श्री. अनिल किणीकर, पुणे
(विविध ज्ञान विस्तार कर्ते रावसाहेब मोरमकर)
ललित- संपादक श्री. अशोक केशव कोठावळे (मुंबई)
(मासिक मनोरंजन कर्ते का. र. मित्र पारितोषिक)
माणूस- संपादक श्री. श्री. ग. माजगावकर (पुणे)
('किर्लोस्कर'चे शं. वा. किर्लोस्कर पारितोषिक)

दिवाळी अंकांतील उत्कृष्ट ललित लेखनास परिषदेतर्फे कै. अनंत काणेकर यांच्या स्मृत्यर्थ रु. २००/- चे देण्यात येणारे पारितोषिक 'ललित' दिवाळी अंकांतील डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या 'हरवलेले पुणे' या लेखास देण्यात आले.

या स्पर्धेच्या निर्णयासाठी डॉ. शशिकांत देशपांडे. डॉ. सुप्रिया अत्रे आणि डॉ. वीणा देव यांची समिती नेमली होती.

देणगी सुप्रसिद्ध लेखक कै. स. ह. मोडक यांच्या स्मृत्यर्थ दरवर्षी ग्रंथपुरस्कार देण्यासाठी श्री. श्री. ग. जोशी आणि श्री. ना. के. भावे (मुंबई) यांनी परिषदेस रु. २५०००/- ची देणगी दिली आहे.

परिपद देणगीदारांची आभारी आहे.

**शाखा सभा मेळावा**

परिपदेच्या शाखांचे प्रतिनिधी आणि परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सभासद यांचा संयुक्त मेळावा 'येवले' येथे दि. २५ नोव्हेंबर १९९० रोजी आयोजित करण्यात आला होता.

या मेळाव्याला परिषदेमार्फत श्री. राजेन्द्र बनहट्टी (कार्याध्यक्ष) श्री. राजा फडणीस, श्री. गं. ना. जोगळेकर, श्री. चिं. शं. जोशी (कार्यवाह), श्री. प्र. ल. गावडे, श्री. शंकर सारडा, डॉ. वीणा देव, डॉ. ललिता कुंभोजकर आणि डॉ. लीला गोविलकर (कार्यकारी मंडळाचे सभासद) उपस्थित होते. शाखांतर्फे कुसुमाकर शिंपी (धुळे), हो. पं. चौधरी (जळगाव), प्र. अ. संत (कल्याण), अशोक गोवंडे (इचलकरंजी), वैजनाथ महाजन (सांगली), विजय जाधव (पिंपरी-चिंचवड) आणि ल. रा. कांबळे (येवला) हे प्रतिनिधी उपस्थित होते.

या वेळी शाखा प्रतिनिधींशी सर्वांगीण चर्चा झाली. १९९१ साली धुळे येथे शाखेतर्फे वार्पिक उत्सव भरविण्याचे निमंत्रण कुसुमाकर शिंपी यांनी दिले. ते सभेने मान्य केले. तसेच म. सा. प. चे ७ वे विभागीय संमेलन अहमदनगर येथे फेब्रु. १९९१ मध्ये घेण्याचे निमंत्रणही स्वीकारण्यात आले.

सभेच्या शेवटी श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी म. सा. प.च्या नियोजित घटना दुरुस्तीबद्दल माहिती सांगितली.

श्री. ल. रा. कांबळे यांनी शाखेच्या वतीने सर्वांचे आभार मानले.

सभेनंतर श्री. प्र. ल. गावडे यांच्या अध्यक्षतेखाली कुसुमाकर शिंपी (धुळे) यांचे 'ज्ञानेश्वरी दर्शन' या विषयावर रसाळ व सुश्राव्य व्याख्यान झाले यांस येवलेकरांनी भरघोस प्रतिसाद दिला.

**वार्षिक सभा :** दि २६-८-९० रोजी म. सा. प. चे अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली वार्षिक सभा घेण्यात आली. याचे सभेत १९८९-९० चे कार्यवृत्त, हिशोबपत्रके आणि १९९०-९१ चा अर्थसंकल्प याला मान्यता देण्यात आली.

कार्यकारी मंडळाने केलेल्या परिषदेच्या सर्वांगीण प्रगतीबद्दल उपस्थित सभासदांनी



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



समाधान व्यक्त केले.

**परिषदेच्या नव्या शाखा**

वृत्तांत कालावधीत सोनई (जि. अहमदनगर), नेवासा (जि. अहमदनगर), मालेगाव (जि. नाशिक) आणि फलटण (जि. सातारा) या चार ठिकाणी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शाखा नव्याने सुरू करण्यात आल्या. तसेच नंदुरबार (जि. धुळे) येथील शाखेने नव्या उत्साहाने कामकाज सुरू केले आहे.

**राजा फडणीस/गं. ना. जोगळेकर/चिं. श. जोशी**
कार्यवाह

---

## साभार-स्वीकार

४. **नवे क्षितिज (प्रातिनिधिक कथासंग्रह)** – गोमंतक मराठी अकादमी, पणजी, पृष्ठे– १४०, तीस रुपये.

५. **हनीमूनचे अपहरण**– मधुकर देशपांडे, प्रतिमा प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे– १२६, चाळीस रुपये.

६. **शरीरयात्रा**– आशा कर्दळे, प्रतिमा प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे– १६२, साठ रुपये.

७. **छप्पर**– वसंत केशव पाटील, प्रतिमा प्रकाशन, पुणे-३०, पृष्ठे– १७२, साठ रुपये.

---

## नवे आजीव सभासद (१ मे १९९० पासून)
## (पुणे विभाग)

म. गो. बोडस, ह. रा. नरके, सु. गो. सहस्रबुद्धे, य. ह. कुलकर्णी, सौ. वि. श्री. मेनन, एस. जी. वढावकर, र. सू. कुलकर्णी, सौ. मा. श्री. साठे, रोहिणी भाटे, शि. व. पिंगळे, श्री. द. केतकर, सौ सुनीता खासनीस, व. रा. कडपा, वि. गो. भिडे, उल्हास राजज्ञ, व्यं. वा. कानडे, रा. गं. नाईक, सौ. वि. स. खानवेलकर, सु. त्र्यं. दिघे, सौ. सु. द. बोरकर, रा. प. फुलकर, सौ. प्रतिभा अभ्यंकर, सौ. उ. र. जोशी, पां. द. जोशी, सौ. अ. स. फडके, सौ. म. अ. रोडे, सौ. वी. म. विजापूरकर, आशा मुंडले, श्री. द. दण्डवते, अ. ना. जावडेकर, सा. व. गोसावी, यो. श्री. सोमण, सु. गो. केसकर, डॉ. सु. द. बोरकर, सौ. शशिकला मा. ओक, मधु तळवलकर, मिलिंद सु. जोशी, सूर्यकांत ह. लिमये, शंकर बा. शिंपी, सीमा पां. शिवतारे, गिरीश म. जोगळेकर, रवींद्र के. देशपांडे, मिलिंद दि. कुलकर्णी, मोरेश्वर ग. कानिटकर, श्री. गो. परुळेकर, रेखा बैजल, सौ. जयश्री व. सहस्रबुद्धे, सुमन कानेटकर, श्रीनिवास शं. कुलकर्णी, वासंती इनामदार-जोशी, दत्तात्रय धो. सुतार, सुषमा वि. दातार, धनराज रा. गांधी, मीरा ना. घांडगे, सौ. स्वाती सु. कुलकर्णी, मीरा फडके, सुनेत्रा व. देवधर, रजनी प. पटवर्धन, डॉ. शर्मिला म्हसकर,

# अ. भा. मराठी साहित्य महामंडळ
## कार्यवृत्त

महामंडळाच्या या कालावधीत एकूण तीन सभा झाल्या. त्या पुढीलप्रमाणे–

(१) १५-७-९० गुलबर्गा (मराठी साहित्य मंडळ कार्यालय)

(२) ७-१०-९० पुणे (म. सा. परिषद कार्यालय)

(३) २०-१२-९० रत्नागिरी (साहित्य संमेलनाच्या ठिकाणी)

महामंडळातर्फे या कालावधीत विविध उपक्रम हाती घेण्यात आले.

**(अ) शुद्धलेखन चर्चासत्र :** महामंडळाच्या शुद्धलेखनविषयक नियमांचा पुनर्विचार करण्यासाठी नियुक्त केलेल्या समितीच्या वतीने एक दिवसाची शुद्धलेखनविषयक चर्चासत्रे आयोजित करण्यात आली. ५ ऑगस्ट १९९० विदर्भ साहित्य संघ नागपूर, २८ ऑक्टोबर १९९० मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई व १६ डिसेंबर १९९० मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद येथे ही चर्चासत्रे, जाणकारांच्या मोठ्या उपस्थितीत पार पडली. प्रत्येक ठिकाणी या समितीचे निमंत्रक डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी 'मराठी शुद्धलेखन : पुनर्विचाराच्या दिशेने' हा निबंध सादर केल्यावर उपस्थितांनी त्यावर साधकबाधक चर्चा केली. सर्व ठिकाणची चर्चा ध्वनिमुद्रित करण्यात आली असून अशा प्रकारचे पुणे येथील चर्चासत्र व शुद्धलेखन समितीची बैठक घेतली गेल्यावर या कामाला अंतिम स्वरूप प्राप्त होईल.

**(आ) साहित्यसंस्थांच्या परीक्षांचे सुसूत्रीकरण :** आजवर महामंडळाच्या विविध घटक संस्थांतर्फे मराठीच्या विविध परीक्षा घेतल्या जात असत. त्यामध्ये सारखेपणा आणण्याच्या हेतूने 'साहित्य प्राज्ञ' (१२ वी समकक्ष), साहित्यविशारद (बी. ए. समकक्ष) व साहित्य पारंगत (एम्. ए. समकक्ष) या महामंडळाच्या मराठीच्या परीक्षा निश्चित करण्यात आल्या व त्यांचा समान अभ्यासक्रम महामंडळाने स्वीकारला. प्राचार्य राम शेवाळकर, प्रा. कौतिक ठाले, श्री. रमेश मंत्री, सौ. शोभा उबगडे व डॉ. गं. ना. जोगळेकर (निमंत्रक) या परीक्षा समिती सदस्यांनी १-११-९० व १८-११-९० रोजी पुण्यात सभा घेऊन या कामाची पूर्तता केली. आता महाराष्ट्र शासनाकडून या परीक्षांना मान्यता व समकक्षता मिळण्यासाठी प्रयत्न सुरू आहेत.

**(इ) अक्षर वाङ्मय योजना :** मराठीतील उत्कृष्ट अशी निवडक शंभर पुस्तके प्रकाशित करावीत व ती वाचकांना सवलतीच्या दराने प्राप्त व्हावीत यासाठी महामंडळाने नियुक्त केलेल्या अक्षरवाङ्मय योजनेची वाटचाल सुरू असून शंभर पुस्तकांच्या निवडीचे काम या क्षेत्रातल्या तज्ज्ञांच्या उपसमितीने पूर्ण केले आहे. महाराष्ट्र शासनाच्या अनुदानाच्या साहाय्याने हे काम लवकरच पूर्ण होईल व वाचकांना मराठीतील शंभर श्रेष्ठ



अनुक्रमणिका






पुस्तके सवलतीच्या दरात मिळतील अशी अपेक्षा आहे.

**(ई) वाङ्‌मयीन उपक्रम समिती :** महामंडळातर्फे महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेर वर्षभरात कोणकोणते वाङ्‌मयीन उपक्रम हाती घेण्यात यावेत यासंबंधी सूचना करणारी एक उपसिमिती नेमण्यात येऊन तिची पुणे येथे बैठक घेण्यात आली. त्यानुसार मराठी साहित्यपरिषद आंध्रप्रदेश या संस्थेने (उस्मानिया विद्यापीठाच्या सहकार्याने) ज्ञानेश्वरीसंबंधी मराठी-तेलुगु व कन्नड भाषांचे एक चर्चासत्र १ व २ ऑक्टोबर १९९० ला घेतले. या 'त्रिवेणी संगम' चर्चासत्रात तिन्ही भाषांतल्या विद्वानांनी भाग घेतला. अशा प्रकारचा हा बहुभाषिक उपक्रम हैद्राबाद येथेच ज्ञानेश्वरी सप्तशताब्दी वर्षात घेण्यात आला. महामंडळाचे उपाध्यक्ष श्री. द. पं. जोशी यांनी या कार्यक्रमांचे परिश्रमपूर्वक आयोजन केले होते.

महामंडळाच्या सहकार्याने गुलबर्गा, गदग, गोवा व भोपाळ येथेही अशा कार्यक्रमांचे आयोजन केले जात आहे.

आजवर मध्यप्रदेशात महामंडळाचे कार्यालय जबलपूर येथे होते. या वर्षी ते भोपाळ या मध्यप्रदेशच्या राजधानीच्या ठिकाणी आणण्यात आले आहे.

**(उ) ६४ वे अ. भा. मराठी साहित्य संमेलन :** रत्नागिरी येथे दि.२१, २२ व २३ डिसेंबर १९९० रोजी महामंडळाचे ६४ वे साहित्य संमेलन उत्साहाच्या वातावरणात पार पडले. रत्नागिरी जिल्हा वाचनालय या संस्थेने यजमानपद स्वीकारले होते. सुप्रसिद्ध कथा-कादंबरीकार श्री. मधु मंगेश कर्णिक यांच्या अध्यक्षतेखाली हे संमेलन रसिकांच्या प्रचंड उपस्थितीत यशस्वीपणे साजरे झाले. स्वागताध्यक्ष श्री. अरविंद शिंदे, कार्याध्यक्ष, डॉ. वि. म. शिंदे, कार्यवाह श्री. अरुण नेरुरकर, ॲड. विलास पाटणे, श्री. केळकर व त्यांचे अनेक सहकारी कार्यकर्ते यांचा संमेलनाच्या यशात महत्त्वाचा वाटा आहे. ग्रंथदिंडी, ग्रंथप्रदर्शन, संमेलन उद्‌घाटन, पुस्तक प्रकाशन, परिसंवाद, निमंत्रितांचे कविसंमेलन, नवोदितांचे कविसंमेलन, अखंड कवितापाठाने गाजलेला 'केशवसुत कट्टा', लोकप्रिय लेखकांची विद्यार्थी-वाचकांशी बातचीत, जयवंत दळवी व श्री. ना. पेंडसे या मान्यवर साहित्यिकांच्या मुलाखती, खुले अधिवेशन या सर्व कार्यक्रमांना रत्नागिरीकरांची प्रोत्साहक उपस्थिती लाभली. प्रतिनिधींची निवास-भोजनादी व्यवस्थाही समाधानकारक होती. रत्नागिरीत ५० वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर हे संमेलन भरत असल्याने ते संस्मरणीय होण्यासाठी सर्वांनीच अतिशय कष्ट घेतले.

महामंडळाच्या या सर्व कार्यात अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी, उपाध्यक्ष श्री. द. पं. जोशी. कोषाध्यक्ष श्री. राजा फडणीस व सर्व सदस्यांचे संपूर्ण सहकार्य लाभले त्याबद्दल सर्वांचे मनःपूर्वक आभार.

**डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्यवाह**

# महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

## विशेष साधारण सभा

**सूचना दि. १-२-१९९१.**

स. न. वि. वि.

*रविवार दिनांक २० जानेवारी १९९१ रोजी परिषदेच्या कार्यकारी मंडळाने संमत केलेल्या नियोजित घटना बदलाचा विचार करण्यासाठी परिषदेची विशेष साधारण सभा, रविवार दिनांक ३१ मार्च १९९१ रोजी दुपारी ४.३० वाजता पुणे येथे परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात आयोजित केली आहे.*

*तरी या सभेस आपण अवश्य उपस्थित राहावे ही विनंती.*

*(सभासदांच्या माहितीसाठी व पूर्व विचारार्थ, मूळ घटना, नियोजित दुरुस्त घटना आणि स्पष्टीकरणार्थ टिपण सोबत छापलेले आहे.)*

कळावे.

**आपले**

| | |
|---|---|
| *ग. प्र. प्रधान*<br>*अध्यक्ष* | *राजा फडणीस*<br>*कार्यवाह* |
| *राजेन्द्र बनहट्टी*<br>*कार्याध्यक्ष* | *गं. ना. जोगळेकर*<br>*कार्यवाह* |
| *म. वि. गोखले*<br>*कोषाध्यक्ष* | *चिं. शं. जोशी*<br>*कार्यवाह* |



अनुक्रमणिका






# विद्यमान घटना
## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०.

---

**१. नाव :**

महाराष्ट्र साहित्य परिषद.

**२. उद्देश :**

मराठी भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्धीसाठी प्रयत्न करणे, उपाय योजणे व इतर रीतीने झटणे आणि त्यांच्या अभ्यासास प्रोत्साहन देणे हे परिषदेचे प्रधान उद्देश आहेत.

**३. कार्यक्षेत्र :**

परिषदेचे कार्यक्षेत्र पुढीलप्रमाणे राहील– महाराष्ट्र राज्यातील पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर, सोलापूर, अहमदनगर, नाशिक, जळगाव, धुळे, ठाणे, रायगड, रत्नागिरी आणि सिंधुदुर्ग हे तेरा जिल्हे.

**४. साधने :**

वरील उद्देश साध्य होण्याकरिता व त्यास अनुसरून खालील, तशाच इतर अवश्य व योग्य वाटतील त्या साधनांचा उपयोग करणे.

(अ) परिषदेच्या कार्यक्षेत्रात मराठी साहित्य संमेलने आवश्यकतेप्रमाणे भरविणे व भरविण्यास प्रोत्साहन देणे.

(आ) परिषदेच्या कार्यक्षेत्रात शाखांची योजना करून घेणे आणि ठिकठिकाणी पृथकपणे साहित्यकार्य करणाऱ्या साहित्यसंस्था संलग्न करणे.

(इ) अन्य भाषांच्या साहित्यसंस्थांशी व साहित्यविषयक चळवळींशी अवश्य व शक्य असेल तेथे सहकार्य करणे.

(ई) साहित्यशास्त्र, व्याकरण, कोश, इतिहास, विज्ञान, समाजशास्त्र, कला इत्यादी विषयांवर ग्रंथ लिहवून घेणे, प्रकाशित करणे व अशा तऱ्हेच्या ग्रंथनिर्मितीस द्रव्यद्वारा अथवा अन्य रीतीने साहाय्य करणे.

(उ) ज्ञानाची सर्व साधने मराठी वाचकांना सुलभ करून देण्याकरिता व्याख्याने, उत्सव, परिसंवाद, चर्चा, प्रदर्शने आदी घडवून आणणे; नियतकालिके आणि ग्रंथालये चालविणे, संशोधनाची कामे करणे व करविणे वा अन्यत्र चाललेल्या संशोधनकार्यास प्रोत्साहन देणे आणि साहाय्य करणे.



अनुक्रमणिका






(ऊ) शास्त्रीय विषयांची परिभाषा आणि पारिभाषिक कोश सिद्ध करणे.

(ए) प्राचीन आणि अर्वाचीन मराठीतील, तसेच अन्य भाषांतील, नामवंत ग्रंथकारांची चरित्रे छापून प्रसिद्ध करणे आणि त्यांच्या साहित्याची माहिती मराठी वाचकांस उपलब्ध करून देणे.

(ऐ) मराठी भाषा व साहित्य यांच्या प्रगतीच्या आड येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठी अवश्य ती उपाययोजना करणे.

(ओ) समाजाच्या सर्व स्तरात मराठी साहित्याविषयी अधिक आवड, अभिरुची, आस्था व जागृती निर्माण करणे.

(औ) परिषदेचे उद्देश आणि साधने यांच्याशी सुसंगत आणि अविरोध कार्य करणाऱ्या संस्थांना त्यांचे कार्य पुढे चालू ठेवण्याच्या दृष्टीने संलग्न करून घेणे किंवा परिषदेत त्यांचे सामिलीकरण करून घेणे.

**५. वर्षगणना :**

परिषदेचे वर्ष १ जुलै ते ३० जूनअखेर असावे.

**६. कार्यालय :**

परिषदेचे कार्यालय पुणे येथे राहील. या कार्यालयात पुढील गोष्टी संरक्षिल्या जातील– दप्तर, ग्रंथालय, जिंदगी आणि साधारण सभा नेमून देईल त्या सर्व गोष्टींचा संग्रह. शिवाय परिषदेच्या उद्देश्याशी सुसंगत असणारी कामे केली जातील.

**७. सभासदवर्ग :**

परिषदेचे सभासद पुढील प्रकारचे असतील.

(१) उपकर्ते : किमान ५,०००/- (पाच हजार) रुपये देणारे.

(२) आश्रयदाते : किमान २,०००/- (दोन हजार) रुपये देणारे.

(३) साहाय्यक : किमान १,०००/- (एक हजार) रुपये देणारे.

(४) हितचिंतक : किमान ५००/- (पाचशे) रुपये देणारे.

(५) आजीव : किमान २००/- (दोनशे) रुपये देणारे.
(परदेशस्थ यू. एस. डॉलर्स ५०)

(१ ते ५ मधील रक्कम एक वर्षाच्या आत पूर्ण भरावी.)

(६) साधारण : वार्षिक रु. २०/- (वीस) देणारे.

(७) प्रतिनिधी सभासद : नियम ३० (ऊ) प्रमाणे संलग्न संस्थांनी नेमलेले प्रतिनिधी.

(८) सन्मान्य सभासद : अलौकिक विद्वत्ता अथवा मराठी भाषेची महनीय सेवा या गुणांसाठी कोणाही साहित्यिकास किंवा जीवनाच्या विविध क्षेत्रांत महनीय कर्तृत्व दाखविलेल्या कोणाही व्यक्तीस, परिषदेचे सन्मान्य सभासद करता येईल. अशी लेखी



अनुक्रमणिका

सूचना परिषदेच्या दहा सभासदांनी केल्यास त्या सूचनेचा कार्यकारी मंडळाने विचार करून निर्णय घ्यावा. सदर निर्णय लगतच्या वार्षिक साधारण सभेपुढे माहितीसाठी ठेवावा. या व्यतिरिक्त–

(९) अन्य प्रकारे आजीव सभासदत्व देण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला राहील.

**८. सभासदत्वास मान्यता :**

सभासद होऊ इच्छिणाऱ्या २१ वर्षावरील कोणाही व्यक्तीने परिषदेचे उद्देश, घटना-नियम मान्य करून ठरलेल्या नियमांप्रमाणे वर्गणीसह अर्ज करावा. कार्यकारी मंडळाने आपल्या पहिल्या सभेत कार्याध्यक्ष, एक स्थानिक कार्यवाह आणि कार्यकारी मंडळाचे इतर दोन स्थानिक सभासद अशा चौघांची एक समिती नेमावी. या समितीने सभासदत्वाच्या सर्व अर्जांचा निर्णय करावा. अर्ज पोहोचल्यापासून पंधरा दिवसांच्या आत त्या अर्जाचा निर्णय अर्जदारास रीतसर कळविला पाहिजे. सदर समितीने अमान्य केलेले अर्ज कार्यकारी मंडळाकडे त्वरित पाठवावेत व त्यांचा निर्णय कार्यकारी मंडळाने करावा. कोणतेही कारण न देता सभासदत्व नाकारण्याचा अधिकार मंडळास २/३ बहुमताने राहील.

**९. सभासदांचे अधिकार :**

परिषदेच्या सभासदास पुढील अधिकार राहतील.

परिषदेच्या सर्व सभांस उपस्थित राहणे, तेथे होणाऱ्या चर्चेत भाग घेणे, मत देणे, कार्यकारी मंडळाने गुप्त म्हणून ठरवून ठेवलेल्या कागदपत्रांव्यतिरिक्त हिशेब, दप्तर व इतर कागदपत्र पाहावयास मागणे, साहित्य महामंडळाच्या संमेलनाचे प्रतिनिधी होणे, तसेच इतर सर्व प्रकारचे सभासदत्वाचे मूलभूत हक्क राहतील. मात्र वार्षिक साधारण सभेत, विशेष साधारण सभेत, घटनाविषयक प्रश्न आणि त्रैवार्षिक निवडणुका याबाबतीत मत देण्याचा अधिकार अशाच सभासदांना असेल की, जे तत्पूर्वीच्या वर्षअखेर (३० जून) रीतसर मतदार सभासद असतील. ज्या साधारण सभासदाकडे एक वर्षाची बाकी थकली असेल त्यास परिषदेची 'पत्रिका' मिळणार नाही. मात्र त्याने ही बाकी दिल्यास त्यास मागील वर्षाचे अंक शिल्लक असल्यास मिळतील. कोणत्याही सभासदास राजीनामा देता येईल, मात्र वर्गणी परत मागण्याचा अधिकार राहणार नाही.

**१०. वर्गणीची थकबाकी इत्यादी :**

(अ) जून अखेरपर्यंत ज्या साधारण सभासदांची वर्गणी येणार नाही, त्यांना पुढील वर्षात परिषदेच्या अधिनियम ९ मध्ये निर्देशिलेल्या कोणत्याही कामकाजात भाग घेता येणार नाही.

(आ) परिषदेचे उद्देश, हितसंबंध व कार्य यांना विघातक अशी कृती करणाऱ्या कोणत्याही सभासदाचे सभासदत्व रद्द करण्याचा अधिकार परिषदेला राहील. कार्यकारी



अनुक्रमणिका







मंडळाने अशा बाबतीत संबंधित सभासदास आक्षेपपत्र देऊन दिलेल्या मुदतीत त्यांजकडून निवेदन मागवावे. त्यानंतर कार्यकारी मंडळाने निर्णय करून तो सर्वसाधारण सभेपुढे ठेवावा. यासंबंधीचे ठराव सर्वसाधारण सभेच्या कार्यक्रम पत्रिकेवर नमूद करून उपस्थित सभासदांपैकी मतदान करणाऱ्या दोन-तृतीयांश मताने मान्य झाले पाहिजेत.

**११. पदाधिकारी :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पदाधिकारी–

(अ) अध्यक्ष १, उपाध्यक्ष ३, कार्याध्यक्ष १, कोषाध्यक्ष १, कार्यवाह ३, आणि 'पत्रिका' संपादक १ असे एकूण १०.

(आ) कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष व कार्यकारी मंडळाचे ११ सभासद यांची निवड परिषदेच्या सर्व सभासदांनी करावयाची आहे.

**१२. निवडणुका :**

(अ) परिषदेच्या सर्व निवडणुका दर तीन वर्षांनी, गुप्त मतदान पद्धतीने, लेखी स्वरूपात होतील. सभासदांकडे मतपत्रिका टपालाने पाठवाव्यात.

(आ) या निवडणुका पार पाडण्यासाठी कार्यकारी मंडळाने तीन सभासदांचे एक निर्वाचन मंडळ नियुक्त करावे. यातील कोणीही सभासद उमेदवार, कार्यकारी मंडळाचा सभासद अथवा चालू पदाधिकारी असता कामा नये. निर्वाचन मंडळाने निवडणुकीसाठी कार्यक्रम व पद्धती तयार करून ती निवडणुकीपूर्वी एक महिना परिषदेच्या कार्यालयात सर्वांस उपलब्ध होईल अशी ठेवावी. निर्वाचन मंडळावरील जागा रिकामी झाल्यास कार्याध्यक्षांनी त्या जागी निवड करावी.

(इ) ज्या वर्षात निवडणुका असतील त्या वर्षाच्या आधीच्या वर्षअखेरपर्यंत जे मतदार सभासद दप्तरी असतील ते मतदानास पात्र समजले जातील. अशा सर्व सभासदांची यादी कार्यकारी मंडळाने निवडणुकीपूर्वी दोन महिने निर्वाचन मंडळाच्या स्वाधीन करावी.

(ई) निवडणुकीच्या दिवसाच्या आधी निदान एक महिना सूचितांची नावे सूचक व अनुमोदक यांच्या व सूचित उमेदवाराच्या सहीसह निर्वाचन मंडळाकडे आली पाहिजेत. सूचक, अनुमोदक व सूचित उमेदवार मतदारांच्या अधिकृत यादीतील असले पाहिजेत. निवडणुकीच्या मतदानपत्रिका व सूचित उमेदवारांच्या याद्या मतदारांकडे निवडणुकीच्या दिवसाच्या निदान पंधरा दिवस आधी रवाना झाल्या पाहिजेत.

(उ) सूचित उमेदवारांपैकी ज्यांना अधिक मते पडतील ते निवडून आले असे समजावे. एकाहून अधिक उमेदवारास सारखी मते पडल्यास चिठ्ठ्या टाकून त्यातील एक निवडला जाईल.












१३. कार्यकारी मंडळाची रचना :

(अ) कार्यकारी मंडळाचे ११ सभासद गुप्त लेखी मतदान पद्धतीने सर्व सभासदांनी निवडावेत. हे सभासद आणि कार्याध्यक्ष व कोषाध्यक्ष मिळून १३ सभासदांचे कार्यकारी मंडळ होईल. या कार्यकारी मंडळाला आपल्या पहिल्या सभेत सभासदयादीतील दोन सभासद स्वीकृत करून घेण्याचा अधिकार राहील. तीन कार्यवाहांपैकी दोन तरी पुण्यातीलच असावेत. तसेच अध्यक्ष व तीन उपाध्यक्ष यांची निवड कार्यकारी मंडळाने कार्यकारी मंडळाबाहेरील सभासदांतून करावी.

(आ) कार्याध्यक्ष व कोषाध्यक्ष हे पुण्यातीलच असावेत. कार्यकारी मंडळावर निवडावयाच्या ११ सभासदांपैकी पुणे जिल्ह्यातील ५ व पुण्याबाहेरील ६ असावेत. हे ६ सभासद पुढीलप्रमाणे निवडावेत- सातारा-सांगली जिल्हे (१), कोल्हापूर-सोलापूर (१), अहमदनगर-नाशिक (१), जळगाव-धुळे (१), ठाणे-रायगड (१), रत्नागिरी-सिंधुदुर्ग (१).

(इ) कोणाही उमेदवारास कार्यकारी मंडळाच्या सभासदत्वासाठी किंवा पदाधिकाऱ्याच्या कोणत्या तरी एकाच जागेसाठी अर्ज भरता येईल.

१४. पत्रिका :

(अ) 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' हे परिषदेचे वाङ्मयीन त्रैमासिक मुखपत्र राहील. परिषदेच्या कार्यासंबंधी कार्यवाहांकडून आलेला मजकूर पत्रिकेत छापणे संपादकांवर बंधनकारक राहील. परिषदेच्या उद्देशांना विघातक ठरणारी मते पत्रिकेत येऊ नयेत.

(आ) पत्रिकेसाठी कार्यकारी मंडळाने आपल्या पहिल्या सभेत एक संपादक निवडावा.

(इ) पत्रिकेसाठी संपादकासह चार सभासदांची संपादक-समिती कार्यकारी मंडळाने नेमावी. या समितीतील एक सभासद स्थानिक कार्यवाह असावा. पत्रिकेचे संपादकीय धोरण संपादक-समितीने ठरवावे.

१५. परिषदेची वार्षिक साधारण सभा :

(अ) महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक साधारण सभा, पुणे येथे वर्ष संपल्यापासून तीन महिन्यांच्या आत, कार्यकारी मंडळाने भरविली पाहिजे.

(आ) या सभेत म.सा.प.चे गतवर्षाचे कार्यवृत्त, हिशेबतपासनिसांकडून तपासून घेतलेले गतवर्षाचे जमाखर्च व ताळेबंद, अर्थसंकल्प, हिशेबतपासनिसाची निवड, घटनेत करावयाच्या दुरुस्त्यांचा विचार, सभासदांकडून आलेले ठराव इत्यादीसंबंधी विचार होईल.

(इ) विशेष साधारण सभा : याशिवाय आवश्यक तेव्हा अध्यक्षांनी अथवा कार्यकारी मंडळाने परिषदेची विशेष साधारण सभा बोलवावी.

(ई) गणसंख्या : परिषदेच्या वार्षिक, विशेष साधारण आणि मागणी सभांस एकूण सभासदांच्या १/२५ किंवा ५० यांपैकी जी असेल ती संख्या ही गणसंख्या राहील. गणसंख्येच्या अभावी स्थगित झालेली सभा त्याच दिवशी व त्याच ठिकाणी पहिल्या

सभेच्या वेळेपासून पंधरा मिनिटांच्या अवधीनंतर भरेल. या सभेला गणसंख्येचे बंधन राहणार नाही.

(उ) साधारण सभेत बहुमताने जे ठराव मान्य होतील त्यास विरोधी असे ठराव वर्षभर पुढे आणता येणार नाहीत.

**१६. ठराव, सूचना इत्यादी :**

परिषदेचे वार्षिक कार्यवृत्त व हिशेब इत्यादी वार्षिक सभेच्या आधी प्रत्येक सभासदाकडे निदान पंधरा दिवस पोचतील अशा बेताने कार्यवाह यांनी पाठवावे. कोणाही सभासदास कार्यवृत्त अथवा हिशेब इत्यादी संबंधी वार्षिक सभेत ठराव मांडणे असल्यास त्याने ठरावाची लेखी सूचना सभेच्या अगोदर निदान सात दिवस कार्याध्यक्षांस पोचेल अशा बेताने पाठविली पाहिजे.

**१७. सभेची सूचना :**

परिषदेच्या वार्षिक अथवा विशेष साधारण सभेची सूचना सभासदांकडे सभेच्या दिवसापूर्वी निदान पंधरा दिवस आधी पोहोचेल अशा बेताने पाठविण्यात यावी.

**१८. मागणी सभा :**

मताधिकार असलेल्या ५० सभासदांनी योग्य कारणे दाखवून रीतसर लेखी मागणी केल्यास परिषदेची विशेष सभा अध्यक्षांनी बोलवावी. मागणीचे रीतसर पत्र त्यास पोहोचल्यापासून पन्नास दिवसांच्या आत ही सभा अध्यक्षांनी बोलावली पाहिजे.

**१९. अध्यक्ष :**

(अ) परिषदेच्या वार्षिक साधारण, विशेष साधारण आणि मागणी सभेत परिषदेचे अध्यक्ष हेच अध्यक्ष राहतील. अध्यक्ष उपस्थित नसल्यास ज्येष्ठ उपाध्यक्ष सभेचे अध्यक्ष होतील. कोणीही उपाध्यक्ष उपस्थित नसल्यास सभेने विश्वस्त व कार्यकारी मंडळाचे सभासद यांच्याखेरीज इतर कोणाही सभासदाची त्या सभेपुरती अध्यक्ष म्हणून निवड करावी.

(आ) परिषदेच्या अध्यक्षांना कार्याध्यक्षांच्या मार्फत परिषदेचे कोणतेही कागदपत्र अवलोकनासाठी मागून घेण्याचा अधिकार आहे. उपाध्यक्ष, कार्याध्यक्ष अथवा कोषाध्यक्ष यांचे राजीनामे स्वीकारण्याचा अधिकार अध्यक्षांना आहे. राजीनाम्याची प्रत त्या त्या पदाधिकाऱ्याने कार्यालयाकडे पाठविली पाहिजे. अध्यक्षांना राजीनामा द्यावयाचा झाल्यास तो त्यांनी कार्याध्यक्षांकडे पाठवावा.

**२०. कार्यकारी मंडळाची कामे :**

कार्यकारी मंडळाची कामे सर्वसाधारणपणे पुढीलप्रमाणे राहतील.

(अ) परिषदेच्या नियमांप्रमाणे साधारण व इतर सभा भरविण्याची व्यवस्था करणे. महाराष्ट्र साहित्य पत्रिका चालविणे. साधारण व इतर सभांच्या ठरावांची अंमलबजावणी करणे, परिषदेमार्फत होणाऱ्या प्रकाशनांची व्यवस्था करणे, वार्षिक कार्यवृत्त, हिशेब, अर्थसंकल्प इत्यादी तयार करून सर्वसाधारणपणे सभेपुढे संमतीसाठी मांडणे, परिषदेच्या कार्याकरिता विविध मार्गांनी निधी जमविणे, नियमानुसार निधींची व्यवस्था करणे, शाखासभा स्थापन करणे, संस्था संलग्न करून घेणे, निवडणुकांची व्यवस्था करणे, साधारण सभा नेमून देईल ती सारी कार्ये वेळोवेळी पार पाडणे, परिषदेचे दप्तर सांभाळणे, सोपविलेल्या जिंदगीचे रक्षण करणे, ग्रंथालय चालविणे, महामंडळाचे ठराव अमलात आणणे, महामंडळाच्या घटनेत दुरुस्ती सुचविणे व महामंडळाने स्वतःच्या घटनेत सुचविलेल्या दुरुस्त्यांचा विचार करणे, महामंडळावर तीन प्रतिनिधी निवडून पाठविणे. निरनिराळ्या साहित्यिक व सांस्कृतिक परिषदांतून परिषदेचे प्रतिनिधित्व करणे, इत्यादी.

(आ) कार्यकारी मंडळाचा कोणी सभासद अथवा कार्याध्यक्ष अथवा कोषाध्यक्ष यांच्याविरुद्ध अविश्वास अथवा निषेध व्यक्त करावयाचा झाल्यास अशा प्रकारचे मत कार्यकारी मंडळाने २/३ बहुमताने व्यक्त करावयास पाहिजे. तथापि, अविश्वासाचा ठराव मंजूर करण्यापूर्वी ज्याच्या विरुद्ध असा ठराव असेल त्याला आपले म्हणणे मांडण्यास संधी दिली पाहिजे. अविश्वासदर्शक ठराव मंजूर झाल्यानंतर तो सभासद अथवा पदाधिकारी आपल्या स्थानापासून मुक्त झाला असे मानण्यात यावे.

**२१. कार्यकारी मंडळाची सभा :**

(अ) कार्यकारी मंडळाची सभा साधारणपणे दर तिमाहीस एकदा व्हावी. आवश्यक वाटल्यास विशेष सभा बोलाविण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला राहील.

(आ) कार्यकारी मंडळाच्या सभेची सूचना सभासदांना निदान सात दिवस आगाऊ मिळाली पाहिजे.

(इ) कार्यकारी मंडळाच्या सभांच्या सूचना व वृत्तान्त अध्यक्षांकडे माहितीसाठी पाठवावेत.

**२२. का. मं. ची मागणी सभा :**

कार्यकारी मंडळाच्या आठ सभासदांनी विशेष महत्त्वाच्या कामाकरिता लेखी मागणी केल्यास तशी सभा कार्यवाहांनी निदान चार दिवस अगोदर सूचना देऊन भरविली पाहिजे.

**२३. कार्यकारी मंडळाची गणसंख्या :**

(अ) कार्यकारी मंडळांच्या सभेत सात सभासदांची उपस्थिती ही गणसंख्या मानली जाईल.

(आ) गणसंख्येच्या अभावी तहकूब राहिलेल्या सभेला गणसंख्येची आवश्यकता



अनुक्रमणिका

नाही. तहकूब सभा पंधरा मिनिटांनी चालू करता येईल.

**२४. आवश्यक कार्यसंमती :**

कार्यकारी मंडळाची सभा घेण्यास सवड नसेल तेव्हा आवश्यक कामे सभासदांची लेखी मते मागवू करण्यात यावी. त्यानंतर होणाऱ्या कार्यकारी मंडळाच्या सभेला असे झालेले कार्य कळवले पाहिजे. मात्र सात वा अधिक सभासदांनी लेखी असंमती कळवली तर त्या कामासाठी सभा बोलावली पाहिजे.

**२५. द्रव्यनिधी व खर्च :**

वर्गण्या, देणग्या, बाकी रकमा वगैरे वसूल करण्याचे, पावत्या देण्याचे आणि दैनंदिन हिशेब ठेवण्याचे काम कार्यवाहांचे आहे. अशा वसुलीतून किरकोळ खर्चाकरिता ५०० (पाचशे) रुपयेपर्यंत रक्कम कार्यालयात ठेवून बाकीच्या वसूल रकमा कार्यवाहांनी बँकेत जमा कराव्यात व खर्चाकरिता संमती असेल त्याप्रमाणे वेळोवेळी कोषाध्यक्षांकडून रकमा मागवून घ्याव्यात. कोषाध्यक्ष आणि कार्यवाह यांनी खर्च अर्थसंकल्पाप्रमाणे होत आहे याकडे लक्ष द्यावे. विशेषप्रसंगी लागणारा अधिक खर्च कार्यकारी मंडळाच्या संमतीने करावा.

**२६. द्रव्यनिधी :**

परिषदेचे द्रव्यनिधी पुढील दोन प्रकारचे असतील–

(अ) विश्वस्तांकडील स्थिर व राखीव निधी– सर्व प्रकारचे आजीव सभासद आणि विशिष्ट कार्यासाठी मिळालेल्या देणग्या, यांचा समावेश या दोन निधीत राहील. या निधींवरील व्याजाची रक्कम उद्दिष्टांनुसार होणाऱ्या कामांसाठी कार्यकारी मंडळाला देण्यात यावी. कार्यकारी मंडळाकडून लागोपाठ दोन वर्षे या रकमेची मागणी न आल्यास विश्वस्तांनी स्थिरनिधीवरील व्याजाची रक्कम स्थिरनिधीत गुंतवावी.

(आ) साधारण निधी– सभासदांची वार्षिक वर्गणी, इतर वर्गण्या, किरकोळ देणग्या, ग्रंथविक्री, दैनंदिन कामाची इतर उत्पन्ने इत्यादींचा समावेश या निधीत राहील.

**२७. विश्वस्त मंडळ :**

(अ) परिषदेची स्थावर मिळकत, स्थिर व राखीव निधी सुरक्षित ठेवण्यासाठी कार्यकारी मंडळाने आजीव सभासदांतून तीन व्यक्तींचे विश्वस्तमंडळ नियुक्त करावे. तिघांपैकी दोन विश्वस्त पुण्यातील असावेत.

(आ) नियुक्त विश्वस्त किमान तीन वर्षे आजीव सभासद असला पाहिजे आणि त्याचे वय ७५ पेक्षा अधिक असू नये.

(इ) मृत्यू, राजीनामा अथवा इतर कारणांमुळे विश्वस्ताची जागा रिकामी झाल्यास कार्यकारी मंडळाने नव्या विश्वस्तांची नियुक्ती करावी.



अनुक्रमणिका

(ई) नियुक्त विश्वस्त हे परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सभासद अथवा इतर पदाधिकारी असणार नाहीत.

**२८. विश्वस्तांची कामे :**

(अ) विश्वस्त मंडळाने आपल्यातून एक अध्यक्ष आणि एक कार्यकारी विश्वस्त अशी निवड करावी.

(आ) बँकेतील खाते, गुंतवणुका व इतर आर्थिक व्यवहार दोघा स्थानिक विश्वस्तांच्या नावे असावा.

(इ) विश्वस्तांनी आपल्या ताब्यातील स्थिर व राखीव निधीची गुंतवणूक राष्ट्रीयीकृत बँक, शेड्यूल बँक, सहकारी बँक, शासनमान्य रोखे अथवा सुरक्षित अशा अन्य शासनमान्य संस्थेत करावी.

(ई) परिषदेचे ट्रस्टडीड, पब्लिक ट्रस्ट अ‍ॅक्ट, सोसायटीज रजिस्ट्रेशन अ‍ॅक्ट आणि परिषदेची साधारण सभा यांतील तरतुदी विश्वस्तांवर बंधनकारक राहतील.

(उ) विश्वस्त खात्याचे हिशेब परिषदेच्या वार्षिक हिशेबपत्रकांसमवेत स्वतंत्ररीत्या साधारण सभेपुढे मांडले जावेत. या कामी विश्वस्तांना परिषदेच्या कोषाध्यक्षाने साहाय्य करावे.

(ऊ) विश्वस्तांची आणि परिषदेच्या कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष व दोघा स्थानिक कार्यवाहांची वर्षातून एकदा तरी सभा व्हावी.

**२९. बँकखाते व हिशेब :**

स्थिर निधीवरील वार्षिक व्याज, साधारण सभासदांच्या व इतर वर्गण्या, तसेच इतर उत्पन्ने, किरकोळ देणग्या या रकमा परिषदेच्या नावाने राष्ट्रीयीकृत अथवा सहकारी शेड्यूल बँकेत जमा राहतील. बँकेतील जमेपैकी रकमा काढावयाच्या असल्यास त्या कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष व एक कार्यवाह या तिघांपैकी कोणाही दोघांच्या सह्यांनी काढता येतील अशी व्यवस्था करावी. मात्र दोन सह्यांपैकी एक सही कोषाध्यक्षांची असली पाहिजे.

**३०. विभागीय संमेलन :**

परिषदेच्या शाखासभेने किंवा संलग्न संस्थेने ज्या ठिकाणी निमंत्रण दिले असेल तेथे परिषदेचे विभागीय मराठी साहित्य संमेलन भरेल. संमेलनाचे निमंत्रण परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडे वर्षाच्या पहिल्या तिमाहीत पाठवावे. ते यशस्वी करण्यासाठी कार्यकारी मंडळाने सर्व प्रकारचे साहाय्य करावे. खुद्द परिषदेलाही हे संमेलन स्वतंत्रपणे भरविता येईल. या संमेलनात संमत होणारे ठराव परिषदेला शिफारसवजा राहतील.

**३१. संलग्न संस्था मान्यता :**

(अ) महाराष्ट्र साहित्य परिषदेचे उद्देश मान्य असणाऱ्या वाङ्मयविषयक संस्था,

संलग्नसंस्था म्हणून परिषदेशी जोडून घेण्याचा अधिकार कार्यकारी मंडळास राहील.

(आ) संलग्न संस्थांनी नोंदणी आकार पंचवीस रुपये द्यावा व दरवर्षी रुपये पंधरा वर्गणी द्यावी.

(इ) प्रत्येक संलग्न संस्थेला, परिषदेच्या उद्देशांस अनुसरून कार्यकारी मंडळाला सूचना करण्याचा हक्क आहे व कार्यकारी मंडळाने त्याचा विचार करून आपला निर्णय कळवावा.

(ई) संलग्न संस्थांची अंतर्गत व्यवस्था व आर्थिक परिस्थिती यांची जबाबदारी परिषदेवर कोणत्याही प्रकारे राहणार नाही.

(उ) संलग्न संस्थेने आपले छापील अथवा हस्तलिखित वार्षिक कार्यवृत्त परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडे दि.१५ जूनपर्यंत पाठवले पाहिजे.

(ऊ) प्रत्येक संलग्न संस्थेने आपल्यातर्फे आगाऊ नोंदवून घेतलेला प्रतिनिधी परिषदेच्या नियम ६ (७) वर्गाचा त्या संस्थेतर्फे मतदार सभासद गणला जाईल.

(ए) महाराष्ट्र साहित्य पत्रिकेची एक प्रत प्रत्येक संलग्न संस्थेस विनामूल्य पाठवली जावी.

(ऐ) संलग्न संस्थेचे नाव कारण दर्शवून पटावरून कमी करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला आहे.

**३२. शाखा स्थापणे :**

(अ) अधिनियम ३ (आ) मध्ये सांगितल्याप्रमाणे परिषदेला आपल्या क्षेत्रसीमेतील विभागात एक वा अधिक शाखा स्थापन करता येतील. मात्र अशा शाखेच्या स्थापनेला परिषदेचे किमान पन्नास सभासद आवश्यक असले पाहिजेत.

(आ) त्या त्या विभागातील सभासद त्या शाखेचे सभासद राहतील. शाखेतील सर्व प्रकारच्या सभासदांच्या वर्गणीपैकी चाळीस टक्के रक्कम तिचे कार्य चालविण्यास परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडून देण्यात येईल.

(इ) शाखेने नियुक्त केलेले दोन सभासद व परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे दोन सभासद यांनी शाखेची घटना, परिषदेच्या घटनेला अविरोधी अशी तयार करावी.

(ई) शाखेने आपले कार्य सर्वसाधारणपणे परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या देखरेखीखाली करावे. कार्यकारी मंडळाने काही विशिष्ट कामे तिजकडे सोपवल्यास तीही करावीत आणि स्व-विभागीय संमेलन शक्य तो दरवर्षी भरवण्याचा यत्न करावा.

(उ) शाखेने परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सर्व आदेश मान्य केले पाहिजेत.

(ऊ) रु.५०० पेक्षा अधिक अशी कोणत्याही प्रकारची आर्थिक जबाबदारी परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या ठरावाविना शाखेला अंगावर घेता येणार नाही.



अनुक्रमणिका








**३३. व्यवस्थापन :**

परिषदेचे सर्व दप्तर, पत्रव्यवहार व निरनिराळ्या सभांच्या वृत्तांताची पुस्तके, तसेच ग्रंथसंग्रह, सर्व प्रकारचे सामानसुमान, प्रकाशने इत्यादी सुरळीत व व्यवस्थित ठेवण्याची जबाबदारी कार्यवाहांची राहील. ही जबाबदारी पार पाडण्यासाठी कार्याध्यक्षांच्या संमतीने स्थानिक कार्यवाहांनी कामाची वाटणी करून घ्यावी.

**३४. घटनाबदल :**

परिषदेच्या घटनेत बदल करणे झाल्यास तशी घटनादुरुस्तीची सूचना प्रथम कार्यकारी मंडळापुढे आली पाहिजे. नंतर एक महिन्याच्या पूर्वसूचनेने ती त्यासाठी बोलाविलेल्या विशेष साधारण सभेत विचारार्थ ठेवण्यात यावी. अशी घटनादुरुस्ती संमत होण्यासाठी, सभेत उपस्थित असलेल्या व मतदान करणाऱ्या सभासदांच्या २/३ (दोन तृतीयांश) बहुमताची आवश्यकता आहे.

**३५. पोटनियम :**

परिषदेच्या उद्देशाला अविरोधी असे पोटनियम कार्यकारी मंडळाला आवश्यकतेनुसार करता येतील.

**३६. रिकामी जागा भरणे :**

(अ) अध्यक्षांची जागा काही कारणाने रिकामी झाल्यास कार्यकारी मंडळाने आपल्या लगतच्या बैठकीत उर्वरित मुदतीसाठी नव्या अध्यक्षांची निवड करावी.

(आ) उपाध्यक्ष, कार्याध्यक्ष अथवा कोषाध्यक्ष यांपैकी कोणतीही एक जागा रिकामी झाल्यास त्या जागी उरलेल्या मुदतीसाठी, कार्यकारी मंडळाच्या सल्ल्याप्रमाणे नियुक्ती करावी.

(इ) कार्यकारी मंडळाच्या सभासदांपैकी इतर कोणतीही जागा रिकामी झाल्यास त्या जागी उरलेल्या मुदतीसाठी शक्यतो त्या त्या गटातील सभासद कार्यकारी मंडळाने स्वीकृत करावा.

**३७. कार्यकारी मंडळातील सभासदत्व रद्द करणे :**

योग्य कारण न कळविता कार्यकारी मंडळाच्या तीन सभांना लागोपाठ अनुपस्थित राहणाऱ्या सभासदाचे सभासदत्व रद्द होईल.

*



अनुक्रमणिका

# घटनाबदल कशासाठी ?

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेचा पुनर्विचार करून तीत योग्य ते बदल सुचविण्यासाठी कार्यकारी मंडळाने एक घटना समिती नेमलेली होती. सर्वश्री म. श्री. दीक्षित, शंकर सारडा, गं. ना. जोगळेकर, राजेंद्र बनहट्टी आणि राजा फडणीस (निमंत्रक) हे या समितीचे सदस्य आहेत. या समितीने महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेचा संपूर्ण विचार करून सुचविलेले बदल समाविष्ट केलेला घटनेचा मसुदा सोबत छापलेला आहे. हे घटनाबदल करण्याची कारणे पुढीलप्रमाणे आहेत.

१) परिषदेची सध्याची घटना गेली ३० वर्षे अस्तित्वात आहे. गेल्या ३० वर्षांत सभासद संख्या, शाखा संख्या, आर्थिक व्यवहार, वाङ्मयीन उपक्रम या सर्वच बाबतीत परिषदेच्या कार्याची व्याप्ती विविध प्रकारे अतिशय वाढलेली आहे. हे कार्य सुरळीत पार पाडण्यासाठी कालानुरूप घटनेत बदल करण्याची आवश्यकता निर्माण झालेली आहे.

२) वार्षिक सदस्यांची वर्गणी रु.२०/- ची रु. ५०/- आणि आजीव सदस्य वर्गणी रु. २००/- ची रु.५००/- करावी असा बदल सुचविलेला आहे याचे कारण उघड आहे. ते म्हणजे गेल्या काही वर्षांत वाढलेली महागाई आणि पैशाचे झालेले अवमूल्यन.

३) परिषदेच्या पदाधिकाऱ्यांचे कार्य व अधिकार याबद्दल पूर्वीच्या घटनेत बरीच संदिग्धता होती. कार्याचा एकूणच व्याप वाढल्यामुळे सर्व कामे नीट पार पाडली जावीत यासाठी पदाधिकाऱ्यांची कामे व अधिकार याचे खुलासेवार व सुस्पष्ट दिग्दर्शन केलेले आहे.

४) कार्यकारी मंडळातील सदस्यांची संख्या १३ वरून २३ इतकी वाढविली आहे याचे कारण परिषदेची एकूण सभासदसंख्या वाढली आहे आणि परिषदेच्या शाखांना कार्यकारी मंडळावर अधिक प्रतिनिधित्व मिळावे अशी दृष्टी ठेवली आहे.

५) निवडणूक मतदारसंघातील कार्यकारी मंडळ सदस्याची निवड त्या त्या मतदार संघातील सभासदांनी करायची आहे. हा बदल लोकशाही पद्धतीतील निवडणूक प्रक्रियेला अनुसरून आहे. तसेच या बदलामुळे परिषदेच्या शाखांच्या वाढीला चालना मिळेल अशी अपेक्षा आहे.

६) परिषदेच्या शाखांसंबंधी परिषदेच्या घटनेशी सुसंगत असे शाखानियम तयार केले आहेत आणि ते घटनेचे परिशिष्ट म्हणून जोडले आहेत. आतापर्यंत शाखांच्या कार्यपद्धतीबद्दल तपशीलवार असे कुठलेही नियम अस्तित्वात नव्हते. शाखांकडून अशा नियमांची मागणी करण्यात येत होती. म्हणून शाखांच्या पदाधिकाऱ्यांची बैठक बोलावण्यात आली आणि त्या बैठकीत शाखांसंबंधीचे नियम तयार करून त्यांना सर्व शाखांची संमती घेण्यात आली. परिषदेच्या शाखांच्या कार्यात एकसूत्रता यावी या उद्देशाने हे शाखानियम तयार केले आहेत.

घटनाबदलामागील ही भूमिका लक्षात घेऊन सभासदांनी तिला मान्यता द्यावी ही विनंती आहे.












**३३. व्यवस्थापन :**

परिषदेचे सर्व दप्तर, पत्रव्यवहार व निरनिराळ्या सभांच्या वृत्तांताची पुस्तके, तसेच ग्रंथसंग्रह, सर्व प्रकारचे सामानसुमान, प्रकाशने इत्यादी सुरळीत व व्यवस्थित ठेवण्याची जबाबदारी कार्यवाहांची राहील. ही जबाबदारी पार पाडण्यासाठी कार्याध्यक्षांच्या संमतीने स्थानिक कार्यवाहांनी कामाची वाटणी करून घ्यावी.

**३४. घटनाबदल :**

परिषदेच्या घटनेत बदल करणे झाल्यास तशी घटनादुरुस्तीची सूचना प्रथम कार्यकारी मंडळापुढे आली पाहिजे. नंतर एक महिन्याच्या पूर्वसूचनेने ती त्यासाठी बोलाविलेल्या विशेष साधारण सभेत विचारार्थ ठेवण्यात यावी. अशी घटनादुरुस्ती संमत होण्यासाठी, सभेत उपस्थित असलेल्या व मतदान करणाऱ्या सभासदांच्या २/३ (दोन तृतीयांश) बहुमताची आवश्यकता आहे.

**३५. पोटनियम :**

परिषदेच्या उद्देशाला अविरोधी असे पोटनियम कार्यकारी मंडळाला आवश्यकतेनुसार करता येतील.

**३६. रिकामी जागा भरणे :**

(अ) अध्यक्षांची जागा काही कारणाने रिकामी झाल्यास कार्यकारी मंडळाने आपल्या लगतच्या बैठकीत उर्वरित मुदतीसाठी नव्या अध्यक्षांची निवड करावी.

(आ) उपाध्यक्ष, कार्याध्यक्ष अथवा कोषाध्यक्ष यांपैकी कोणतीही एक जागा रिकामी झाल्यास त्या जागी उरलेल्या मुदतीसाठी, कार्यकारी मंडळाच्या सल्ल्याप्रमाणे नियुक्ती करावी.

(इ) कार्यकारी मंडळाच्या सभासदांपैकी इतर कोणतीही जागा रिकामी झाल्यास त्या जागी उरलेल्या मुदतीसाठी शक्यतो त्या त्या गटातील सभासद कार्यकारी मंडळाने स्वीकृत करावा.

**३७. कार्यकारी मंडळातील सभासदत्व रद्द करणे :**

योग्य कारण न कळविता कार्यकारी मंडळाच्या तीन सभांना लागोपाठ अनुपस्थित राहणाऱ्या सभासदाचे सभासदत्व रद्द होईल.

*



अनुक्रमणिका

## घटनाबदल कशासाठी ?

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेचा पुनर्विचार करून तीत योग्य ते बदल सुचविण्यासाठी कार्यकारी मंडळाने एक घटना समिती नेमलेली होती. सर्वश्री म. श्री. दीक्षित, शंकर सारडा, गं. ना. जोगळेकर, राजेंद्र बनहट्टी आणि राजा फडणीस (निमंत्रक) हे या समितीचे सदस्य आहेत. या समितीने महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेचा संपूर्ण विचार करून सुचविलेले बदल समाविष्ट केलेला घटनेचा मसुदा सोबत छापलेला आहे. हे घटनाबदल करण्याची कारणे पुढीलप्रमाणे आहेत.

१) परिषदेची सध्याची घटना गेली ३० वर्षे अस्तित्वात आहे. गेल्या ३० वर्षांत सभासद संख्या, शाखा संख्या, आर्थिक व्यवहार, वाङ्मयीन उपक्रम या सर्वच बाबतीत परिषदेच्या कार्याची व्याप्ती विविध प्रकारे अतिशय वाढलेली आहे. हे कार्य सुरळीत पार पाडण्यासाठी कालानुरूप घटनेत बदल करण्याची आवश्यकता निर्माण झालेली आहे.

२) वार्षिक सदस्यांची वर्गणी रु.२०/- ची रु. ५०/- आणि आजीव सदस्य वर्गणी रु. २००/- ची रु.५००/- करावी असा बदल सुचविलेला आहे याचे कारण उघड आहे. ते म्हणजे गेल्या काही वर्षांत वाढलेली महागाई आणि पैशाचे झालेले अवमूल्यन.

३) परिषदेच्या पदाधिकाऱ्यांचे कार्य व अधिकार याबद्दल पूर्वीच्या घटनेत बरीच संदिग्धता होती. कार्याचा एकूणच व्याप वाढल्यामुळे सर्व कामे नीट पार पाडली जावीत यासाठी पदाधिकाऱ्यांची कामे व अधिकार याचे खुलासेवार व सुस्पष्ट दिग्दर्शन केलेले आहे.

४) कार्यकारी मंडळातील सदस्यांची संख्या १३ वरून २३ इतकी वाढविली आहे याचे कारण परिषदेची एकूण सभासदसंख्या वाढली आहे आणि परिषदेच्या शाखांना कार्यकारी मंडळावर अधिक प्रतिनिधित्व मिळावे अशी दृष्टी ठेवली आहे.

५) निवडणूक मतदारसंघातील कार्यकारी मंडळ सदस्याची निवड त्या त्या मतदार संघातील सभासदांनी करायची आहे. हा बदल लोकशाही पद्धतीतील निवडणूक प्रक्रियेला अनुसरून आहे. तसेच या बदलामुळे परिषदेच्या शाखांच्या वाढीला चालना मिळेल अशी अपेक्षा आहे.

६) परिषदेच्या शाखांसंबंधी परिषदेच्या घटनेशी सुसंगत असे शाखानियम तयार केले आहेत आणि ते घटनेचे परिशिष्ट म्हणून जोडले आहेत. आतापर्यंत शाखांच्या कार्यपद्धतीबद्दल तपशीलवार असे कुठलेही नियम अस्तित्वात नव्हते. शाखांकडून अशा नियमांची मागणी करण्यात येत होती. म्हणून शाखांच्या पदाधिकाऱ्यांची बैठक बोलावण्यात आली आणि त्या बैठकीत शाखांसंबंधीचे नियम तयार करून त्यांना सर्व शाखांची संमती घेण्यात आली. परिषदेच्या शाखांच्या कार्यात एकसूत्रता यावी या उद्देशाने हे शाखानियम तयार केले आहेत.

घटनाबदलामागील ही भूमिका लक्षात घेऊन सभासदांनी तिला मान्यता द्यावी ही विनंती आहे.



अनुक्रमणिका

# नियोजित घटना दुरुस्ती-खर्डा
## महाराष्ट्र साहित्य परिषद

१. नाव :

महाराष्ट्र साहित्य परिषद
(येथून पुढे महाराष्ट्र साहित्य परिषदेचा उल्लेख 'परिषद' असा केला आहे)

२. कार्यालय :

परिषदेचे कार्यालय पुणे येथे राहील.

३. कार्यक्षेत्र :

परिषदेचे कार्यक्षेत्र महाराष्ट्र राज्यातील पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर, सोलापूर, अहमदनगर, नाशिक, जळगाव, धुळे, ठाणे, रायगड, रत्नागिरी आणि सिंधुदुर्ग या तेरा जिल्ह्यांपुरते राहील.

४. उद्देश :

मराठी भाषा व साहित्य यांच्या सर्वांगीण प्रगतीसाठी व विकासासाठी प्रयत्न करणे, मराठी भाषा व साहित्य यांच्या अभ्यासास उत्तेजन देणे, मराठी वाचकांची वाङ्मयीन अभिरूची वृद्धिंगत करणे आणि मराठी साहित्यिकांच्या हितासाठी व कल्याणासाठी झटणे हे परिषदेचे उद्देश आहेत.

५. साधने :

वरील कलम ४ मधील उद्देश साध्य करण्याकरिता खालील व इतर आवश्यक व योग्य वाटतील त्या साधनांचा उपयोग करण्यात यावा.

(अ) परिषदेच्या कार्यक्षेत्रात मराठी साहित्य संमेलने भरविणे, संमेलन भरविणाऱ्या संस्थेस मार्गदर्शन करणे वा अन्य रीतीने साहाय्य करणे.

(आ) परिषदेच्या कार्यक्षेत्रात परिषदेच्या शाखा स्थापन करणे आणि स्वतंत्ररीत्या साहित्यविषयक कार्य करणाऱ्या संस्थांना परिषदेशी संलग्न करून घेणे.

(इ) मराठी भाषा, साहित्य, व्याकरण, साहित्य संशोधन, कोश, वाङ्मयेतिहास, साहित्य शास्त्र, कला इत्यादी विषयांवर ग्रंथ लिहवून घेणे, संपादित करणे, प्रकाशित करणे किंवा प्रकाशनास देणे वा अशा प्रकारच्या उपक्रमांना शक्य ते सर्व साहाय्य करणे.

(ई) साहित्यविषयक व्याख्याने, चर्चा, परिसंवाद, प्रदर्शने आदी घडवून आणणे,

वाङ्‌मयीन स्वरूपाची नियतकालिके चालविणे, मराठी भाषा व साहित्याच्या परीक्षा घेणे, ग्रंथालय चालविणे, परिषदेच्या कार्यक्षेत्रातील वाङ्‌मयीन उपक्रम करणाऱ्या इतर संस्थांना साहाय्य व सहकार्य करणे इ. कार्य करणे.

(उ) मराठी भाषा व साहित्य यांच्या प्रगतीच्या आड येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना करणे.

(ऊ) परिषदेचे उद्देश आणि साधने यांच्याशी सुसंगत आणि अविरोधी कार्य करणाऱ्या पंजीकृत (रजिस्टर्ड) संस्थांना त्यांचे कार्य पुढे चालविण्याच्या दृष्टीने संलग्न करून घेणे किंवा परिषदेत त्यांचे सामिलीकरण करून घेणे.

६. वर्षगणना :

- परिषदेचे कार्यवर्ष १ एप्रिल ते ३१ मार्च असे राहील.

७. सभासद वर्ग :

परिषदेचे सभासद पुढील प्रकारचे असतील–

(अ) उपकर्ते

रुपये दहा हजार किंवा त्यापेक्षा अधिक वर्गणी देणारे.

(आ) आश्रयदाते

रुपये पाच हजार ते दहा हजार पर्यंत वर्गणी देणारे.

(इ) साहाय्यक

रुपये तीन हजार ते पाच हजार पर्यंत वर्गणी देणारे.

(ई) हितचिंतक

रुपये दोन हजार ते तीन हजार पर्यंत देणारे.

(उ) आजीव

रुपये पाचशे ते दोन हजार पर्यंत वर्गणी देणारे.

(ऊ) वार्षिक साधारण

दरवर्षी रुपये पन्नास वर्गणी देणारे.

(ए) प्रतिनिधी सभासद

संलग्न संस्थांनी नेमलेले प्रतिनिधी.

(ऐ) सन्माननीय सभासद

मराठी भाषा, साहित्य, संस्कृती, कला इ. क्षेत्रांत विशेष कर्तृत्व दाखविलेल्या कुणाही व्यक्तीस सन्माननीय आजीव सभासद करून घेण्याचा अधिकार परिषदेच्या कार्यकारी मंडळास राहील.

(टीप : वरील अ ते उ आणि ऐ या वर्गातील सभासद हे परिषदेचे आजीव सभासद म्हणून गणले जातील.)

**८. सभासदत्वास मान्यता/सभासदत्व रद्द करणे, इत्यादी :**

(अ) परिषदेचे उद्देश, घटना व नियम मान्य असलेल्या १८ वर्षांवरील कोणाही व्यक्तीला संस्थेचे सभासद होता येईल.

(आ) परिषदेचे सभासद होऊ इच्छिणाऱ्या अशा कोणाही व्यक्तीने पूर्ण वर्गणीसह परिषदेच्या विहित छापील नमुन्यात अर्ज केला पाहिजे.

(इ) या अर्जावर सूचक आणि अनुमोदक म्हणून परिषदेच्या कोणत्याही २ (दोन) आजीव सभासदांच्या सह्या असणे आवश्यक आहे.

(ई) अशा तऱ्हेचा अर्ज परिषदेचे कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष आणि प्रमुख कार्यवाह यांच्यापैकी कोणाही दोघांनी एकमताने मंजूर केल्यानंतर आणि तसे त्या अर्जदारास लेखी स्वरूपात कळविल्यानंतरच त्या व्यक्तीस परिषदेचे सभासदत्व प्राप्त होईल.

(उ) अशा मान्यताप्राप्त सभासदांची नावे कार्यवाहांनी कार्यकारी मंडळाच्या सभेपुढे माहितीसाठी ठेवावीत.

(ऊ) कोणाही व्यक्तीचा सभासदत्वासाठी केलेला अर्ज मंजूर करण्याचा वा नाकारण्याचा हक्क पदाधिकारी समितीला राहील.

(ए) अर्ज मिळाल्यापासून १५ दिवसांत सभासदत्वाबद्दल केलेल्या अर्जाचा निर्णय अर्जदाराला कळविण्यात येईल.

(ऐ) वार्षिक साधारण सभासदासाठी वर्गणीचे वर्ष १ एप्रिल ते ३१ मार्च असे राहील. वार्षिक साधारण सभासदाने ३१ जुलैपर्यंत वर्गणी भरली नाही तर त्या सभासदाचे सभासदत्व आपोआप रद्द होईल.

(ओ) परिषदेच्या उद्देशांशी विरोधी वर्तन करणाऱ्या वा परिषदेचे हितसंबंध व प्रतिष्ठा यांना बाधा आणणाऱ्या सभासदाचे सभासदत्व तात्पुरते स्थगित ठेवण्याचा किंवा कायमचे रद्द करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला राहील. मात्र अशा प्रसंगी त्या सभासदांची बाजू लेखी स्वरूपात, त्याला १५ दिवसांची मुदत देऊन, मागवून घेऊन नंतरच कार्यकारी मंडळाने निर्णय करावा व याची माहिती वार्षिक सर्वसाधारण सभेत देण्यात यावी.

(औ) मृत्यू, राजीनामा, फौजदारी वा अनैतिक वर्तणुकीच्या गुन्ह्याबद्दल झालेली शिक्षा यामुळे सभासदत्व रद्द होईल.

**९. सभासदाचे हक्क :**

१. सभासदाला परिषदेच्या सर्व प्रकट कार्यक्रमांना हजर राहता येईल आणि सर्वसाधारण सभांना हजर राहून तेथे होणाऱ्या कामकाजात भाग घेता येईल व आवश्यक तेथे मत देता येईल.

२. कार्यकारी मंडळाने गुप्त म्हणून ठेवलेल्या कागदपत्रांव्यतिरिक्त इतर कागदपत्रे, हिशोब-दप्तर इत्यादी १५ दिवसांची लेखी सूचना देऊन पाहावयास मागता येतील.



अनुक्रमणिका

३. परिषदेच्या ग्रंथालयाचा व अतिथीगृहाचा वेळोवेळी ठरविलेल्या नियमांनुसार लाभ घेता येईल.

४. प्रतिनिधित्वाची वेगळी वर्गणी भरून अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे प्रतिनिधी होता येईल.

५. परिषदेचे त्रैमासिक 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' विनामूल्य मिळेल.

६. परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुकीत उभे राहता येईल व मत देता येईल. (स्पष्टीकरण : निवडणुकीपूर्वी **किमान एक वर्ष** आजीव सदस्य असलेल्या आणि निवडणुकीपूर्वी सलग किमान तीन वर्षे साधारण वार्षिक सभासद असलेल्या परिषदेच्या कार्यक्षेत्रातील सभासदासच हा हक्क राहील.)

**१०. पदाधिकारी :**

(अ) परिषदेचे पदाधिकारी पुढीलप्रमाणे असतील.

अध्यक्ष - १, उपाध्यक्ष - ३, कार्याध्यक्ष - १, कोषाध्यक्ष - १, कार्यवाह - १, सहकार्यवाह - ३, आणि पत्रिका संपादक - १.

(आ) पदाधिकारी समिती—

या समितीत कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष आणि कार्यवाह व ३ सहकार्यवाह आणि पत्रिका संपादक यांचा समावेश असेल.

**११. निवडणूक :**

(अ) परिषदेच्या कार्यकारी मंडळाची निवडणूक दर तीन वर्षांनी होईल. ही निवडणूक गुप्त मतदान पद्धतीने व लेखी स्वरूपात होईल. प्रचलित कार्यकारी मंडळाचा त्रैवार्षिक कार्यकाल संपण्यापूर्वी १५ दिवस आधी नव्या कार्यकारी मंडळाच्या निवडणुकीचा निकाल जाहीर होईल.

(आ) परिषदेच्या खालील पदाधिकाऱ्यांची निवड परिषदेच्या सर्व सभासदांनी करावयाची आहे.

(१) कार्याध्यक्ष, (२) कोषाध्यक्ष, (३) कार्यवाह, (४) पत्रिका संपादक.

**टीप :**

१. पुणे महानगरपालिका क्षेत्रात राहणारे परिषदेचे आजीव सभासदच वरील पैकी १ ते ३ पदांसाठी उभे राहण्यास पात्र आहेत.

२. 'पत्रिका संपादक' या पदासाठी उभा राहू इच्छिणारा सभासद परिषदेच्या कार्यक्षेत्रातील आजीव सभासद असणे आवश्यक आहे.

(इ) कार्यकारी मंडळाच्या १९ सभासदांची खाली दर्शविल्याप्रमाणे क्षेत्रवार आणि संख्या तत्त्वावर निवड करण्यात येईल.



अनुक्रमणिका

| | क्षेत्र | सभासद संख्या |
|---|---|---|
| १. | पुणे महानगरपालिका | ९ |
| २. | पुणे महानगरपालिका क्षेत्राखेरीज पुणे जिल्हा | १ |
| ३. | अहमदनगर जिल्हा | १ |
| ४. | नाशिक जिल्हा | १ |
| ५. | धुळे जिल्हा | १ |
| ६. | जळगाव जिल्हा | १ |
| ७. | ठाणे जिल्हा | १ |
| ८. | कोल्हापूर जिल्हा | १ |
| ९. | सोलापूर जिल्हा | १ |
| १०. | सातारा व सांगली जिल्हा मिळून | १ |
| ११. | रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्हे मिळून | १ |
| | एकूण | १९ |

(ई) १. कार्यकारी मंडळातील वरील १ ते ११ जागांसाठी उमेदवार म्हणून त्या त्या क्षेत्रातील मतदार यादीतील सभासदच पात्र असेल.

२. वर दर्शविलेल्या जिल्हावार/जिल्हा गटवार क्षेत्रातील कार्यकारी-मंडळाच्या सभासदांची निवड त्या त्या जिल्हा/जिल्हा गट क्षेत्रातील परिषदेच्या निवडणूक प्रक्रियेत भाग घेण्यास पात्र असलेल्या सभासदांनी करावयाची आहे.

(उ) १. परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या निवडणुका पार पाडण्यासाठी प्रचलित कार्यकारी मंडळाने तीन सभासदांचे निर्वाचन मंडळ निवडणुकीच्या निकालाच्या दिवसापूर्वी तीन महिने आधी नियुक्त करावे. यातील कोणीही सभासद कार्यकारी मंडळाचा सभासद, पदाधिकारी, विश्वस्त अथवा निवडणुकीसाठी इच्छुक उमेदवार असता कामा नये.

२. निर्वाचन मंडळाने निवडणुकीसाठी कार्यक्रम व पद्धती तयार करून ती निवडणुकीच्या निकालाच्या दिवसापूर्वी दोन महिने परिषदेच्या कार्यालयात सर्वांना उपलब्ध होईल अशी ठेवावी.

३. निर्वाचन मंडळावरील जागा रिकामी झाल्यास मंडळाच्या इतर दोन सभासदांनी तिसऱ्या जागेवर योग्य व्यक्तीची निवड करावी.

४. कार्यकारी मंडळाने निवडणुकीसाठी मतदानास पात्र असलेल्या मतदार सभासदांची यादी निवडणुकीच्या निकालाच्या दिवसापूर्वी तीन महिने आधी जाहीर करावी व तिची एक प्रत निर्वाचन मंडळाच्या स्वाधीन करावी.

(ऊ) निवडणुकीच्या निकालाच्या दिवसाच्या निदान एक ते दीड महिना अगोदर सूचित



अनुक्रमणिका

उमेदवारांची नावे सूचक व अनुमोदक यांच्या व सूचित उमेदवाराच्या सहीसह निर्वाचन मंडळाकडे लेखी स्वरूपात अर्जाच्या विहित छापील नमुन्यात दाखल होणे आवश्यक आहे. सूचक, अनुमोदक आणि सूचित उमेदवार मतदार यादीतील परिषदेचे सभासद असले पाहिजेत. निवडणुकीच्या मतपत्रिका व सूचित उमेदवारांची नावे मतदाराकडे निवडणुकीच्या निकालाच्या दिवसाच्या निदान तीन आठवडे आधी टपालाने रवाना झाल्या पाहिजेत.

(ए) निवडणुकीस पात्र असलेल्या सभासदांचे नाव एकापेक्षा अधिक पदांसाठी सुचविता येईल; परंतु प्रत्यक्ष निवडणुकीत फक्त एकाच पदासाठी निवडणुकीस उभे राहता येईल.

**१२. कार्यकारी मंडळाची रचना :**

(अ) परिषदेचे कार्यकारी मंडळ खालीलप्रमाणे २५ सभासदांचे असेल.

१. कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष, कार्यवाह, पत्रिकासंपादक – ४

२. जिल्हावार (नियम ११-इ मध्ये दर्शविल्याप्रमाणे)

निर्वाचित सभासद १९ एकूण २३

कार्यकारी मंडळाच्या वरील निर्वाचित सभासदांनी आपल्या पहिल्या सभेत सर्वप्रथम परिषदेच्या कार्यक्षेत्रातील आजीव सभासदांपैकी २ सभासद कार्यकारी मंडळावर स्वीकृत करून घेणे आवश्यक आहे. (असे दोन सभासद स्वीकृत केल्यानंतर कार्यकारी मंडळातील सभासदांची संख्या २५ होऊन कार्यकारी मंडळाची रचना पूर्ण होईल.)

(आ) (२५ सभासदांचे कार्यकारी मंडळ पूर्ण झाल्यानंतर) कार्यकारी मंडळाने आपल्या पहिल्या सभेत सर्वप्रथम परिषदेचे - एक अध्यक्ष, तीन उपाध्यक्ष, पुण्यातील दोन सहकार्यवाह आणि पुण्याबाहेरील एक सहकार्यवाह यांची निवड करणे आवश्यक आहे.

**१३. कार्यकारी मंडळाची कामे :**

(अ) परिषदेची वार्षिक सर्वसाधारण सभा वर्षातून एकदा व कार्यकारी मंडळाच्या सभा दर तीन महिन्यांनी एकदा (वर्षातून चार वेळा) भरविणे.

(आ) महाराष्ट्र साहित्य पत्रिका हे परिषदेचे नियतकालिक प्रकाशित करणे.

(इ) वार्षिक साधारण सभेत आणि कार्यकारी मंडळाच्या सर्व सभांमध्ये संमत होणाऱ्या ठरावांची कार्यवाही करणे.

(ई) कार्यकारी मंडळाने संमत केलेल्या ग्रंथांचे प्रकाशन / वितरण / विक्री करणे.

(उ) वार्षिक कार्यवृत्त, हिशेब-पत्रके, अर्थसंकल्प इ. संमत करून वार्षिक साधारण सभेपुढे संमतीसाठी मांडणे.

(ऊ) परिषदेच्या दैनंदिन व इतर कार्याकरिता विविध मार्गांनी निधी व देणग्या जमविणे, उत्पन्नाची नवीन साधने निर्माण करणे व त्यांची व्यवस्था करणे.

(ए) परिषदेच्या कार्यक्षेत्रात परिषदेच्या शाखा स्थापन करणे, त्यांना मंजुरी देणे व

साहित्यविषयक कार्य करणाऱ्या इतर संस्थांना संलग्न करून घेणे.

(ऐ) परिषदेचे दप्तर, महत्त्वाची कागदपत्रे, सामानसुमान यांची जपणूक करणे.

(ओ) त्रैवार्षिक निवडणुकांची सर्व व्यवस्था करणे.

(औ) संदर्भ ग्रंथालय चालविणे व अतिथीगृहाची व्यवस्था पाहणे.

(अं) अ. भा. मराठी साहित्य महामंडळावर पाठविण्यासाठी कार्याध्यक्ष व कार्यवाह या पदसिद्ध प्रतिनिधींखेरीज एका प्रतिनिधीची निवड कार्यकारी मंडळाच्या सभासदांतून करणे.

(अ) महामंडळाचे प्रस्ताव कार्यवाहीत आणणे व महामंडळाच्या घटनेत दुरुस्ती सुचविणे आणि घटनेत सुचविलेल्या दुरुस्त्या मान्य किंवा अमान्य करणे.

(क) निरनिराळ्या साहित्यिक व सांस्कृतिक परिषदांतून परिषदेचे प्रतिनिधित्व करणे.

(ख) विश्वस्तांची नियुक्ती करणे अथवा त्यांना विश्वस्त पदातून मुक्त करणे, विश्वस्तांचा राजीनामा स्वीकारणे.

(ग) परिषदेचा कारभार व्यवस्थित व सुलभ चालण्यासाठी विविध समित्या नेमणे.

(घ) परिषदेचे उद्देश, साधने यांना उपयुक्त, पूरक व सुसंगत ठरणारे पोटनियम तयार करणे.

**१४. पदाधिकाऱ्यांची कामे / अधिकार इ.**

**१. अध्यक्ष–**

(अ) परिषदेचे अध्यक्ष हेच परिषदेच्या वार्षिक सर्वसाधारण, विशेष सर्वसाधारण आणि मागणी सभेचे अध्यक्ष राहतील.

(आ) परिषदेच्या अध्यक्षांना ८ दिवसांची लेखी पूर्वसूचना देऊन कार्याध्यक्षांच्या संमतीने कार्यवाहांमार्फत संस्थेचे कोणतेही कागदपत्र वा दप्तर पाहण्याचा अधिकार राहील.

(इ) उपाध्यक्ष, कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष, कार्यवाह, पत्रिका संपादक यांचे राजीनामे संमत करण्याचा अधिकार अध्यक्षांना राहील. मात्र त्या त्या पदाधिकाऱ्याने आपले राजीनाम्याचे पत्र आधी कार्यवाहांकडे सुपूर्त करावे. कार्यवाहांनी त्याचे राजीनाम्याचे पत्र कार्याध्यक्षांकडे सुपूर्त करावे.

(ई) अध्यक्षांना राजीनामा द्यावयाचा झाल्यास तो त्यांनी कार्याध्यक्षांकडे द्यावा. कार्याध्यक्षांनी तो पदाधिकारी समितीपुढे ठेवावा. पदाधिकारी समितीने तो राजीनामा मंजूर केल्यास, कार्यकारी मंडळाच्या पुढील सभेत, नवीन अध्यक्षांची निवड होईपर्यंतच्या काळात परिषदेच्या एका उपाध्यक्षांना कार्याध्यक्षांनी अध्यक्षपदाचा कार्यभार सांभाळण्यास सांगावे.

**२. कार्याध्यक्ष–**

(अ) कार्यकारी मंडळाच्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारणे व सभेचे नियंत्रण करणे.

(आ) पदाधिकारी समितीचा अध्यक्ष म्हणून काम पाहणे.

(इ) परिषदेचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व विश्वस्त यांच्याशी जरूर तेव्हा संपर्क साधून

परिषदेच्या कामकाजाची माहिती त्यांना देणे आणि त्यांना किंवा इतर कोणत्याही व्यक्तीला आवश्यक वाटल्यास कार्यकारी मंडळाच्या सभेला निमंत्रित म्हणून बोलाविणे.

(ई) कोषाध्यक्ष व प्रमुख कार्यवाह यांच्या मदतीने परिषदेच्या आर्थिक व्यवहाराचे नियंत्रण करणे.

(उ) परिषदेची वास्तू, मालमत्ता, ठेवी, विविध निधी यांवर कोषाध्यक्षांच्या साहाय्याने नियंत्रण ठेवणे.

(ऊ) कार्याध्यक्ष कार्यकारी मंडळाच्या आणि परिषदेच्या प्रत्येक उपसमितीचा पदसिद्ध सभासद असेल. या नात्याने परिषदेच्या सर्वांगीण कार्यावर, परिषदेच्या उद्दिष्टांच्या संदर्भात नियंत्रण ठेवणे.

(ए) परिषदेच्या वतीने जाहीर निवदेन करणे, वार्ताहर परिषद घेणे, परिषदेच्या हितसंबंधाचे रक्षण करणे आणि शासनसंस्था, विद्यापीठे, विविध साहित्य संस्था, संमेलने, परिषदा यांमध्ये परिषदेचे प्रतिनिधित्व करणे.

(ऐ) कार्यकारी मंडळाच्या साहाय्याने परिषदेच्या विकासाच्या विविध योजना आखून त्या कार्यान्वित करणे.

(ओ) परिषदेच्या शाखांना वेळोवेळी भेटी देणे, शाखांशी संपर्क साधणे, त्यांना मार्गदर्शन करणे.

(औ) अ. भा. मराठी साहित्य महामंडळावर परिषदेचा पदसिद्ध प्रतिनिधी म्हणून परिषदेचे प्रतिनिधित्व करणे व महामंडळाच्या साहाय्याने विविध योजना कार्यान्वित करणे. महामंडळाच्या सभेतील निर्णयांचा अहवाल पदाधिकारी समिती व कार्यकारी मंडळ यांना आवश्यकतेनुसार देणे.

(अं) अध्यक्ष, विश्वस्त, प्रमुख कार्यवाह आणि कार्यकारी मंडळाचे सभासद यांचे राजीनामे स्वीकारणे, तात्पुरती पर्यायी व्यवस्था करणे आणि ती अंतिम मंजुरीसाठी कार्यकारी मंडळापुढे ठेवणे.

(अ) कार्याध्यक्षास राजीनामा द्यावयाचा असल्यास तो त्यांनी अध्यक्षांकडे द्यावा. अध्यक्षांनी तो मंजूर केल्यास, अध्यक्षांनी कार्यकारी मंडळाची पुढील सभा होऊन, नवीन कार्याध्यक्षांची निवड होईपर्यंतच्या काळात पदाधिकारी समितीच्या सल्ल्याने कार्यवाहास कार्याध्यक्षपदाचा भार सांभाळण्यास सांगावा.

**३. कोषाध्यक्ष–**

(अ) कार्याध्यक्षांच्या सहकार्याने परिषदेच्या सर्व प्रकारच्या आर्थिक व्यवहाराचे व्यवस्थापन करणे.

(आ) परिषदेच्या स्थिर व राखीव निधींची व गुंतवणुकीची व्यवस्था विश्वस्तांकडून करून घेणे व पदाधिकारी समितीस त्यांची वेळोवेळी माहिती देणे.

(इ) गुंतवणूक रजिस्टर व येणे व्याजाचे रजिस्टर ठेवणे.

(ई) वर्षातून तीन वेळा विश्वस्त व पदाधिकारी समिती यांची संयुक्त सभा भरविणे.

(उ) परिषदेने नेमलेल्या लेखा परीक्षकांकडून वेळच्या वेळी आर्थिक व्यवहार तपासून घेणे, उत्पन्न-खर्च पत्रक, ताळेबंद व अर्थसंकल्प तयार करणे व ही पत्रके पदाधिकारी समिती, कार्यकारी मंडळ व वार्षिक सभेपुढे मंजुरीसाठी ठेवणे.

(ऊ) अंदाजपत्रकातील तरतुदीप्रमाणे जमा/खर्चावर नियंत्रण ठेवणे व त्यासंबंधीचा अहवाल पदाधिकारी समितीस दर तीन महिन्यांनी देणे.

(ए) परिषदेच्या वतीने परिषदेच्या प्रत्येक धनादेशावर स्वाक्षरी करणे.

(ऐ) कोषाध्यक्षास राजीनामा द्यावयाचा असल्यास तो त्यांनी कार्यवाहांमार्फत अध्यक्षांकडे द्यावा. अध्यक्षांनी तो पदाधिकारी समितीच्या सल्ल्याने स्वीकारावा. नवीन कोषाध्यक्षांची निवड होईतोपर्यंत पदाधिकारी समितीने एका स्थानिक सहकार्यवाहांना कोषाध्यक्षपदाचा भार सांभाळण्यास सांगावे.

४. कार्यवाह–

(अ) कार्याध्यक्षांच्या मार्गदर्शनानुसार व अन्य सहकार्यवाहांच्या साहाय्याने दैनंदिन कामकाजाचे नियोजन व नियंत्रण करणे.

(आ) वर्षभरातील परिषदेचे कार्यक्रम व उपक्रम यांचे नियोजन व नियंत्रण करणे.

(इ) परिषदेचे दस्तऐवज, संचिका (फाईल्स) कागदपत्र यांचे जतन व व्यवस्थापन करणे.

(ई) अंदाजपत्रकातील तरतुदींप्रमाणे जमा-खर्चावर कोषाध्यक्षांच्या साहाय्याने नियंत्रण ठेवणे. परिषदेच्या धनादेशांवर 'कार्यवाह' या नात्याने स्वाक्षरी करणे.

(उ) शाखा, महामंडळ, राज्यशासन, केंद्रशासन, विविध संस्था यांच्याशी परिषदेच्या वतीने कार्याध्यक्षांच्या संमतीने पत्रव्यवहार करणे.

(ऊ) परिषदेच्या वास्तूची देखभाल, दुरुस्ती, वीज व पाणी, टेलिफोन, सेवकांची पगारवाढ प्रकरणे, डेडस्टॉक इत्यादी व्यवहार पूर्ण करणे.

(ए) परिषदेच्या प्रकाशन व्यवहाराचे व म. सा. पत्रिकेचे पदाधिकारी समितीच्या सल्ल्याने नियोजन व नियंत्रण करणे. म. सा. पत्रिकेचा प्रकाशक म्हणून काम करणे.

(ऐ) महामंडळावर परिषदेचे प्रतिनिधित्व करणे.

(ओ) पदाधिकारी समिती व कार्यकारी मंडळ यांचा निमंत्रक म्हणून पत्रव्यवहार करणे, सभा भरविणे इत्यादी कामे करणे.

(औ) परिषदेचे त्रैमासिक व वार्षिक कार्यवृत्त तयार करणे. म. सा. पत्रिकेत त्याला प्रसिद्धी देणे.

(अं) कार्यवाहाला राजीनामा द्यावयाचा असेल तर त्याने कार्याध्यक्षांच्या मार्फत अध्यक्षांकडे द्यावा. अध्यक्षांनी तो संमत केल्यावर, कार्यकारी मंडळातर्फे नवीन कार्यवाहाची निवड होईतोपर्यंत अध्यक्षांनी पदाधिकारी समितीच्या सल्ल्याने दोनपैकी एका स्थानिक सहकार्यवाहास या पदाचा भार सांभाळण्यास सांगावे.



अनुक्रमणिका

(अ) वर्गण्या, अनुदाने, येणे रक्कम इ. वसूल करणे, संस्थेच्या योगक्षेमार्थ लहान-मोठ्या देणग्या मिळविणे, पावत्या देणे, दैनंदिन हिशोब ठेवणे, पत्रव्यवहार, इमारत देखभाल इत्यादी कामे कार्यवाहांची आहेत.

**स्थानिक सहकार्यवाह - १**

(अ) कार्यवाहाशी विचारविनिमय करून पुण्यातील वर्षभराचे व नैमित्तिक व्याख्यानादी वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्यक्रम पार पाडणे.

(आ) शाखांचे असे कार्यक्रम पार पाडण्यासाठी त्यांच्याशी विचारविनिमय करणे व त्यांना आवश्यक ते साहाय्य करणे.

(इ) अतिथी निवासाची व्यवस्था पाहणे.

(ई) ह्या सहकार्यवाहाला राजीनामा द्यावयाचा असेल तर तो त्याने कार्याध्यक्षांकडे द्यावा. त्यांनी तो पदाधिकाऱ्यांच्या सल्ल्याने स्वीकारावा व त्याचे जागी नवीन सहकार्यवाहाची नियुक्ती करावी.

**स्थानिक सहकार्यवाह - २**

(अ) परिषदेच्या ग्रंथ पारितोषिक समितीचा निमंत्रक म्हणून काम करणे.

(आ) परिषदेच्या परीक्षा-विभागाचा निमंत्रक म्हणून काम करणे.

(इ) परिषदेच्या ग्रंथालय समितीचा निमंत्रक म्हणून काम पाहणे. ग्रंथालयाची व्यवस्था पाहणे, देखरेख व नियंत्रण ठेवणे.

(ई) ह्या कार्यवाहाला राजीनामा द्यावयाचा असेल तर तो त्याने कार्याध्यक्षांकडे द्यावा. त्यांनी तो पदाधिकाऱ्यांच्या सल्ल्याने स्वीकारावा व त्याचे जागी नवीन सहकार्यवाहाची नियुक्ती करावी.

**सहकार्यवाह - ३ (पुण्याबाहेरील)**

(अ) परिषदेच्या शाखांचा मेळावा दरवर्षी भरविणे, केंद्र कार्यालय व सर्व शाखा यांमध्ये सुसंवाद व संपर्क साधणे.

(आ) नवीन शाखा स्थापण्याच्या दृष्टीने प्रयत्न करणे.

(इ) प्रमुख कार्यवाह व सह कार्यवाह यांच्या सहकार्याने वेळोवेळी विविध कामे पार पाडणे.

(ई) दरवर्षी शाखांच्या ठिकाणी विभागीय संमेलन भरविण्याचा प्रयत्न करणे.

(उ) ह्या कार्यवाहास राजीनामा द्यावयाचा असेल तर तो त्याने कार्याध्यक्षांकडे द्यावा.

**म. सा. पत्रिका संपादक**

(अ) म. सा. पत्रिका या परिषदेच्या त्रैमासिकाचे संपादन करणे, संपादनाचे त्रैवार्षिक नियोजन करणे आणि दर तीन महिन्यांनी म. सा. पत्रिकेचा अंक प्रकाशित करण्याची व्यवस्था करणे.










(आ) म. सा. पत्रिका – संपादन समितीचा निमंत्रक म्हणून काम करणे.

(इ) संपादन समितीशी विचार-विनिमय करून संपादनाचे निर्णय घेणे व त्याची कार्यवाही करणे.

(ई) पत्रिकेसंबंधीच्या मागण्या, अपेक्षा इ. बाबी पदाधिकारी समितीपुढे मांडणे व आवश्यक ती मंजुरी घेणे.

(उ) पत्रिकेसंबंधी आवश्यक तो पत्रव्यवहार करणे.

(ऊ) परिषदेचे त्रैमासिक कार्यवृत्त, वार्षिक कार्यवृत्त, साधारण सभेची सूचना व कार्यालयाकडून येणारा तत्सम इतर मजकूर पत्रिकेतून प्रसिद्ध करणे.

(ए) म. सा. पत्रिकेसंबंधी कोणताही धोरणात्मक निर्णय घेऊन प्रसिद्ध करण्यापूर्वी पदाधिकारी समितीची संमती घेणे.

(ऐ) अंदाजपत्रकानुसार खर्च करणे, म. सा. पत्रिकेच्या प्रत्येक अंकापूर्वी एक महिना अगोदर त्या अंकाच्या खर्चाची संपूर्ण माहिती पदाधिकारी समितीस देणे व आवश्यक ती मंजुरी घेणे.

(ओ) पत्रिका संपादकास राजीनामा द्यावयाचा असेल तर तो त्याने प्रमुख कार्यवाहांमार्फत अध्यक्षांकडे द्यावा. अध्यक्षांनी तो स्वीकृत केल्यानंतर नवीन म. सा. पत्रिका-संपादकाची कार्यकारी मंडळातर्फे नियुक्ती होईतोपर्यंत पदाधिकारी समितीच्या सल्ल्याने कार्याध्यक्षांनी तात्पुरती व्यवस्था करावी.

**१५. अविश्वास ठराव :**

(अ) अध्यक्ष, उपाध्यक्ष, कार्याध्यक्ष, कार्यवाह, ३ सहकार्यवाह, पत्रिका संपादक आदी पदाधिकारी किंवा कार्यकारी मंडळाचा कोणीही सभासद यांच्याविरुद्ध अविश्वास अथवा निषेध व्यक्त करावयाचा झाल्यास अशा प्रकारचे लेखी मत कार्यकारी मंडळाने २/३ (दोन तृतीयांश) बहुमताने व्यक्त केले पाहिजे.

(आ) अशा कार्यवाहीपूर्वी संबंधित सभासदाला किंवा पदाधिकाऱ्याला आपली बाजू १५ दिवसांची लेखी पूर्वसूचना देऊन कार्यकारी मंडळाच्या सभेत मांडण्याची संधी दिली पाहिजे.

(इ) अविश्वास वा निषेधात्मक प्रस्ताव कार्यकारी मंडळात २/३ (दोन तृतीयांश) बहुमताने संमत झाल्यावर तसे संबंधित व्यक्तीस कार्यवाहाने कळवावे. त्यानंतरच तो सभासद वा पदाधिकारी आपल्या स्थानापासून मुक्त झाल्याचे समजण्यात येईल.

**१६. कार्यकारी मंडळाची सभा :**

(अ) वर्षातून कार्यकारी मंडळाच्या किमान चार सभा घेण्यात याव्यात. प्रत्येक सभा साधारणपणे दर तीन महिन्यांनी व्हावी. आवश्यक वाटल्यास विशेष सभा बोलाविण्याचा अधिकार कार्याध्यक्षांच्या सल्ल्याने कार्यवाह यांना राहील.



अनुक्रमणिका

(आ) कार्यकारी मंडळाच्या सभेची सूचना सभेपूर्वी किमान १४ दिवस सभासदांना पाठविण्यात यावी.

(इ) कार्यकारी मंडळाच्या सभेचा वृत्तान्त अध्यक्षांकडे माहितीसाठी त्यांनी मागविल्यास पाठवावा.

(ई) आवश्यक वाटल्यास कार्यकारी मंडळाच्या सभेला अध्यक्षांना निमंत्रित करण्याचा अधिकार कार्याध्यक्षांना राहील.

(उ) कार्यकारी मंडळाच्या किमान १३ सभासदांनी विशेष कामासाठी लेखी मागणी केल्यास प्रमुख कार्यवाहांनी तशी सभा ७ दिवस पूर्वसूचना देऊन भरविली पाहिजे.

(ऊ) कार्यकारी मंडळाच्या सभेला तेरा सभासदांची गणसंख्या राहील. गणसंख्येच्या अभावी स्थगित झालेली सभा त्याच ठिकाणी १५ मिनिटांनी घेता येईल.

(ए) महत्त्वाच्या कामासाठी परिपत्रकाद्वारे सभासदांची लेखी मते मागवून निर्णय घेण्याचा अधिकार कार्याध्यक्षांना राहील. मात्र असा निर्णय घेण्यासाठी किमान तेरा सभासदांची लेखी संमती असणे आवश्यक आहे. त्यानंतर होणाऱ्या कार्यकारी मंडळाच्या रीतसर सभेत या निर्णयाची माहिती देण्यात यावी व इतिवृत्तात तशी नोंद करण्यात यावी. मात्र तेरा सभासदांनी अशा निर्णयास लेखी संमती दर्शविली नाही तर या कामासाठी कार्यकारी मंडळाची विशेष सभा बोलाविणे आवश्यक आहे. अशी सभा १० दिवसांत, ४ दिवसांची पूर्वसूचना देऊन कार्याध्यक्षांच्या सल्ल्याने प्रमुख कार्यवाहांनी बोलाविली पाहिजे.

१७. महाराष्ट्र साहित्य पत्रिका :

(अ) महाराष्ट्र साहित्य पत्रिका हे त्रैमासिक परिषदेचे वाङ्मयीन मुखपत्र राहील.

(आ) हे मुखपत्र सर्व सभासदांना विनामूल्य पाठविले जाईल.

(इ) पत्रिकेसाठी संपादकांसह सहा का. का. मंडळातील सभासदांची 'संपादन समिती' कार्यकारी मंडळाने आपल्या पहिल्या सभेत नेमावी. या समितीत एक स्थानिक सहकार्यवाह असावा.

(ई) कार्यवाह हा पत्रिकेचा प्रकाशक राहील.

(उ) पत्रिकेचे संपादकीय धोरण व स्वरूप स्थूलमानाने संपादन समितीने ठरवावे. मात्र त्याची माहिती पदाधिकारी समितीस दिली पाहिजे.

(ऊ) कार्यवाहांकडून येणारा परिषदेशी संबंधित मजकूर संपादकांनी पत्रिकेत छापला पाहिजे.

(ए) परिषदेचे उद्देश आणि कार्यकारी मंडळाचे धोरण, ठराव यांना विसंगत, विघातक आणि विरोधी मजकूर पत्रिकेत छापला जाऊ नये.

(ऐ) पत्रिकेच्या संपादकांनी अर्थसंकल्पात संमत केलेल्या उत्पन्नखर्चानुसार अंकाची

(ओ) संपादकांनी प्रत्येक अंक प्रसिद्ध झाल्यावर एक महिन्याच्या आत, त्या अंकाच्या जमा-खर्चाची माहिती पदाधिकारी समितीस दिली पाहिजे व आवश्यक तेथे त्याची मंजुरी घेतली पाहिजे.

**१८. सर्वसाधारण सभा :**

(अ) परिषदेची वार्षिक सर्वसाधारण सभा पुणे येथे परिषदेचे कार्यवर्ष संपल्यापासून चार महिन्यांच्या आत कार्यकारी मंडळाने भरविली पाहिजे.

(आ) या सभेत गतवर्षीचे कार्यवृत्त, हिशोब तपासनिसाकडून तपासून घेतलेली उत्पन्न-खर्च व ताळेबंद पत्रके, अर्थसंकल्प, हिशोब तपासनिसांची निवड, ठराव, सभासदांनी योग्य मुदतीत दिलेल्या सूचना व ठराव, सांप्रतच्या नियमांत भर घालणे वा फेरफार करणे, इत्यादी कामे होतील.

(इ) आवश्यक तेव्हा विशेष कामाकरिता कार्यकारी मंडळाला विशेष साधारण सभा भरविता येईल. मात्र या सभेस कार्यक्रमपत्रिकेव्यतिरिक्त इतर कामकाज होणार नाही.

(ई) कोणत्याही साधारण सभेत जे प्रस्ताव संमत होतील, त्यांस विरोधी प्रस्ताव तीन वर्षे मांडता येणार नाहीत.

(उ) वार्षिक सर्वसाधारण वा विशेष सर्वसाधारण सभेची सूचना सर्व सभासदांना सभेपूर्वी १५ दिवस मिळेल, अशा बेताने पत्रिकेच्या अंकातून वा अन्यरीतीने सभासदाच्या नोंदलेल्या पत्त्यावर पोस्टात टाकली पाहिजे किंवा पाठविली पाहिजे.

(टीप– कोणतीही साधारण सभा कोणत्याही सभासदास सभेची सूचना न मिळाल्याच्या कारणावरून बेकायदेशीर ठरणार नाही.)

(ऊ) या सूचनेवरोबर कार्यक्रमपत्रिकेत निर्दिष्ट केलेली कार्यवृत्त, उत्पन्न-खर्च, ताळेबंद, अर्थसंकल्प इ. पत्रके पाठविणे आवश्यक आहे. कार्यक्रम पत्रिकेतील विषयाबाबत सभासदांना सूचना वा प्रस्ताव पाठवावयाचे असतील, तर त्यांनी ते सूचक अनुमोदक यांच्या सहीने त्या सभेपूर्वी ५ दिवस प्रमुख कार्यवाहांना पोचतील अशा बेताने पाठवावेत.

(ए) मताधिकार असलेल्या ५० सभासदांनी योग्य कारण दर्शवून, रीतसर सह्या करून मागणी अर्ज केल्यास असा अर्ज मिळाल्यापासून दोन महिन्यांच्या आत मागणी पत्रातील विषयांचा निर्णय करण्यासाठी मागणी सभा बोलाविण्याची व्यवस्था अध्यक्षांनी करावी.

(ऐ) वार्षिक सर्वसाधारण सभा, विशेष सर्वसाधारण सभा अथवा मागणी सभा यांना एकूण सभासदांच्या १/२५ किंवा ५० यांपैकी जी कमी असेल ती गणसंख्या राहील. गणसंख्येच्या अभावी स्थगित झालेली सभा त्याच दिवशी व त्याच ठिकाणी १५ मिनिटांच्या अवधीनंतर भरेल. अशा सभेला गणसंख्येचे बंधन राहणार नाही.

(ओ) परिषदेचे अध्यक्ष हेच वरील सर्व सभांचे अध्यक्ष राहतील. अध्यक्ष उपस्थित

नसल्यास उपस्थित उपाध्यक्षांपैकी कार्याध्यक्षांनी सुचविलेले एक उपाध्यक्ष सभेचे अध्यक्ष होतील.

(औ) अध्यक्ष वा कोणीही उपाध्यक्ष वार्षिक सभेला उपस्थित नसल्यास कार्याध्यक्षांनी विश्वस्त, पदाधिकारी आणि कार्यकारी मंडळाचे सभासद यांच्या व्यतिरिक्त इतर कोणाही अनुभवी सभासदाची त्या सभेपुरती अध्यक्ष म्हणून नियुक्ती करावी.

**१९. द्रव्यनिधी :**

परिषदेचे द्रव्यनिधी पुढील तीन प्रकारचे असतील–

(अ) विश्वस्तांकडील स्थिर निधी– सर्व प्रकारच्या आजीव सभासदांची वर्गणी.

(आ) विश्वस्तांकडील राखीव निधी– विशिष्ट कार्याकरता मिळालेल्या कायम स्वरूपाच्या देणग्या.

(इ) कार्यकारी मंडळाकडील साधारण निधी– साधारण सभासदांची वार्षिक वर्गणी, इतर वर्गणी, अतिथी निवास देणग्या, ग्रंथविक्री; योगक्षेमार्थ जमा होणाऱ्या देणग्या, दैनंदिन इतर उत्पन्ने व वर (अ) व (आ) मध्ये उल्लेखिलेल्या निधी व्यतिरिक्त मिळालेले इतर सर्व प्रकारचे उत्पन्न.

(ई) वरील तीन प्रकारच्या निधींपैकी (अ) व (आ) मधील निधी विश्वस्तांच्या स्वाधीन असतील. यावरील व्याजाची रक्कम कार्यकारी मंडळाने आवश्यकतेनुसार दैनंदिन खर्चासाठी व राखीव निधीच्या देणगीदारांच्या इच्छेनुसार वापरावयाची आहे.

(उ) वर (इ) मध्ये उल्लेखिलेला सर्व प्रकारचा निधी परिषदेच्या दैनंदिन कामासाठी कार्यकारी मंडळाच्या स्वाधीन राहील, त्याची गुंतवणूक करण्याचा अधिकार सर्वस्वी कार्यकारी मंडळाला राहील.

(ऊ) अपवादात्मक परिस्थितीत स्थिर-निधींपैकी काही रक्कम खर्चासाठी मागण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला राहील.

**२०. द्रव्यनिधी व खर्च :**

(अ) वर २०-अ मध्ये उल्लेखिलेल्या वसुलीतून आवश्यक खर्चाकरता रु. २०००/- (रुपये दोन हजार फक्त) कार्यालयात ठेवून बाकी सर्व रक्कम कार्यवाहांनी बँकेत जमा करावी व खर्चाकरता आवश्यकेतप्रमाणे रक्कम कोषाध्यक्षांकडून मागवून घ्यावी.

(आ) कोषाध्यक्ष आणि कार्यवाह यांनी शक्यतो अर्थसंकल्पानुसार खर्च करावा. जादा आणि विशेष खर्च उद्‌भवल्यास तो पदाधिकारी समितीची पूर्व संमती घेऊन करावा.

**२१. विश्वस्त मंडळ :**

(अ) परिषदेची वास्तू, स्थिर व राखीव निधी सुरक्षित ठेवण्यासाठी व या निधीची योग्य प्रकारे गुंतवणूक करण्यासाठी कार्यकारी मंडळाने स्थानिक आजीव सभासदांमधून











तीन सभासदांचे परिषदेचे विश्वस्त मंडळ म्हणून नियुक्त करावे.

(आ) नियुक्त विश्वस्तांना कायदा आणि हिशोब यांची स्थूलमानाने माहिती असावी. त्याचे वय ५० पेक्षा कमी व ७५ पेक्षा अधिक असू नये. तसेच नियुक्तीच्या वेळी विश्वस्त हा परिषदेचा किमान तीन वर्षे आजीव सभासद असावा.

(इ) परिषदेचे पदाधिकारी/कार्यकारी मंडळ यांच्यातील आजीव सभासदांखेरीज इतर आजीव सभासदांतूनच विश्वस्तांची निवड करावी.

(ई) विश्वस्ताला आपल्या पदाचा राजीनामा द्यावयाचा झाला तर तो त्याने कार्याध्यक्षांकडे द्यावा.

(उ) मृत्यू, राजीनामा व इतर कारणांमुळे विश्वस्ताची जागा रिकामी झाल्यास कार्यकारी मंडळाने रिकाम्या जागी नवीन विश्वस्ताची नियुक्ती करावी.

(ऊ) कुठलाही विश्वस्त आपले काम योग्य प्रकारे करीत नसल्याचे आढळून आल्यास त्याला विश्वस्तपदावरून बहुमताने दूर करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळास राहील.

**२२. विश्वस्तांची कामे :**

(अ) विश्वस्त मंडळाने आपल्यातून एक अध्यक्ष आणि एक कार्यकारी विश्वस्त यांची निवड करावी.

(आ) बँक खाती - गुंतवणुका व इतर आर्थिक व्यवहार अध्यक्ष व कार्यकारी विश्वस्त यांच्या नावाने करण्यात यावा.

(इ) विश्वस्तांनी स्थिर व राखीव निधीची गुंतवणूक राष्ट्रीयकृत वा सरकारी बँकेत अथवा अन्य शासकीय योजनेत किंवा विश्वस्त कायद्यानुसार मान्यताप्राप्त अशा योजनेत करावी.

(ई) विश्वस्तांनी गुंतवणूक रजिस्टर ठेवावे व ते विश्वस्त मंडळ आणि पदाधिकारी यांच्या बैठकीत सादर करावे.

(उ) विश्वस्तांनी गुंतविलेल्या स्थिर व राखीव निधीच्या रकमेवरील व्याजाची रक्कम दर तीन महिन्यांनी कार्यकारी मंडळाला द्यावी.

(ऊ) परिषदेचे ट्रस्टडीड, विश्वस्त कायदा (पब्लिक ट्रस्ट ॲक्ट) सोसायटीज रजिस्ट्रेशन ॲक्ट (सोसायटीज ॲक्ट) आणि परिषदेची घटना व साधारण सभेतील संमत झालेला प्रस्ताव आणि कार्यकारी मंडळाचे ठराव यांच्यातील तरतुदी विश्वस्तांवर बंधनकारक राहतील.

(ए) विश्वस्तांची आणि परिषदेचे पदाधिकारी यांची वर्षातून किमान ३ वेळा संयुक्त सभा घेण्यात यावी. जरूर पडल्यास जादा सभा बोलाविण्याचा कार्यकारी विश्वस्तांना अधिकार राहील.

(ऐ) विश्वस्तांना त्यांच्या जबाबदाऱ्या पूर्ण करण्याकरता आणि आवश्यकतेनुसार प्रमुख



अनुक्रमणिका






कार्यवाह आणि कोषाध्यक्ष यांनी साहाय्य करावयाचे आहे.

**२३. बँक खाती/हिशेब :**

(अ) विश्वस्तांकडून मिळावयाचे स्थिर व राखीव निधीवरील व्याज, वार्षिक साधारण सभासदांच्या वर्गण्या, इतर वर्गण्या अनामत रकमा, विनाअट देणग्या, ग्रंथविक्रीची रक्कम, तसेच इतर उत्पन्न परिषदेच्या नावाने राष्ट्रीयीकृत बँकेत वा सहकारी बँकेत जमा करावे.

(आ) बँकेची सर्व खाती, सेव्हिंग्ज, करंट, कायम ठेव इत्यादी, कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष आणि कार्यवाह या तिघांच्या नावे असावीत. या खात्याचा कारभार या तिघांपैकी दोघांना संयुक्तपणे करण्याचा अधिकार असावा, मात्र रकमा शक्यतो कोषाध्यक्ष आणि कार्यवाह यांच्या सहीने काढाव्यात. विशेष निकडीच्या प्रसंगी या दोघांपैकी एकाची सही मिळणे अशक्य झाल्यास कार्याध्यक्षांच्या सहीने रकमा काढता येतील.

**२४. परिषदेचे विभागीय संमेलन :**

(अ) परिषदेने शक्यतो प्रतिवर्षी आपल्या कार्यक्षेत्रात परिषदेचे साहित्य संमेलन भरवावे.

(आ) हे संमेलन परिषदेच्या शाखेमार्फत किंवा संलग्न संस्थेमार्फत भरविण्यात यावे.

(इ) संमेलनाचे निमंत्रण संबंधित शाखेने/संस्थेने वर्षाच्या पहिल्या तिमाहीत केंद्र कार्यालयाकडे पाठवावे.

(ई) संमेलन-निमंत्रणास मान्यता मिळाल्यावर निमंत्रक संस्था/शाखा आणि परिषदेचे कार्यकारी मंडळ यांचे प्रत्येकी ३ प्रतिनिधी मिळून संमेलनाचे सल्लागार मंडळ अस्तित्वात येईल.

(उ) संमेलनाची पुढील सर्व कार्यवाही सल्लागार मंडळाच्या निर्णयानुसारच होईल.

(ऊ) संमेलन संपल्यावर २ महिन्यांच्या आत निमंत्रक संस्थेने हिशेबाचे काम पूर्ण करावे. शिलकी रकमेचा विनियोग निमंत्रक संस्थेने साहित्यविषयक कार्याकरता करावयाचा आहे. मात्र अशा शिल्लक रकमेपैकी २५ टक्के रक्कम निमंत्रक संस्थेने परिषदेच्या केंद्रीय कार्यालयाकडे देणागी म्हणून संमेलन संपल्यावर २ महिन्यांच्या आत सुपूर्त करावी.

(ए) आवश्यकता वाटल्यास परिषदेला स्वतंत्रपणे विभागीय संमेलन भरविता येईल किंवा शाखेतर्फे होणाऱ्या विभागीय संमेलनास आर्थिक साहाय्य करता येईल.

**२५. परिषदेच्या शाखा :**

(अ) परिषदेच्या कार्यक्षेत्रात परिषदेच्या कार्याला उपयुक्त व पूरक ठरणाऱ्या शाखा परिषदेला स्थापन करता येतील.

(आ) सांप्रत अस्तित्वात असलेल्या शाखेच्या दिनांक १५-४-९० च्या मेळाव्यात एकमताने मान्य केलेल्या शाखा नियमांनुसारच शाखा स्थापन करता येतील व या



अनुक्रमणिका








नियमानुसार शाखांचे कार्य चालेल.

(इ) हे शाखा-नियम या घटनेचे परिशिष्ट 'अ' म्हणून जोडले आहेत.

(ई) शाखेचे कार्य असमाधानकारक वा परिषदेच्या हितसंबंधांना बाधक असे आढळल्यास किंवा परिशिष्ट 'अ' मधील नियमांचा शाखेकडून भंग झाल्यास शाखा रद्द करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला राहील.

**२६. संलग्न संस्था :**

(अ) परिषदेच्या कार्यक्षेत्रातील साहित्य संस्थांना परिषेदेचे उद्देश मान्य करून परिषदेशी सर्व माहितीसह रुपये ५०/- (रुपये पन्नास मात्र) भरून संलग्न होता येईल.

(आ) संलग्न होऊ इच्छिणाऱ्या अशा संस्थेने रुपये ५०/- भरून लेखी अर्ज करावा.

(इ) कार्यकारी मंडळाने हा अर्ज संमत केल्यावर ही संस्था परिषदेची संलग्न संस्था म्हणून मानली जाईल.

(ई) संलग्न संस्थेची आजीव वर्गणी रु.५००/- राहील.

(उ) या संस्थेचा एक प्रतिनिधी परिषदेचा मतदार सभासद म्हणून समजला जाईल.

(ऊ) संलग्न संस्थेला 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' हे त्रैमासिक भेटीदाखल पाठविले जाईल.

(ए) संलग्न संस्थेने आपल्या कार्याचे त्रोटक कार्यवृत्त वर्षअखेर परिषदेकडे पाठवावे.

(ऐ) परिषद संलग्न संस्थेच्या कुठल्याही आर्थिक व्यवहारास जबाबदार राहणार नाही.

**२७. महामंडळ :**

(अ) महामंडळावर परिषदेचे एकूण तीन प्रतिनिधी असतील. त्यांपैकी कार्याध्यक्ष व कार्यवाह हे परिषदेचे महामंडळावरील पदसिद्ध प्रतिनिधी असतील.

**२८. रिकाम्या जागा भरणे :**

(अ) अध्यक्षांसहित सर्व पदाधिकारी यांच्या जागा कोणत्याही कारणाने रिकाम्या झाल्यास उर्वरित मुदतीसाठी कार्यकारी मंडळाने बहुमताने नव्या पदाधिकाऱ्यांची नियुक्ती करावी.

(आ) कार्यकारी मंडळाच्या सभासदाची जागा कोणत्याही कारणाने रिकामी झाल्यास उर्वरित मुदतीसाठी त्या त्या गटातील सभासदाची कार्यकारी मंडळाने बहुमताने नियुक्ती करावी.

(इ) कार्यकारी मंडळाच्या लागोपाठ सलग तीन सभांना अनुपस्थित राहणाऱ्या सभासदाचे कार्यकारिणीमधील सभासदत्व आपोआप रद्द होईल. अशा रीतीने सभासदत्व रद्द झालेल्या रिकाम्या जागेवर कार्यकारी मंडळाने बहुमताने त्या त्या गटातील सभासदांची उर्वरित काळासाठी नियुक्ती करावी.

२९. पोटनियम :

(अ) परिषदेचे उद्देश, साधने आणि कारभार यांना उपयुक्त पूरक व सुसंगत ठरणारे पोटनियम करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला राहील. मात्र हे नियम घटनेचा भाग असणार नाहीत.

३०. घटनादुरुस्ती :

(अ) परिषदेच्या घटनेत कुठलीही दुरुस्ती किंवा बदल करावयाचा असेल, तर तशी सूचना किमान ५० सभासदांच्या सहीने आधी कार्यकारी मंडळापुढे आली पाहिजे. अशी दुरुस्ती संमत होण्यासाठी कार्यकारी मंडळाचे ३/४ बहुमत आवश्यक आहे.

(आ) आवश्यकता वाटल्यास कार्यकारी मंडळाला ३/४ बहुमताने आपणहूनही घटनेत बदल सुचविता येईल.

(इ) घटनेत बदल सुचविणाऱ्या दुरुस्त्या वरीलप्रमाणे कार्यकारी मंडळाने ३/४ बहुमताने संमत केल्यावर, १ महिन्याची पूर्वसूचना देऊन या दुरुस्त्या संमत करून घेण्यासाठी विशेष साधारण सभा बोलाविली पाहिजे. या सभेत एकूण हजर असलेल्या सभासदांपैकी ३/४ सभासदांनी संमती दिल्यावर या दुरुस्त्या अंतिम समजण्यात येतील व घटनेत तसा बदल करण्यात आल्याचे समजण्यात येईल.

(ई) अशा प्रकारची घटना-दुरुस्ती झाल्यावर तिच्याशी विसंगत वा विरोधी दुरुस्ती किमान तीन वर्षे करता येणार नाही.

(उ) किरकोळ स्वरूपाची घटना-दुरुस्ती परिषदेच्या वार्षिक साधारण सभेत कार्यक्रम पत्रिकेत नमूद करून घेता येईल.

---

## नवे आजीव सभासद (१ मे १९९० पासून)
## (पुणे विभाग)

मेधा बा. कुलकर्णी, गणेश ल. जोशी, सुमन सा. भोसले, डॉ. शशांक लिमये, नलिनी श्री. देशपांडे, वि. ल. दाते, दत्तात्रय स. गोसावी, विजय न. रेडे, कैलास सु. केंजळे, डॉ. कल्याणी हर्डीकर, आरती अ. गाडगीळ, उल्हास र. चितळे, वसंत मु. हरकरे, मंजुश्री कि. संखे, मंगला सामंत, लक्ष्मीबाई सहस्रबुद्धे, उषा अ. वांजपे, वामन ग. पारखी, सौ. नंदिनी सु. खोपकर, डॉ. संदीप प्र. वाघ, राजेंद्र चं. शहा, सौ. संजीवनी व. मुळजकर, सौ. छाया मा. चिटणीस, सौ. माधवी अ. जोशी, महिंद्र मा. कोठारी, मिलिंद प्र. देशपांडे, नारायण उर्फ वसंत गो. फाटक, सौ. मालिनी मोडक, सौ. ललिता वि. मराठे, मधुकर य. सातारकर, अरुण खोरे, गंगाधर महाम्बरे, सौ. आशा अ. परांजपे, सचिन मा. जोशी, रामभाऊ द. उपलेंचवार, सतीश गु. सोमवंशी, सौ. माधुरी म. कुलकर्णी



अनुक्रमणिका

# परिशिष्ट अ

## महाराष्ट्र साहित्य परिषद शाखांसाठी नियम

दि. ३०-४-९० रोजी संमत

**१. शाखेचे नाव :**

'महाराष्ट्र साहित्य परिषद —— शाखा' असे राहील.

**२. उद्देश :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेनुसार, घटनेतील उद्देशांप्रमाणे, केंद्र संस्थेच्या मार्गदर्शनानुसार शाखेच्या अधिकार क्षेत्रात कार्य करणे.

**३. साधने (कार्यपद्धती) :**

शाखांकडून साध्य करण्याच्या उद्देशांसाठी व त्यास अनुसरून अवश्य व योग्य वाटतील त्या साधनांचा शाखेच्या कार्यक्षेत्रात उपयोग केला जाईल.

(अ) शाखेच्या कार्यक्षेत्रात अ. भा. मराठी साहित्य संमेलन, जिल्हा साहित्य मेळावे, उत्सव, चर्चासत्रे, सहली, कविसंमेलने, परिसंवाद, व्याख्याने आदी आयोजित करणे.

(आ) मराठी भाषेच्या अभ्यासाला व प्रसाराला प्रोत्साहन देणे.

(इ) अन्य भाषांच्या साहित्य-संस्थांशी व साहित्य-विषयक चळवळींशी आवश्यकतेनुसार सहकार्य करणे.

(ई) मराठी भाषा व साहित्य यांच्या प्रगतीआड येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठी आवश्यक ते प्रयत्न करणे.

(उ) समाजाच्या सर्व स्तरांत मराठी साहित्य-विषयक आवड, अभिरुची, आस्था व जागृती निर्माण करणे व त्याची वृद्धी करणे.

**४. कार्यक्षेत्र :**

शाखेचे कार्यक्षेत्र ज्या गावात/शहरात शाखा असेल त्या ठिकाणापुरते मर्यादित राहील. स्पष्टीकरण : (अ) प्रस्तुत गाव जिल्ह्याचे ठिकाण असेल तर त्या जिल्ह्यात इतरत्र शाखा स्थापन होईपर्यंत त्या शाखेचे कार्यक्षेत्र जिल्हा हे राहील व त्या जिल्ह्यात इतरत्र शाखा स्थापन झाल्यास त्या प्रमाणात शाखेचे कार्यक्षेत्र कमी होईल. (आ) नियमांप्रमाणे सध्या अस्तित्वात असलेल्या शाखा जिल्ह्याच्या कार्य क्षेत्रातून कमी करण्यात येतील. (इ) आसपासच्या परिसरातील सभासद नोंदणी करण्यासाठी नव्या शाखेला केंद्राची परवानगी घ्यावी लागेल. (ई) महापालिका क्षेत्रात एकापेक्षा अधिक शाखा सुरू करण्यासाठी केंद्राची



अनुक्रमणिका






संमती आवश्यक राहील. (उ) प्रत्येक शाखेला केंद्राकडून अधिकृत मान्यतापत्र मिळणे आवश्यक राहील. सध्या अस्तित्वात असलेल्या सर्व शाखांना केंद्राकडून मान्यतापत्र देण्यात येईल. नव्या शाखांचीही स्थापना नियमानुसार झाल्यावर त्यांना केंद्राकडून मान्यतापत्र देण्यात येईल. अधिकृत मान्यतापत्राशिवाय नवी शाखा अस्तित्वात येणार नाही.

**५. वर्षगणना :**

केंद्र संस्थेप्रमाणे शाखेचे वर्ष १ एप्रिल ते ३१ मार्च राहील.

**६. सभासद वर्ग :**

म. सा. प. च्या घटनेस अनुसरून व त्यात नमूद केल्याप्रमाणे सभासद नोंदणी व वर्ग असतील. शाखेच्या कार्यक्षेत्रात स्थानिक सभासदांची नोंद शाखेकडेही असेल व त्यांच्या वर्गणीचा हिस्सा शाखेसही मिळेल. शाखेच्या सर्व कार्यक्रमांत सभासद भाग घेऊ शकतील. स्थलांतरामुळे अन्यत्र गेलेल्या सभासदाला त्या ठिकाणी शाखा असल्यास त्या शाखेत समाविष्ट होणे आवश्यक आहे. सभासदाने स्थलांतर झाल्याचे केंद्र संस्थेस कळवावे. संबंधित शाखेला सभासद समाविष्ट करून घेण्याबद्दल कळवण्यात येईल व तो सभासद समाविष्ट करून घेणे त्या शाखेस बंधनकारक राहील. आजीव सभासद स्थलांतरित झाल्यास संबंधित शाखेला त्याच्या वर्गणीचा हिस्सा मिळणार नाही. कोणत्याही व्यक्तीस एकापेक्षा अधिक शाखांचे सभासद होता येणार नाही.

**७. वर्गणी :**

नव्या सभासदाची नोंदणी झाल्यावर त्याच्या वर्गणीचा केंद्रसंस्थेच्या नियमाप्रमाणे योग्य तो हिस्सा शाखेने ३० दिवसांच्या आत केंद्राकडे पाठवणे आवश्यक राहील.

**८. सभासदत्व :**

म. सा. प. चे उद्देश, घटना व नियम मान्य असलेल्या, १८ वर्षावरील कोणाही व्यक्तीस स्थानिक शाखेतर्फे संस्थेचे सभासद होता येईल. स्थानिक शाखा नसेल तर केंद्रसंस्थेचा सभासद होता येईल. त्यासाठी केंद्र संस्थेच्या विहीत नमुन्यात अर्ज, पूर्ण वर्गणीसह व एका सभासदाच्या शिफारशीसह व कार्यकारिणीच्या मंजुरीसह केंद्राकडे पाठवावा लागेल. कोणाचेही सभासदत्व स्वीकारणे किंवा नाकारणे हा केंद्राच्या कार्यकारी मंडळाचा अधिकार राहील. मार्च अखेर पर्यंत ज्या सर्वसाधारण सभासदाची वार्षिक वर्गणी येणार नाही त्याचे सभासदत्व आपोआप रद्द होईल.

**९. सभासदांचे हक्क :**

म. सा. प. च्या घटनेप्रमाणे दिलेले सर्व अधिकार सभासदांना प्राप्त होईल.



अनुक्रमणिका






**१०. सभासदत्व रद्द करणे :**

(अ) मृत्यू, राजीनामा, फौजदारी, नैतिक अधःपतनाच्या गुन्ह्याबद्दल झालेली शिक्षा अगर

(आ) परिषदेचे नियम व हित यांना प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष विघातक कृत्य करणाऱ्या वा बेशिस्त वर्तन करणाऱ्या कोणत्याही सभासदाचे सभासदत्व, शाखेच्या कार्यकारी मंडळाच्या शिफारशीवरून, शाखेच्या सर्वसाधारण सभेत हजर सभासदांच्या २/३ मताधिक्याने, कायमचे अगर काही मुदतीसाठी रद्द करता येईल. त्यापूर्वी अशा सभासदाला आपली बाजू मांडण्याची संधी दिली जाईल. शाखेच्या निर्णयाला केंद्राची अंतिम संमती आवश्यक राहील.

**११. कार्यकारी मंडळ :**

(अ) कार्यकारी मंडळ एकूण १३ सभासदांचे राहील. त्या १ कार्याध्यक्ष २ कार्यवाह व १ कोषाध्यक्ष असे ४ पदाधिकारी राहतील व इतर ९ सभासद राहतील.

(आ) केंद्र संस्थेच्या त्रैवार्षिक निवडणुकीच्या सुमारास शाखेच्या कार्यकारी मंडळ सभासदांची निवड दर तीन वर्षांनी वार्षिक सर्वसाधारण सभेत बहुमताने केली जाईल. त्यात कार्याध्यक्ष, कोषाध्यक्ष व इतर ११ सभासदांची निवड शाखेच्या सर्व सभासदांनी सर्वसाधारण सभेत गुप्तमतदान पद्धतीने बहुमताने निवड करावी.

(इ) कार्यकारी मंडळाच्या पहिल्या सभेत कार्यकारी मंडळाने एक सभासद स्वीकृत करावा. त्याशिवाय एक सभासद केंद्राने नियुक्त करावा. त्यानंतर याच सभेत २ कार्यवाहांची निवड करावी. एक- अध्यक्ष व दोन- उपाध्यक्ष यांचीही निवड करावी. अध्यक्ष व उपाध्यक्ष कार्यकारिणीच्या बाहेरील सभासद असतील व ते कार्यकारिणीचे सदस्य असणार नाहीत. याप्रमाणे सर्व शाखांची पहिली निवडणूक मार्च/एप्रिल १९९२ मध्ये होईल. मध्यंतरीच्या काळात सध्या अस्तित्वात असलेले कार्यकारी मंडळ कार्य करील व अस्तित्वात राहील.

(ई) कार्यकारी मंडळाच्या सभेला आवश्यकतेनुसार कोणालाही कार्याध्यक्ष निमंत्रित करू शकतील. मात्र निमंत्रितांना मतदानात भाग घेता येणार नाही.

(उ) कार्यकारी मंडळाच्या कोणाही सभासदाला परिषदेच्या कामकाजासाठीच्या खर्चाव्यतिरिक्त इतर काही पगार प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीने मिळणार नाही.

**१२. कार्यकारी मंडळाचे कार्य व अधिकार :**

(अ) दैनंदिन कामकाज पाहणे, नोकरवर्गाची नेमणूक करणे अगर सेवानिवृत्ती करणे, देण्याघेण्याचे व्यवहार करणे, नवीन उपसमित्या नेमणे व परिषदेच्या ध्येय-धोरणांनुसार व उद्देशांनुसार इतर कामे बघणे.

(आ) जमाखर्च व ताळेबंद-पत्रक करून व अहवाल तयार करून वार्षिक सभा घेणे.

त्यानंतर एक महिन्याच्या आत त्याची एक प्रत केंद्रसंस्थेकडे पाठवणे. शाखेचे हिशेब सन १८६० च्या संस्था नोंदणी अधिनियम व सन १९५० च्या मुंबई सार्वजनिक विश्वस्त नोंदणी अधिनियमातील तरतुदीनुसार ठेवून त्याचे वार्षिक परीक्षण चार्टर्ड अकाउंटन्टस कडून करून घेणे किंवा संबंधित कागदपत्रे केंद्राकडे तपासणीसाठी पाठवणे.

(इ) पुढील कार्याची दिशा व अंदाजपत्रक तयार करून वार्षिक सभेपुढे ठेवणे.

(ई) कार्यकारी मंडळातील सभासदाने राजीनामा दिला अगर अन्य कारणाने जागा रिकामी झाल्यास उरलेल्या मुदतीसाठी त्याबद्दल सभासद कार्यकारी मंडळाच्या सभेत बहुमताने निवडणे.

(उ) म. सा. प. च्या घटनेत व शाखांच्या नियमांत दुरुस्ती, नवीन कार्य अगर बदल अथवा इतर शिफारशी शाखेच्या वार्षिक सर्वसाधारण सभेत मंजूर करून घेऊन केंद्राकडे पाठवणे.

(ऊ) शाखेच्या वार्षिक स. सा. सभेने केलेले ठराव आदेश व धोरणविषयक गोष्टी अंमलात आणणे.

(ए) केंद्राकडून आलेले ठराव, आदेश, सूचना आदींची अंमलबजावणी करणे व दर तीन महिन्यांनी शाखेचे कार्यवृत्त केंद्राकडे पाठवणे.

(ऐ) परिषदेच्या मूलभूत योग्य अशा कार्यक्रमांच्या दृष्टीने कार्यकारी मंडळ आवश्यक तितक्या सभासदांची सल्लागार समिती नेमू शकेल. त्याचप्रमाणे साहित्य संमेलन, कवि संमेलन, महोत्सव, मेळावे, शिबिरे अशा विशेष प्रसंगी कार्यकारी मंडळाला प्रासंगिक उपसमिती नेमण्याचा अधिकार राहील.

(ओ) कार्यकारी मंडळाच्या कुणाही सभासद अथवा पदाधिकारी याच्याविरुद्ध अविश्वास अथवा निषेध व्यक्त करावयाचा असल्यास असे मत कार्यकारी मंडळाने २/३ बहुमताने व्यक्त केले पाहिजे. तथापि असा ठराव मंजूर करण्यापूर्वी ज्याच्याविरुद्ध असा ठराव असेल त्याला त्याचे म्हणणे मांडण्याची संधी दिली पाहिजे. अविश्वासदर्शक ठराव मंजूर झाल्यानंतर तो सभासद पदाधिकारी आपल्या स्थानापासून मुक्त झाला असे मानण्यात येईल.

**१३. कार्यकारी मंडळाच्या सभा :**

(अ) अध्यक्ष : वार्षिक सर्वसाधारण, विशेष सर्वसाधारण सभांचे अध्यक्षस्थान स्वीकारून निष्पक्षपातीपणाने सभा पार पाडणे, शाखेच्या कार्यक्रमांचे अध्यक्षस्थान स्वीकारणे, समान मत विभागणी झाल्यास निर्णायक मत देणे.

(आ) उपाध्यक्ष : अध्यक्षांच्या अनुपस्थितीत अध्यक्षांचे स्थान स्वीकारून सर्व कामे पाहणे. एखाद्या खास समितीवर विशिष्ट कार्यासाठी नेमणूक झाल्यास त्या विशेष कार्याची जबाबदारी स्वीकारणे.



अनुक्रमणिका







(इ) कार्याध्यक्ष : कार्यकारी मंडळाच्या सर्व सभांचे अध्यक्षस्थान स्वीकारणे, शाखेच्या कामाचे नियोजन करणे. का. मंडळाच्या मदतीने वार्षिक कार्यक्रम ठरवून पार पाडणे, दैनंदिन जमाखर्चावर देखरेख व नियंत्रण ठेवणे, कार्यवाहांकडून पत्रव्यवहार करून घेणे. अध्यक्ष व उपाध्यक्ष यांच्या गैरहजेरीत त्यांची सर्व जबाबदारी घेणे.

(ई) कार्यवाह : कार्यकारिणीच्या सूचनेप्रमाणे दैनंदिन कामकाज पाहणे, शाखेचा पत्रव्यवहार करणे, दप्तर सांभाळणे, कार्याध्यक्षांच्या पूर्वपरवानगीने सर्वप्रकारच्या सभा बोलावणे व त्यांचा वृत्तांत ठेवणे, कोषाध्यक्षांकडून मासिक जमाखर्च वगैरे वर्गणीच्या तपशिलासह कार्यकारिणीपुढे ठेवणे, शाखेचा कायदेशीर प्रतिनिधी म्हणून काम पाहणे, शाखेचा अहवाल दर तीन महिन्यांतून एकदा नियमितपणे केंद्राकडे पाठवणे. कार्याध्यक्षांच्या संमतीने वरील सर्व कामांची विभागणी कार्यवाहांनी करून द्यावी.

(उ) कोषाध्यक्ष : शाखेचे दैनंदिन, वार्षिक जमाखर्चाचे कागदपत्र ठेवणे, सभासदांच्या वर्गण्या, देणग्या, व्याज आदींच्या नोंदी ठेवणे; खर्चाच्या, बिलांची रक्कम कार्याध्यक्षांच्या वा कार्यकारी मंडळाच्या मान्यतेनुसार चुकती करणे, हिशेबाच्या नोंद वह्या, पावती पुस्तके, चेकबुक्स, पासबुक्स आदींची जबाबदारी घेणे व सभासदांना जरूर तेव्हा माहिती देणे. वार्षिक व त्रैमासिक जमाखर्च अंदाजपत्रके तयार करणे व कार्यवाहांमार्फत कार्यकारिणीला सादर करणे.

**१४. निधी व त्याचा विनियोग :**

शाखेच्या कामकाजासाठी परिषदेच्या सभासदांकडून वर्गणीरूपाने निधी जमा केला जाईल. निधी संकलनासाठी देणग्या मिळवण्याचा प्रयत्न केला जाईल. निधी संकलनासाठी स्वतंत्र कार्यक्रम आखूनही निधी उभा केला जाईल. सरकारी/निमसरकारी अथवा खाजगी अनुदान अगर मदत स्वीकारण्यात येईल. शाखेकडील निधी राष्ट्रीयकृत शेड्यूल्ड अथवा सहकारी बँकेत ठेवावा. अन्य खास व्यक्तीकडे किंवा संस्थेकडे ठेव म्हणून ही रक्कम ठेवू नये. कोषाध्यक्षांकडे रु. २५० पेक्षा अधिक रक्कम रोख स्वरूपात नसावी. बँकेचे व्यवहार कार्याध्यक्ष किंवा कार्यवाह आणि कोषाध्यक्ष अशा दोघांच्या स्वाक्षरीने करावेत. शाखेचा निधी व त्यावरील व्याज याचा विनियोग शाखेच्या कार्यासाठी व्हावा. आजीव सभासदांच्या वर्गणीचा हिस्सा, विशिष्ट कार्यासाठी जमलेला निधी व अन्य देणग्या व रु. दोन हजारापेक्षा जास्त अन्य निधी मुदत ठेवीच्या स्वरूपात असाव्यात. व्याजाची रक्कम दैनंदिन खर्चासाठी व कार्यक्रमांसाठी खर्च व्हावी. मूळ ठेवीतील रक्कम खर्च करण्यापूर्वी केंद्राची संमती घ्यावी. शाखेला स्थावर मालमत्ता निर्माण करणे झाल्यास केंद्र संस्थेच्या परवानगीने करता येईल मात्र अशा मालमत्तेची मालकी केंद्रसंस्थेकडे राहील. याबद्दलचा पुढील निर्णय केंद्रसंस्थेने शाखेच्या संमतीने घ्यावा.



अनुक्रमणिका

**१५. वार्षिक सर्वसाधारण सभा :**

शाखेची वार्षिक सर्वसाधारण सभा परिषदेचे अधिकृत वर्ष संपल्यापासून तीन महिन्यांच्या आत घेतली पाहिजे. त्यासाठी आवश्यक हिशेबाचा अहवाल पूर्ण करून तपासणीही पूर्ण करण्याची तत्परता कार्यकारिणीने दाखवली पाहिजे. काही कारणाने हे न झाल्यास अध्यक्षांनी आपल्या अधिकारात सभा बोलावली पाहिजे. वार्षिक सभेची सूचना (दिवस, वेळ, ठिकाण व सभेपुढील कामे असा सर्व तपशील असलेली) सभेपूर्वी किमान १५ दिवस दिली पाहिजे. केंद्र संस्थेच्या एका प्रतिनिधीला या सभेसाठी विशेष आमंत्रित केले पाहिजे. सभेची सूचना पोस्टाने न मिळाल्यास त्यामुळे सभेत मंजूर झालेल्या कामकाजास बाधा येणार नाही. वार्षिक सभेच्या कामकाजात सर्व अधिकृत सभासदांना भाग घेता येईल. अन्य आमंत्रितांना उपस्थित राहता येईल, परंतु आमंत्रितांना मताधिकार असणार नाही. सभेस गणसंख्या तीन पंचमांश किंवा २५ सभासद यांपैकी कमी असेल ती– एवढी– राहील. कोरम (गणसंख्ये) अभावी स्थगित सभा अर्ध्या तासाने त्याच ठिकाणी भरेल व त्यास गणसंख्येची आवश्यकता असणार नाही व कामकाज कायदेशीर ठरेल. मात्र सूचनापत्रात तशी नोंद करणे आवश्यक आहे.

**१६. वार्षिक सर्वसाधारण सभेपुढील कामे :**

(अ) सूचनापत्राचे वाचन.

(आ) मागील सभेचा वृत्तांत वाचन.

(इ) कार्यकारिणीने मंजूर केलेले अहवाल वाचन.

(ई) मागील वर्षाचे जमाखर्च, ताळेबंद पत्रक व नवीन वर्षासाठी अंदाजपत्रक यांस मंजुरी.

(उ) पुढील वर्षासाठी अंतर्गत हिशेब तपासनिसांची नियुक्ती.

(ऊ) ध्येय धोरण व कार्यावर चर्चा.

(ए) अध्यक्षांच्या परवानगीने येणारी व अन्य सभासदांनी पूर्वसूचना देऊन सभेपुढे आणलेली कामे.

**१७. विशेष सर्वसाधारण सभा :**

एखादी खास महत्त्वाची गोष्ट सर्व सभासदांपुढे ठेवण्याची कार्यकारिणीची इच्छा असल्यास अगर विशेष प्रसंगी विशेष सर्वसाधारण सभा घेता येईल. पटावरील १/४ सभासदांनी लेखी अर्ज केल्यासही अशी विशेष सर्वसाधारण सभा अध्यक्षांनी बोलावली पाहिजे.

**१८. विशेष सूचना :**

शाखेच्या कार्यासंबधीचे केंद्राकडून आलेले आदेश किंवा सूचना यांचे पालन न



अनुक्रमणिका

केल्यास, दर तीन महिन्यांतून एकदा कार्यवृत्त न पाठवल्यास, हिशेब व ताळेबंद योग्य कालावधीत पूर्ण न करण्यात आल्यास, शाखेच्या कामकाजाबद्दल असमाधानकारक स्थिती निर्माण झाल्यास, शाखेच्या कामाची पाहणी करण्याचा, कार्य सुरळीत चालावे यासाठी योग्य ती कारवाई करण्याचा, पदाधिकारी बदलण्याचा किंवा नवे नियुक्त करण्याचा इतकेच नव्हे, तर शाखेची मान्यता काढून घेण्याचा पूर्ण अधिकार केंद्राकडे राहील. अंतिम निर्णय घेण्यापूर्वी कार्याध्यक्षांना त्यांचे म्हणणे मांडण्याची संधी दिली जाईल.

(महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विविध घटक संस्थांच्या प्रतिनिधींनी शाखांसाठी केलेल्या प्रत्येक नियमाची तपशीलवार चर्चा करून त्यास वरीलप्रमाणे अंतिम रूप देण्यात आले. हे नियम दि. १५-४-१९९० पासून अमलात आले आहेत.)

---

## आजीव सभासद (१ मे १९९० पासून)

विनयकुमार दि. कुलकर्णी (मुंबई), स. रा. गाडगीळ (नांदेड), इंद्रजीत ना. भालेराव (परभणी), सौ. कल्पना अ. अग्रवाल (भुसावळ), नंदकुमार का. कुलथे (नाशिक), डॉ. मा. रं. कुलकर्णी (चेंबूर), दिलीप न. महाजन (डोंबिवली), सुगंध व. देसाई (मुंबई), दत्ताजी गो. गायकवाड (कोकणगाव), श्री. पटेल, श्री. राठी, भट्टड, क्षीरसागर (लासलगाव), धनंजय ढवळे (मुंबई), वामन देशपांडे (मुंबई), खंडेराव ज. पाटील (साक्री), श्रीधरराव गं. सातपुते (परभणी), सदाशिव द. कदम (श्रीगोंदा), अरविंद बाजी (ठाणे), शोभा सुभेदार (ठाणे), कृष्णाजी गो. चिंचाळकर (भिवंडी), भास्करराव धो. खांडगे (अकोले), शरद दळवी (पणजी), प्रकाश भातंब्रेकर (दादर), अनंत प्र. सावंत (मुंबई), इंदिरा संत (बेळगाव), सुधाकर वा. ओक (धुळे), आत्माराम गो. डाकवे (चिपळूण), भारत सासणे (लातूर), अनंत नि. बोंगाळे (इचलकरंजी), अनंत रा. पारगावकर (इचलकरंजी), सदानंद द. उकिडवे (इचलकरंजी), सौ. श्रेयसी श्री. कर्वे (पनवेल), सौ अनुराधा दा. कुलकर्णी (सांगली), पूनमकुमार मा. कटारिया (इचलकरंजी), भाऊ पाध्ये (वसई रोड), डॉ. मदन पां. कुलकर्णी (नागपूर), मधुकर खांबेकर, डॉ. यशवंत खांगटे, संजीव निकम, किशोर राठी, अनिल गुजराथी- येवला (नाशिक), सौ. शेटे, सौ. निकम (जळगाव), वसंत वि. कुलकर्णी (नागपूर), आप्पासाहेब खोत (पन्हाळा), प्रा. सुहास मा. निर्मळे (श्रीरामपूर), सुधीर रा. देवरे (सटाणा, नाशिक), शशीकांत रा. लिपाने (सोनाई), केदारनाथ ब. सिकची (सोनाई), सौ. सिंधु नं. भंगाळे (फैजपूर), कुशलदेवजी शास्त्री (नांदेड), सौ. निर्मला देशपांडे (दादर), उषा मेहता (मुंबई), कोर्डे, वाड, गांगल- म. सा. प. शाखा ठाणे, श्री. सी. गोसावी (कोल्हापूर), सौ. उज्वला जाधव (इचलकरंजी), सखाराम वा. हिरे (अकोला), विठ्ठल भि. वाघ (अकोला), प्रा. शा. वा. स्वान (चंद्रपूर) किशोर ना. भवार, सखाहरी भि. तूवर, अल्ताप ह. देशमुख, सुभाष सो. टेमक,

Maharashtra Sahitya Patrika Regd No. 6398 / 57



रत्नागिरी येथे भरलेल्या

६४ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

मधु मंगेश कर्णिक

अभिनंदन

मुद्रक – प्रकाशक : राजा फडणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ३०.
फोन : ४४२९६३